# शकुनी मोहर

लेखिका

कुमारी कुमुदिनी शंकर प्रभावळकर,
बी. ए. (ऑनर्स)

विजय-साहित्य संस्था—पुणें

१९३२

किंमत १ रुपया



ज्याच्या अकालीं निधनावरून 'विजयसिंहा'ची
करुण-भूमिका रंगविली
व
ज्याच्या वियोगानें पोळलेल्या माझ्या मनःस्थिती-
वरून 'अलककुमारी'च्या दुःखपूर्ण निराशेचें
शब्दचित्र रेखाटलें, त्या

# माधवास-

## माझ्या एकुलत्या एक प्रिय बंधूस-

अत्यंत प्रेमपूर्वक
हें पुस्तक
अर्पण



# अनुक्रमणिका

# प्रकाशकाची प्रस्तावना

पुढील 'नवल-कथा' वाचकांस सादर करण्यास आम्हांस आनंद वाटत आहे. मराठी वाङ्मयांत अत्यंत स्वाभाविक वाटणाऱ्या नवलकथा (Romances) फारच थोड्या आहेत. शकुनी मोहर ही नवलकथा उत्तान अतिशयोक्तीनें, अगर अद्भुतरसानें ओथंबलेली नाहीं. मानवी शक्तीला अशक्य, बुद्धीला अगोचर, आणि परिस्थितीला पारखे असे प्रसंग यांत कोठेंही नाहींत, असें असूनही पुढील कथा नवल-कथा आहे याबद्दल वाद राहणार नाहीं मानवी आयुष्याचें नितांतसुंदर कल्पनारम्य चित्र पुढील कथेत रेखाटलेलें आहे आयुष्यांतील सौंदर्यपूर्ण व हृदयरम्य निवडक वेंचींव प्रसंग एके ठिकाणीं करून त्याच्यायोगें कथेचें सुंदर जाळें विणलेलें आहे; परंतु प्रकाशाची खरी कल्पना छायेशिवाय येत नसते या न्यायानें रम्य, सुखदायक प्रसंगांची खरी कल्पना येण्याकरितां कांहीं करुण व क्वचित् दारुण प्रसंगांची भर कथानकांत घातली आहे. वस्तुस्थितिनिदर्शक (Realistic) कादंबरींत लेखक मानवी आयुष्यांतील प्रसंगाचें यथार्थ चित्र रेखाटण्याचा प्रयत्न करीत असतो. अशा प्रकारच्या कादंबऱ्या जरी अनेक प्रकारें उद्बोधक ठरल्या तरी त्रासलेल्या मनास विवंचनेचा व दैनिक आयुष्यांतील कटु सत्यांचा कांहीं काळ कां होईना, त्या विसर पाडूं शकत नसतात, व यामुळेंच सर्व वाङ्मयांत अद्भुतरम्य कथांची उत्पत्ति झाली आहे. अशा प्रकारच्या कथांतील मनोरम, सर्वतोपूर्ण काल्पनिक वातावरणांत मानवी मनास अल्पकाळ नेऊन त्यास निकटवर्ति, कठोर बाह्य-जगाची विस्मृति पाडण्यासाठीं लेखकास विश्वामित्राप्रमाणें अभिनव सृष्टि निर्माण करावी लागते. ( मात्र या सृष्टींत सुदैवानें विश्वामित्राच्या पौराणिक सृष्टीप्रमाणें स्त्रीजातीला हाकालपट्टी कधींही देण्यांत येत नाहीं ! ) भौतिक आयुष्यांतील रुढींचे, कल्पनांचे, परिस्थितींचे बांधबंधारे; मानवी सामर्थ्यांच्या स्वाभाविक सीमा; स्थलकालाच्या मर्यादा या काल्पनिक सृष्टींत शक्य तेवढ्या कमी करून सामान्य आयुष्यांत अशक्य वाटणाऱ्या गोष्टी संभवनीय दाखवून मानवी मनाचें

सात्त्विक, श्रेयस्कर रंजन करणें हा अशा प्रकारच्या कथांचा उद्देश असतो. अभिनव सृष्टि निर्माण करून, तिचें काल्पनिक अस्तित्व मोठ्या कौशल्यानें वाचकांस बुद्धि-गोचर करून, त्यांतील सारे व्यवहार तर्कग्राह्य व कार्यकारणभावानें बद्ध करणें हें सामान्य काम नव्हे.

सामान्यतः अशा प्रकारच्या नवल कथांसाठीं अत्यंत काल्पनिक सृष्टि निवडली जाते अगर वर्तमान स्थितीहून बराच वेगळा असा ऐतिहासिक काळ निवडला जातो; पहिल्या प्रकारांत लेखक अत्यंत स्वतंत्र असतो, तर दुसऱ्या प्रकारांत त्यास ऐतिहासिक सत्यास विसंगत असे प्रसंग आपल्या कथेत न आणण्याची खबरदारी घ्यावी लागते; मात्र या दुसऱ्या प्रकारांत सामान्यतः ऐतिहासिक कादंबरी व ऐतिहासिक नवल-कथा असे दोन भेद करणें प्राप्त आहे. ऐतिहासिक कादंबरींत बहुधा इतिहासाला कादंबरीचें स्वरूप देण्यात येतें, तर ऐतिहासिक नवल-कथेत ऐतिहासिक प्रसंगाऐवजीं काल्पनिक प्रसंगास प्राधान्य देण्यांत येतें. या दोन प्रकारांत ऐतिहासिक प्रसंगाचें काल्पनिक प्रसंगाशीं कोणतें प्रमाण असावें, अगर असतें हें ठरविणें शक्य नाहीं व योग्यही नाहीं, परंतु ऐतिहासिक नवल कथेंत ऐतिहासिक काळ काल्पनिक कथेच्या निव्वळ पार्श्वभूमीसाठीं घेणें अयोग्य होणार नाहीं. प्रस्तुत कथा ही दुसऱ्या सदरांत येत असल्यामुळें अठराव्या शतकांतील रजपुतांच्या व मराठ्यांच्या ऐतिहासिक प्रसंगांचा उपयोग काल्पनिक कथेस निव्वळ पार्श्वभूमीदाखल केला आहे. एखाद्या सुंदर चित्रास चौकटीची जेवढी किंमत व जरुरी असते तेवढीच किंमत या ऐतिहासिक पार्श्वभूमीस प्रस्तुत कादंबरीच्या बाबतींत द्यावयाची आहे. एवढें विधान केल्यावर ऐतिहासिक कालाचें विशदीकरण, अगर ओझरतें साक्षीकरण कां करण्यांत आलेलें नाहीं याचें स्पष्टी-करण स्वाभाविकच उघड होण्यासारखें आहे यांचप्रमाणें ऐतिहासिक काळांतील व्यक्ति आजकालच्या भाषेंत कां बोलतात याचेंही उत्तर स्पष्ट होईल.

नवल-कथांत रसराज शृंगाराला स्वाभाविकच महत्त्व येत असतें; यामुळें उत्तान अगर संभोगशृंगार नवल कथांत पुष्कळदां पेरला जाण्याची भीति असते; व अशा प्रकारच्या कथा सदभिरुचीस नेहमींच पात्र ठरतील असें म्हणतां यावयाचें नाहीं. प्रस्तुत नवल-कथा या दृष्टीनें पूर्ण निर्दोष आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय सांपडणें

कठीण ! नव तारुण्यातील स्वाभाविक उन्मादक भावनांचा संचय अशा प्रकारच्या कथांत सर्वदा केला जातो, तथापि ह्या स्वाभाविक व चेतोहर भावनांचें आविष्करण अगर वर्णन सूचक, प्रेरक शब्दांनीं देऊन, गोड परंतु मुग्ध वातावरणांत वाचकास नेऊन सोडण्याची लेखिकेची पद्धत प्रत्येक वाचकास प्रशंसनीय वाटेल यांत कांहीं शंका नाहीं. बारावें अगर पंचविसावें प्रकरण सहज उदाहरणादाखल घेण्यासारखें आहे.

कथेंतील मध्यवर्ती कल्पना, प्रेमाच्या सात्त्विक भावनेचा सूडाच्या तामसी भावनेवरील जय हीच आहे, असें म्हणतां येईल. कथेंतील नायिका, अलक, हिच्या, आपल्या भावाच्या (तिला भासत असलेल्या) खुनाबद्दल सूड घेण्याच्या घोर प्रतिज्ञेवर युवतिसुलभ सात्त्विक प्रेमाचा पगडा बसून शेवटीं कादंबरींतील एका प्रमुख व्यक्तीनें—मुराररावानें—कथेच्या आरंभीं तिला सांगितल्याप्रमाणें 'द्वेषापेक्षां प्रीति श्रेष्ठ असते' (पान ५३) हें तिला पटतें; परंतु हें सत्य पटण्यापूर्वी तिला अनेक दिव्यांतून जावें लागतें व अनेक संकटांच्या शुद्धीकरणानें (purgation) पुनीत झालेल्या भावनामुळें सूडाची आसुरी इच्छा सोडून 'आपल्या प्रेमानें आपण सुखी होऊन दुसऱ्याला सुखी करणें हा केवढा पुण्यसंचय आहे' ही गोष्ट तिला पटते व 'प्रेमाच्या शीतल छायेंत' ती सुखी होते. अलकच्या मनाची ही उत्क्रान्ति फारच मार्मिक व मानसशास्त्राच्या तत्त्वानुसार आहे. आपल्या लाडक्या भावाच्या खुनाचा सूड घेण्याची प्रतिज्ञा प्रथम तीव्र शोकावेगांत करणारी अलक, त्या भावनेची ज्योत कर्तव्यकठोर रजपुत रूढीनुसार व आनुवंशिक संस्कारानुसार प्रज्वलित ठेवते; परंतु कोणत्याही मिषानें कां होईना केलेल्या जखमी सैनिकांच्या निरपेक्ष शुश्रूषेमुळें ती 'दयेची देवी' बनते व प्रेमाचें स्फुलिंग तिच्या हृदयांत उत्पन्न होतें; परंतु सूडाच्या कल्पनेमुळें ती प्रेमविषयापासून दूर जाते. पुढें तारा व मुरारराव यांच्या प्रेमळ जीवनाच्या चित्रानें मोहित झालेली अलक 'तुमचं व तारेचं प्रेममय सुख पाहून स्वर्गसुखाला आंचवलेल्या पाप्याप्रमाणें माझ्या मनाला हुरहुर वाटते हो.' (पान ७४) असें मुराररावाजवळ कबूल करते. अशा प्रकारें स्वतःच्या मनाचें समाधान झालें तरी सूडाची कल्पना सोडल्यास 'माझे जातभाई माझा उपहास करतील' (पान ७५) या भीतीमुळें

आपली 'सैतानी प्रतिज्ञा' त्याज्य ठरविणें तिला शक्य होत नाहीं. 'दुसऱ्या-च्या नशिबीं प्रेम आणि सुख. माझ्या फुटक्या कपाळीं मात्र द्वेष आणि दुःख' असें ती अत्यंत हताश होऊन म्हणते; पण शेवटीं प्रियकराची पुनर्भेट होतांच वर्धिष्णु प्रेमभावना सूडाची प्रतिज्ञा नष्ट करते व द्वेषासारख्या तीव्र भावनेनें करपून जाण्यापेक्षां, 'भाई, प्रेमाच्या कोमल ओलाव्यानं मी फुलूं नको का?...' (पान ८८) असें ती मृतबंधूच्या चित्रास उद्देशून विचारते व शेवटीं सूडासाठीं तिचें मन वळविणाऱ्या स्वार्थी आप्तबांधवांस 'सूड घेणें पाप आहे!' (पान ९१) असें बजावण्याइतकें तिचें परिवर्तन होतें.

अलकच्या मनोविकासाप्रमाणेंच तारा, मुरारराव व विश्वासराव यांचीं स्वभाव-चित्रें स्थिर असलीं तरी चांगलींच रेखाटलीं आहेत. लहानग्या हिरेचें चिमुकलें पात्र न विसरण्याइतकें सुंदर आहे. त्याचप्रमाणें अलक–विश्वासराव यांची गोष्ट व तारा–मुरारराव यांची गोष्ट या दोन आडव्याउभ्या ताण्यांत अनेक व्यक्ति-स्थल-प्रसंगांचे रंगतंतु मिसळून लेखिकेनें कथानकाचें सुंदर जाळें कुशलतेनें विणलें आहे यांत कांहीं शंका नाहीं. नवलकथेंत अशक्य गोष्टी संभवनीय करून वाचकास आपल्या सर्व गोष्टी ग्राह्य ठरविण्यास भाग पडण्याची ( willing suspension of disbelief) मोठी जबाबदारी लेखिकेनें उत्कृष्टपणें पार पाडली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

सर्वांचा नम्र,

**अ. स. गोखले**



# शकुनी मोहर



प्रकरण पहिलें

## मार्गप्रतीक्षा

“ हेंच तें ठिकाण, मला वाटतें.” मुरारराव माने म्हणाले.

“ कसलें ठिकाण महाराज ? ” हा प्रश्न करणारा इसम एक वृद्ध रजपूत होता, व तो चितोडमधील सर्वांत उत्तम सराईचा मालक होता.

“ सूर्य उगवतांच-पंधरा वीस हातांवरील वस्तु दिसणें शक्य झालें म्हणजे— ह्या तुझ्या पटांगणांत एक द्वन्द्वयुद्ध होणार आहे ”

“ म्हणजे काय ! ”

“ काय ! द्वन्द्वयुद्ध म्हणजे काय तें तुला माहीत नाही ? ” मुरारराव आश्चर्यानें उद्गारला, व त्याने थोडक्या शब्दांत त्याला तें माहीत करून दिलें. तें ऐकून तो रजपूत म्हणाला, “ हां-हा, अहो हें सूड उगविणे असें सांगा. आणि या माझ्या पटांगणांत एक सूड उगविला जाणार म्हणतां ? ”

“ होय. हा शास्त्रीय पद्धतीनें उगविलेला सूडच आहे आतां तुला नीट कळलें ना लक्ष्मणसिंह ? ”

“ महाराज, माझे वडील आपल्या शत्रूचा सूड उगवितानाच स्वर्गलोकीं गेले. ” मोठ्या अभिमानानें म्हातारा लक्ष्मणसिंह म्हणाला.

बराच वेळ ते दोघेही आपापल्या विचारांत गुग होते. नंतर तो रजपूत म्हणाला. “ महाराज, आपण आज इकडेच रहाणार ना ? ”

एकदम दचकून मुरारराव म्हणाला, “ होय, माझा तसा विचार आहे खरा; तरी पण माझा घोडा जीन कसून तयार ठेव. कदाचित् मला जावेंही लागेल.” संमति दर्शक मान हालवून लक्ष्मणसिह सांगितलेलें काम बजावावयास गेला व मुरारराव पुन्हा विचारांत मग्न झाला.

आपलें कथानक राजपुतान्यांत सुरू झालें आहे अठरावें शतक त्या वेळीं संपत आलें होतें. रजपूत व मराठे ह्यांच्या सतत लढाया सुरू होत्या व दक्षिणचे मराठे आणि उत्तरेचे मराठे ह्यांचाही बेबनाव होता. शिंदे, होळकर वगैरे सरदार बाह्यात्कारीं जरी आपल्याला पेशव्यांचे अंकित म्हणवीत होते, तरी त्यांना स्वसामर्थ्याची खात्री असल्यामुळें, आपल्या हिताच्या प्रसंगीं ते आपल्या ‘मालका’ची परवा ठेवीत नसत.

आपला कथानायक मुरारराव माने हा एक ग्वाल्हेरचा–उत्तरेचा–मराठा वीर होता. त्याचें वय ह्या वेळीं अठ्ठावीस वर्षांचें होतें. ह्या जगांत त्याला जास्ती कोणीही आप्त नव्हतें, व तो विवाहित नसल्यामुळें त्याच्या मागें एका बहिणीशिवाय कसलाही पाश नव्हता. म्हणूनच शिकारीनिमित्त एका मित्राच्या बोलावण्यावरून तो सिरोहीला पोंचला होता. मुराररावाचा हा मित्र जातीनें अस्सल रजपूत असून त्याचें नांव दुर्जनसिंह असें होतें. सिरोहीला दुर्जनसिंहाच्या वाड्याशेजारीं दुसऱ्या एका श्रेष्ठ रजपूत सरदाराचा वाडा होता. त्या सरदारानें मरतांना आपलीं दोन मातृहीन अर्भकें दुर्जनसिंहाच्या स्वाधीन केलीं होतीं. त्या वेळी दुर्जन कांहीं वयानें फारसा मोठा नव्हता. परंतु त्याला जगाचा चांगला अनुभव असल्यानें त्यानें ह्या दोन्ही मुलांचें नीट पालन केलें. असो.

विचार करतां करतां मुराररावाच्या दृष्टीसमोर आदल्या दिवसाची सकाळ उभी राहिली; त्या वेळीं तो सिरोहीलाच होता. दुर्जनसिंगानें आज आपल्याला वेळ नाहीं असें सांगितल्यावरून, मुरारराव भल्या पहांटेस उठून एकटाच शिकारीस गेला होता. शिकारीहून तो वाड्याकडे परत येतो तों त्याला दुर्जनसिंह बाहेरच भेटला. तो फार आनंदांत दिसत होता. मुराररावानें आनंदाचें कारण विचारतांच तो म्हणाला, “ दोस्त, मीं तुम्हांला त्या पोरक्या भावंडांविषयीं सांगितलें ना ! त्यांतली बहीण आज इकडे आली आहे. हल्लीं चार वर्षें ती जेसलमिरास आपल्या मावशीकडे होती. केवढी मोठी आणि किती सुंदर झाली आहे ती तितक्यांत ! तिचा भाऊ रजपूत सैन्यांत शिलेदार आहे. तो चार पांच दिवसांत

इकडे येणार आहे; म्हणून त्याला भेटायला ही आली आहे. मीं तिला लांबूनच पाहिलें. अजून भेटलों नाहीं. म्हटलें, तिला प्रवासाचा त्रास झाला असेल." उतावळ्या स्वरांत एवढें लांबलचक भाषण करून दुर्जनसिंहानें मुराररावाचा हात धरून त्याला जवळजवळ ओढीतच वाड्यांत नेलें.

पहिलें दालन ओलांडून ते दोघे पलीकडे गेले. त्यांनी आंत पाऊल ठेवितांच एक तरुणी उठून उभी राहिली. जरा साशंक नजरेनें मुराररावांनीं तिच्याकडे पाहिलें. ती निःसंशय सुंदर होती; पण त्या सौंदर्याबरोबर तिच्या मुद्रेंत विलक्षण हुकुमत व पाणीदारपणा दिसत होता. तिच्या काळ्याभोर डोळ्यांत तिच्या पवित्र हृदयाचें प्रतिबिंब दिसत होतें. तिची हनुवटी किंचित् लांब असून ती करारीपणांत भरच टाकीत होती. मुराररावानें मनांतल्या मनांत तिला एक विशेषण बहाल केलें. तें म्हणजे, " बिजली." आणि खरोखरीच ती बिजलीसारखी चपल व तेजस्वी दिसत होती. तिला पाहून मुराररावाला एक प्रकारची भीति वाटली— त्या वेळीं कदाचित नसली तरी—पुढे त्याला भीति वाटली.

किंचित् हंसून ती पुढें आली. तेव्हां पालकाच्या हक्कानें, तिला जवळ घेण्यासाठीं दुर्जनसिंह तिच्याकडे वळला, पण त्याचा हात पाठीवर लागतांच चपलतेनें बाजूला सरून आपल्या हुकुमी स्वरांत ती म्हणाली, " हं, काकाजी ! आतां मी मोठी झालें आहें." व खाली वांकून तिनें त्याला प्रमाण केला.

जगामध्यें आपण चाळीस वर्षें घालविलीं तीं व्यर्थ असें वाटून, जरा रागानें दुर्जनसिंहानें अधरदंश केला; पण लगेच मन आंवरून व थोडेंसें स्मित करून त्यानें तिला आशीर्वाद दिला. क्षणार्धांत मुराररावाच्या मनांत एक कल्पना येऊन गेली. दुर्जनसिंह हिच्यावर प्रेम करतो तर! शिवाय तिचा मघाचा तो चेहरा व त्या वेळचा दुर्जनसिंहाचा अधरदंशही मुराररावाच्या लक्षांत होताच; ठीक, दोन व दोन मिळून चार होतातच. दुर्जनसिंहाचें कुमारीवर प्रेम जडलें असून, स्त्रियांच्या नैसर्गिक चातुर्यानें तिनें तें ताडून दुर्जनसिंहाला टाळलें. आतां दुर्जनसिंह मुरार रावाकडे निर्देश करून म्हणाला, " अलककुमारी, हे माझे मित्र मुरारराव माने, समजलीस ? "

जरा हंसून अलककुमारी म्हणाली, " आपण स्वतंत्र बाण्याचे मराठे वीर ! आपली भेट झाल्यामुळें मला खरेंच भारी आनंद झाला ! "

" एकूण मराठ्यांबद्दल आपलें चांगलें मत आहे तर ! "

" जुलमी लोकांचा मी द्वेष करितें, परतंत्र लोकांचा मला तिटकारा येतो, पण तुमची–स्वतंत्र मराठ्यांची–गोष्टच निराळी आहे."

" मी मराठ्यांच्या कुळांत जन्माला आलों हे माझ्यावर ईश्वराचे उपकारच आहेत तर ! " अलककुमारीबद्दल मुराररावाला अकारण स्नेह वाटूं लागला, व अलककुमारीला मुराररावांविषयीं आदर वाटूं लागला. परंतु, दुर्जनसिंहाला कदाचित् आवडणार नाहीं म्हणून जास्ती न बोलतां ती गप्प बसली. कांही तरी बोलले पाहिजे म्हणून शिष्टाचारासाठीं दुर्जनसिंह गंभीरपणें म्हणाला, " अलक, बेटा एक गाणे म्हण पाहूं." अलककुमारी तिकडून उठली, व थोडया अंतरावर असलेल्या एका खिडकीकडे जाऊन उभी राहिली. त्यांच्याकडे पाठ करून तिनें गावयास सुरुवात केली. ती जें गाणे म्हणत होती, तें सिरोहीप्रांतांत फारच प्रसिद्ध असून ते तिकडल्या रजपुतांनीं आपलें राष्ट्रीय गीत केलें होते. कसल्याही मंगल प्रसंगीं हें गाणें ते हटकून म्हणत. 'सूड' हा त्या गाण्याचा विषय होता. सूडाची कल्पना व प्रतिज्ञा ही एक पवित्र भावना आहे, हें त्यातील मुख्य सार. प्रारंभीं अलक हळुहळू गात होती, पण नंतर ती त्यात इतकी रंगली कीं, तिनें आता खुल्या आवाजांत गावयास सुरुवात केली. पद साधेच होतें, पण तें तिच्या फारच आवडीचें असल्यामुळे, तें उत्तमच वठलें. गाणें संपल्यावर मुरारराव उठून तिच्याजवळ गेला व म्हणाला, " अलककुमारी, आपण उत्कृष्ट गाता ह्यांत शंकाच नाहीं, पण मी विचारतों त्याबद्दल रागावूं नका. आपल्या कुळांत कुणीं उगवला होता काय सूड ? " हास्यमुखानें अलक म्हणाली, " गेल्या तीन पिढ्यांत नाही कोणीं उगवला; पण आमच्या कुळाला एकलिंगजींचा असा वर आहे कीं प्रत्येक तिसऱ्या पिढींत सूड घेतला जातोच. आमची ही तिसरी पिढी आहे; पण तीन आम्ही सारेीं तिघेंच आहोंत. मीं, माझा भाई विजयसिंह, आणि तिसरा दयाळसिंह, आमच्या लहानपणापासून आमच्या घरीं नोकरी करणारा आमचा दूरचा नातलग. आज भाईचें मला पत्र येईल. आणखी दोनच दिवसांनीं मला तो भेटेल. अग्गबाई, घोड्याच्या टापा ऐकूं येतात. भाई तर नसेल ? मला चकित करावें म्हणून ठरलेल्या वेळाच्या अगोदर आला असेल ! होय बाई, भाईच असेल तो ! " अत्यंत उत्सुकतेनें, एखाद्या लहान मुलीसारखी धांवत ती बाहेर गेली. तें पाहून एक सुस्कारा सोडून दुर्जनसिंह म्हणाला, " अच्छा मुरारराव, तुम्हांला अलकचे काढविलेलें चित्र दाखवूं काय ? " एवढें बोलून

त्यानें एक पडदा बाजूला सारला. नखशिखान्त रजपूत पोषाक केलेल्या अलक-कुमारीची ती सुंदर रंगीत प्रतिमा होती; प्रतिमेंतील मोतिया रंगाची ओढणी तिच्या नाजुक शरिराला फारच खुलून खुलवीत होती. मुरारराव तें चित्र निरखून पहाण्यांत गढला होता. चित्राच्याखालीं कोरलेलें 'मार्गप्रतीक्षा' हें नांव वाचून तो म्हणाला, " आं ! कुठल्या बरं भाग्यवान तरुणाची ही मार्गप्रतीक्षा करीत आहे ? "

" ह्य, काय नि काय ! विजयाची मार्गप्रतीक्षा करीत आहे ! त्याच्याखेरीज दुसऱ्या कोणावरच ती प्रेम करीत नाहीं. तीं दोन भावंडें एकमेकांच्या सहवासानच वाढलीं असल्यानें, तिच्या हृदयांत दुसऱ्या कसल्या प्रेमाला थाराच नाहीं." शून्य स्वरात दुर्जनसिंहानें दिलेलें हें उत्तर बोलून संपतें तोंच अलक आंत आली; " माझ्या भाईचें—माझ्या विजयाचें पत्र आलेंय. तो आज चितोडला पोंचला; आणखीन् दोन तीन दिवसांनीं इकडे येणार म्हणतोय, माझी भारी निराशा झाली, मुरारराव." तिचें आतां आपल्या प्रतिमेकडे लक्ष गेलें. " भाई येईल त्या दिवशीं मी अस्साच पोषाक करणार, हीच ओढणी घेणार त्याला ती भारी आवडते. या पोषाखांत तो माझ्यावर जास्ती प्रेम करील, नाहीं ! "

" मुरारराव, चला आपण जाऊं या. आपल्या भावाशिवाय आतां ती कोणाचाच विचार करणार नाहीं." दुर्जनसिंह हळूच म्हणाला. अलकचा निरोप घेत असतां तिच्या हातांतील फुलांच्या गुच्छाकडे लक्ष जाऊन दुर्जनसिंह म्हणाला, " अलक तीं फुल देतेस का मला ! "

एक वेळ त्या फुलांकडे पाहून अलकनें तीं झटादिशीं मुराररावाच्या हातांत सारलीं. रागानें दुर्जनसिंहानें मुराररावाकडे व त्याच्या हातांतील फुलांकडे दृष्टिक्षेप केला. तें पाहून अलक हसत हंसत म्हणाली, " काकाजी, असे रागावतां काय ? तीं फुलें कांही मीं मुराररावांना नाहीं दिलीं. ते आतां चितोडला परत जाणार असें कळलें, तेव्हां तिकडे रजपूत सराईत माझा भाई त्यांना भेटेल, त्याला तीं द्यावयाचीं. आणखीन् ऐकलंत का मुरारराव, भाईला सांगा की, तुझी लाडकी अलक तुझ्या आवडीचा पोषाख घालून तुझी मार्गप्रतीक्षा करीत आहे, व तिनें हीं फुलें दिलीं आहेत. मुरारराव, तुम्ही त्यांचा वाससुद्धां घेऊं नका, बरें का. तीं सर्वस्वीं माझ्या विजयासाठीं आहेत ! "

वाड्यांतून बाहेर पडल्यावर दुर्जनसिंह व मुरारराव घोड्यावर स्वार होऊन हळुहळू निघाले. कांहीं कामासाठीं दुर्जनसिंहाला शेजारच्या खेड्यांत जावयाचें होतें. थोड्या वेळानें मुरारराव म्हणाला, "आमच्या दक्षिणेंतल्या मराठा तरुणी धीट व चतुर असतात खऱ्या, पण अशी कुमारी मीं कधीं पाहिलीच नाहीं."

"नवल काय? अहो, सगळ्याच तरुणी जर अशा उद्दीप्त भावनेच्या निघाल्या तर मुळीं जग चालणारच नाहीं ना! अलकच्या अंगांत दोन अस्सल रजपूत गुण आहेत. एक स्वदेशप्रीति, व दुसरा स्वकुलाभिमान. तिला आपल्या उच्च कुलाचा विलक्षण अभिमान आहे. बाकी मुरारराव, हेंही लक्षांत ठेवा कीं, सगळ्याच रजपूत तरुणीसुद्धां कांहीं इतक्या तेजस्वी नसतात. हंऽ! तिचा भाऊ जिवंत असतां ती दुसऱ्या कोणावर प्रेम करील अशी आशाच नको."

"पण समजा, ती दुसऱ्यावर प्रेम करूं लागली तर!" हसत हंसत मुरारराव म्हणाला "माझ्या देहांत प्राण असेपर्यंत तें शक्य नाहीं." रागानें–किंवा दुसऱ्या कसल्या मनोविकारानें असेल–दुर्जनसिंहाचा गौर चेहरा लाल झाला. सहजच मुररराावानें वर पाहिले, व तावडतोब त्याला दुर्जनसिंहाचें अंतःकरण स्पष्ट कळलें.

इकडे त्यांचे रस्ते वेगळे झाल्यामुळें मुराररावाने त्याचा निरोप घेतला व तो चितोडच्या रस्त्याला लागला.

काळोख पडल्यावर मुरारराव मुक्कामाला आला. अलकच्या निरोपाची आठवण होऊन तो तिकडील सर्वांत उत्तम रजपूत सराईंत गेला. त्या ठिकाणीं आणखी तिघे प्रवासी होते. दोघे रजपूत व एक मराठा. मुरारराव आत शिरला त्या वेळीं त्यांतील एका रजपुताबरोबर त्या मराठ्याचें कडाक्याचे भांडण चाललें होतें. चिडीस जाऊन मराठ्यानें रजपुताच्या तोंडावर एक गुद्दा लगावला. त्यासरशीं रजपूत युवक खाली पडला. परत उठून तो त्याबद्दल वचपा काढणार, तोंच त्या दुसऱ्या रजपुतानें त्याला थोपवून धरलें, व त्याच्या कानांत कांहींसें सांगितलें. त्याबरोबर शांत होऊन तो रजपूत युवक मराठ्याजवळ आला व त्यानें मराठ्याला द्वन्द्वयुद्धाचें आव्हान दिलें. परंतु मराठ्यानें तें नाकारलें. तें ऐकून मुराररावाला आश्चर्य वाटलें. रजपुतानें मराठ्याच्या भित्रेपणाबद्दल तिरस्कार दर्शविला. तेव्हां दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर अर्ध घटकेनें त्या सराईच्या पाठीमागें असलेल्या

पटांगणांत द्वन्द्वयुद्ध खेळण्याचें त्या मराठयानें कबूल केलें; व ते तिघेही बाहेर गेले.

मुराररावाला या गोष्टीबद्दल कांहींच जिज्ञासा वाटली नसती; कारण त्यानें पुष्कळ च द्वन्द्वयुद्धें पाहिलीं होतीं, व कांहींमध्यें त्यानें स्वतः भागही घेतला होता. परंतु तो रजपूत युवक निघून जात असतां, त्याच्या कमरपटयांतून पडलेला एक लखोटा मुराररावाला आढळला. तो त्यानें उचलून खिशांत ठेवला व तावडतोब एका जासुदाबरोबर दुर्जनसिंगाला मोठ्या तांतडीनें कांहीं निरोप पाठविला.

दुसऱ्या दिवशीं भोठ्या पहांटे अलककुमारीसाठीं म्हणून मुरारराव परत त्या म्हणजे लक्ष्मणसिंहाच्या सराईत आला. त्या वेळीं त्याचें लक्ष्मणसिंहाबरोबर झालेलें भाषण प्रकरणाच्या प्रारंभीं आलें आहेच मुराररावाला एवढी यातायात करण्याचें कारण रजपूत युवकाच्या पट्टयांतून पडलेल्या त्या उघड्या लखोटयावर " सरदार विजयसिंह चौहान " हें नांव होतें.

प्रकरण दुसरें

# आगमन

नुसता विचार करणे आता असह्य होऊन मुरारराव उठला व लक्ष्मणसिंहासह सराईच्या पायऱ्यांवर उभा राहून तो सिरोहीच्या रस्त्याकडे उत्सुकतेनें पाहूं लागला, परंतु त्या रस्त्यानें कोणीच येतांना त्याला दिसेना. द्वन्द्वयुद्धाची वेळ जवळ येता येता मुाररावाची चळवळ वाढू लागली. "जर अलककुमारी इतक्यांत आली तर बहुतकरून तिचा भाऊ कांहीं युद्ध करणार नाहीं. उघडच आहे. मींदेखील तसेंच केलें असतें. मला जर अशी भगिनी असती तर द्वन्द्व-युद्ध खेळून, तिला या जगांत एकटी ठेवून जाण्याचें भलतेंच साहस मीं कांहीं केलें नसतें." तो अर्धवट स्वतःशीं पुटपुटला. नुकत्याच दिशा उजळायला लागल्या होत्या, कटाळून मुरारराव आत जाणार तोंच दोन इसम सराईकडे येतांना त्याला दिसले. त्यांतला एक आदल्या दिवसाचा मराठा होता, व दुसरा त्याचा एखादा मित्र असावा अशी मुाररावानें अटकळ बांधली. "अरेरे, हे तिच्या अगोदर आले. काय करणार ! असो. आपल्या हातून होईल तें करावें, झाल. बाकी हा मराठा अगोदर भेटला हें एकंदरींत बरें झालें." एवढें बोलून मुरारराव त्यांच्या जवळ जाऊं लागला. त्याच्या मनात कांहीं कल्पना येऊन तो थोडें हंसला. त्यानें आजूबाजूला पाहिलें. तो रजपूत कांहीं अद्यापि आला नव्हता, मग त्याला आज युद्ध करितां येत नाहीं असें सांगून जर आपण त्याच्याऐवजीं युद्ध केलें तर ! पण नको, जर अलकला तें कळलें, तर तिच्या भावाच्या शीलाला मीं कमीपणा आणला असें वाटून तिला माझा राग येईल. छे, तें ठीक नाहीं. असा विचार करून मुरारराव वाटेंतच थबकून उभा राहिला व त्या मराठ्यांना ओरडून म्हणाला, "अहो वीरहो, इकडे या जरा. मीही एक जातिवंत मराठाच आहें. तुम्हांला जर भूक लागली असेल तर इकडे येऊन कांहीं खा, अगर थोडा मोरावळा खाऊन पाणी प्या. माझें नांव मुरारराव माने ऊर्फ वीर मुरारराव." त्या दोघां मराठ्यांनीं दचकून मुाररावांकडे पाहिलें. व त्यांतील एक जो द्वन्द्वयुद्ध खेळणार होता तो, मान देण्याच्या उद्देशानें किंचित् हंसून म्हणाला, "आपले आम्ही फार आभारी आहोंत; पण आम्हांला भूक अगर तहान कांहींच लागलेली नाहीं व वीर मुरारराव, कांहीं विशिष्ट कामासाठीं आम्ही इकडे आलों

आहों." मुरारराबांच्या वागणुकींत अशी कांहीं गोम होती कीं, त्याला एकदां पाहून तो अगदीं कमकुवत मनाचा आहे, असा पहाणाऱ्याचा समज होई; पण अधिक परिचयानंतर आपला तो समज चुकीचा आहे हें त्यांना कळून येई.

आपल्याला त्यानें अगदींच पुळचट ठरविलें आहे हें त्याच्या स्वरावरून नीट लक्षांत आलें असतांही मुरारराव पुन्हा म्हणाला, " अहो, पण त्या विशिष्ट कामा विषयींच मला कांही बोलायचें आहे, तेव्हा जरा इकडे या."

एकमेकांत कांहीं कुजबुजून ते दोघे मुरारराबाकडे येऊं लागले. आदल्या रात्रींचा तो मराठा उंच व वर्णानें गोरा असून तोंडावरून सुस्वभावी दिसत होता. तर दुसरा ठेंगणा व काळसर असून थोडा क्रूर दिसत होता. जवळ येतांच त्यानेंच बोलावयास सुरुवात केली. " आमच्याकडे याच कामाविषयीं बोलावयाचें आहे असें तुम्ही म्हणाला, तर हेंच म्हणजे कोणतें काम तें सांगा बघूं ! "

त्या उंच मराठ्याकडे बोट करून मुरारराव म्हणाला, " याचा अपमान झालेला आहे व त्याबद्दलचेंच हें काम आहे नाहीं का ! द्वन्द्वयुद्ध खेळण्यासाठीं ते इकडे आले आहेत काय बरोबर ? "

" समजलें. पण कोणाबरोबर युद्ध करणार ? " कावेबाजपणानें त्या ठेंगण्या मराठ्यानें विचारलें.

" सरदार विजयसिंह चव्हाण ह्यांच्याबरोबर ! "

अस्सें ! मग आपण त्या रजपुताची वकिली करावयास इकडे आलां आहांत कीं काय ? "

" नाही. मी माझ्या स्वतःच्या कामासाठीं इकडे, तुमच्याकडे बोलावयास आलों आहें."

" म्हणजे ! तुम्हांला काय हक्क ? " उद्दामपणानें तो गुरगुरला.

" मी त्याच्या बहिणीचा एक हितचिंतक आहें."

" त्याची बहीण ! " आश्चर्यानें तो उद्गारला, व त्यानें आपल्या मित्राकडे पाहिले. त्या उंच मराठ्याचे डोळे एकाएकीं मृदु झाले; त्यानें आपली मान चट्दिशीं बाजूला फिरविली, परंतु त्या ठेंगू मराठ्याच्या मनावर कांहींएक परिणाम झाला नाहीं. अगदीं कुत्सित स्वरानें तो पुढें म्हणाला, " एहेऽ! आपण त्याच्या बहिणीचे प्रियकर आहांत वाटतें ! तिच्या भावाची तिच्याविषयींची जबाबदारी आपणावर घेण्याइतका लाळघोटेपणा आपण तिच्याकडे करीत असाल, नाहीं ?

अगदीं एकसारखा तिच्यापुढें गोंडा घोळतां ना? वाहवा, ठीक! हेऽहेऽहेऽऽ!"
आपल्या तर्ककौशल्यावर व विनोदी भाषणावर खुष होऊन तो एकटाच हंसत होता.

"मी तिच्याकडे लाळघोंटेपणाही करीत नाहीं व गोंडाही घोळत नाहीं. मी वीर मुारराव आहें, समजलें?" मोठ्या कष्टानें राग आंवरून मुारराव म्हणाला.

हे शब्द ऐकून तो ठेंगणा मराठा हसतां हंसतां थांबला, व कांहींसा विचार करून म्हणाला, "वीर मुारराव! आं? तिरंदाजींत आणि शब्दवेध करण्यांत नांवाजलेले वीर ते आपणच कीं काय?"

"होय, तोच मी!" आणि ह्या दोन गोष्टींत मुाररावाचा हात धरणारा त्या वेळीं खरोखरीच कोणी नव्हता.

"अरे वाः, खूप केलीत! राव आधीं तरी हें सांगावें कीं नाहीं? परंतु हें युद्ध लौकर आटोपलें पाहिजे. आणखी घटकाभरात कूच करण्याचा आमच्या वरिष्ठाचा आम्हांला हुकूम आहे आणखी पाव घटकेच्या आंत तो रजपूत आला तर ठीक, नाहीं तर आम्ही चाललो!"

"होय का? मग जरा आंत येऊन थोडें पाणी प्या, त्यामुळें तुमचें डोकें थंड होईल." असें म्हणून मुाररावानें सराईच्या मालकाला तांब्या व पंचपात्री आणावयास सांगितलें. ते दोघे पाणी पीत होते. तोंवर मुारराव रस्त्यावर एक फेरफटका करून आले. पहिल्यांदा त्यांना तिकडे चिटपांखरूंही दिसलें नाहीं. पण थोड्या वेळानें बऱ्याच अतरावर धुळीचा एक अंधुक लोट दिसूं लागला. जर ती अलक असली तर आणखी अर्ध्या घटकेत ती इकडे पोंचेल मुारराव आंत येण्यासाठीं वळणार, तोंच लांब उजव्या बाजूनें दोघे रजपूत इसम येतांना त्याला दिसले. बहिणीला उशीर होणार, पण भाऊ मात्र वेळेवर पोंचणार हें त्याला कळून चुकलें. मुारराव आंत त्या उंच मराठ्याजवळ गेले, व म्हणाले, "द्वन्द्वयुद्धासारख्या नाजुक बाबतींत माझ्यासारख्या त्रयस्थानें कांहीं बोलावें हें जरा विचित्र आणि उद्धटपणाचें दिसेल खरें; पण युद्धाला सुरुवात करण्यापूर्वी तुम्हांला तुमच्या रजपूत प्रतिस्पर्ध्याच्या बहिणीविषयीं कांहीं सांगण्याची माझी इच्छा आहे."

एवढा वेळ स्तब्ध असलेला तो उंच मराठा आतां पहिल्यांदाच बोलला, "त्याची बहीण! असल्या दुःखदायक गोष्टींत तिचें नांव कां बरें गोंवतां? तिचा काय त्यांत संबंध!" बहीण हा शब्द उच्चारतांना त्याचा आवाज फारच मृदु झाला.

" तिचा त्यांत पुष्कळच संबंध आहे. तुम्हांला नाहीं का एकादी बहीण ? "

" आहे, आणि तीही फार लाडकी आहे; पण आजच्याप्रमाणें आपला भाऊ गमावण्याची वेळ तिच्यावर पुष्कळदां आलेली आहे, तशीच आतां त्याच्या बहिणीवर आली आहे. खरेंच सांगतों, देवाची शपथ आहे तुम्हांला. कृपाकरून आतां या वेळेला घराची किंवा बहिणीची गोष्ट माझ्याकडे काढूं नका."

" मीं तुमच्या बहिणीविषयीं कांहीं बोलत नाहीं, त्याच्या बहिणीविषयीं बोलतों. मग तर झालें." असें म्हणून मुरारीरावानें थोडक्या शब्दांत सिरोही-मधल्या अलकच्या वाड्याचें, स्वतः अलकचें, फक्त बंधुप्रेम जाणणाऱ्या तिच्या भावनाप्रधान अंतःकरणाचें, व पुष्कळच वर्षांनीं भेटावयास येणाऱ्या प्रियबंधूची मार्गप्रतीक्षा करीत असलेल्या तिच्या आशातुर स्थितीचें चित्र त्यांच्यापुढें रेखाटलें आणि " आतां मीं एवढें सांगितल्यावर त्या प्रेमळ भावंडांच्या भेटींत व्यत्यय आणण्याचें पातक तुम्ही कराल काय ? " असा प्रश्न विचारला. प्रश्न अगदीं सरळ असल्यामुळें त्या मराठ्यानें कानांवर हात ठेवून लगेच उत्तर केलें, 'शिवशिव, काय हें विचारतां ? जर टाळणें शक्य असेल तर केव्हांही मी हें नीच कृत्य करणार नाहीं ! "

" आणि तें टाळणें तुमच्या हातांत आहे."

" तें कसें काय ? "

" त्याची क्षमा मागितल्यानें." मघांच्या सरळ प्रश्नापेक्षांही आतांचें हें सरळ उत्तर ऐकून त्या ठेंगू मराठ्यानें कपाळाला आंठ्या घातल्या, व तो आपल्या-शींच कांहीं पुटपुटला. त्या दोन मित्रांच्या स्वभावांतील ही तफावत पाहून मुरारीरावाला फारच आश्चर्य वाटलें. तो उदार मनाचा उंच मराठा आपल्या मित्राला डोळ्यानें दाबून म्हणाला, " तुम्हीं आतां वर्णन केलेल्या त्या कुमारीबद्दल मला फारच सहानुभूति वाटते, पण तिचा भाऊ माझ्याचसारखा सैन्यांत शिलेदार आहे ना ! मग त्याचा शब्द त्यानें पाळला पाहिजे. त्याला मारण्याची कांहीं माझी इच्छा नाहीं, फक्त माझें स्वतःचें रक्षण करण्याची तेवढी माझी इच्छा आहे."

" ठीक आहे; पण जर त्यानें तुम्हांला मारलें तर ? "

" तर जगांतला एक मराठा नाहींसा होईल ! "

" आणि जर तुम्हीं त्याला मारलें तर ? "

" मीं तुम्हांला पहिल्यांदाच सांगितलें आहे कीं, त्याला मारण्याची माझी इच्छा नाहीं. तें असो. पण माझ्या परिस्थितींत असल्यावर तुम्हीं क्षमा मागितली असती काय ? "

" जर माझी चुकी असती तर ती मी मोठ्या आनंदानें ती मागितली असती."

" परंतु ह्या बाबतींत माझी कांहींच चुकी नाहीं. निदान असलीच तर त्याची आणि माझी दोघांचीही सारखीच आहे."

यावर कांहीं न बोलतां मुराररावानें परत सिरोहीच्या रस्त्याकडे डोळे वळविले, तो धुळीचा लोट थोडा जवळ आल्यानें आतां जास्ती स्पष्ट दिसूं लागला होता; परंतु ते दोघे रजपूत तर आतां बरेच जवळ आले होते. शेवटचा प्रयत्न करण्याच्या उद्देशानें मुरारराव त्या उंच मराठ्याला म्हणाला, " तुमचें भांडण कांहीं राजकारणावरून सुरू झालें, होय ना ? प्रारभीं कांहीं तें व्यक्तिविषयक नव्हतें." " होय, त्यानें माझ्यावर असत्यवादीपणाचा आरोप करीपर्यंत तें व्यक्तिविषयक नव्हतें. कबूल ! "

" आणि त्यासाठीं तुम्हीं त्याच्या तोंडावर गुद्दा लगावलात ? "

" असला अपमानास्पद शब्द ऐकून कोठलाच बाणेदार मराठा स्वस्थ बसणार नाहीं ! "

" खरें आहे. मीही असला अपमान निमूटपणें गिळणार नाहीं; परंतु त्याच्या तोंडावर गुद्दा मारल्यानंतर त्याचा प्राण घेण्याविषयीं मग मी विशेष उत्सुक राहणार नाहीं."

" मीही त्या बाबतींत उत्सुक नाहीं."

" मग तुम्ही क्षमा कां बरें मागत नाहीं ? मागाल काय ? "

" हो—य." जरा विचार करून अनिच्छेनें तो उमदा मराठा म्हणाला. हें उत्तर ऐकून त्याचा मित्र त्रागयानें दूर जाऊन उभा राहिला त्याला जाताना पाहून जरा हंसून तो उंच मराठा म्हणाला, " जर मला किंवा माझ्या शिलेदारीला कोणत्याही रीतीनें कमीपणा येत नसेल तर मी क्षमा मागायला तयार आहें."

अत्यंत उत्सुकतेनें त्याचा हात धरून मुरारराव म्हणाला, " एकाद्या उमद्या शूराला योग्य असेंच हें उत्तर आहे. तुम्हीं यापेक्षां जास्ती कांहीं करावें अशी माझी मुळींच इच्छा नाहीं."

" पण समजा, जर मीं केलेलें विवेचन त्यानें ऐकून घेतलें नाहीं तर ? "

" त्याची काळजी नको. मी त्याला ऐकून घ्यावयाला लावीन." ही खात्री देतांना अलकनें दिलेल्या फुलांबरोबरचा निरोप मुराररावाच्या मनांत घोळत होता, व त्यासाठीं तरी तिचा भाऊ ह्या मराठ्याचें विवेचन ऐकून घेईल असें त्याला वाटलें, आणि तो तसें उघड बोलला. तें ऐकून तो मराठा म्हणाला, " त्याच्या बहिणीकडून निरोप ? अहाहा ! हें ऐकून मला फार आनंद वाटतो. केलेला आहे त्याहून अधिक अपाय मीं त्याला किंवा त्यानें मला करावा अशी माझी खरोखरीच इच्छा नाहीं. अशा कामांत जोडीदार म्हणून बरोबर आणावयाला हा माझा मित्र अगदीं योग्य नाहीं हे मला कळतें तो पूर्ण विश्वासू व शूर असला तरी पण फार तापट डोक्याचा आहे " हें शेवटलें वाक्य तो अगदी हलक्या स्वरांत बोलला. त्यावर मुरारराव उद्गारला " तारुण्यांतील रक्त असेंच नेहमीं सळसळत असतें, नाहीं ? "

ते खरें, पण माझ्या दुसऱ्या कोठल्याही मित्राला फुरसद न झाल्यानें ह्याला आणावा लागला आपल्याला लागेल असें तर तो कांहीं बोलला नाहीं ना ? तसें असल्यास मला फार वाईट वाटेल."

" छे–छे, तसें कांहींच नाहीं " परंतु एवढयांत ज्याच्याविषयीं ते बोलत होते तो ठेंगू मराठाच तिकडे आला, व आपल्या मित्राकडे जाऊन म्हणाला " मग एकूण तुम्ही क्षमा मागणारच ? "

" होय. तुम्हांला गुद्दा लगावल्याबद्दल माझ्या मित्राला वाईट वाटतें एवढाच माझा निरोप तुम्हीं त्याला कळवायचा."

" एवढाच ! आणखी नाहीं ना कांहीं ? "

" नाहीं."

" आणि जर त्यानें हें ऐकून घेतलें नाहीं तर ? "

" तर मी योग्य त्या रीतीनें माझ्या शीलाचें व प्राणाचें सरंक्षण करीन."

" ओ ! मग हरकत नाहीं. सांगेन मी त्याला तुमचा निरोप, खुषीनें सांगेन."

" अस्सें ! ते कसें काय बुवा ? " मुरारराबानें आश्चर्यानें प्रश्न केला.

" कसें काय म्हणजे ? तो रजपूत हा निरोप कधींच ऐकून घेणार नाही." एवढें बोलून त्यानें दोन उत्तम तिरकमठे मुरारराबाला दाखविले. ते तिरकमठे हातांत घेऊन मुरारराव म्हणाला, " तुम्ही हे वापरणार ? "

" होय. दुसऱ्या कसल्याच शस्त्रांची जोडी आयत्या वेळीं आम्हांला मिळेना. बाकी ही जोडी उत्तमपैकीं आहे ! "

मुरारराावानें आतां त्या उंच मराठ्याला विचारलें, " बरें, वेध करण्यांत तुमचा नेम कसा काय आहे ? "

" चांगलासा नाहीं कांहीं ! "

" खूप आहे बुवा ! मग तुमच्यासारख्यांच्या हातून असल्या तिरकमठ्यानें अचूक लक्ष्यवेध होणार." तिरकमठे खालीं ठेवीत असतां सहज मुराररावाचें लक्ष एका तिरकमठ्याच्या दांड्यावरील नक्षीकडे गेलें. त्या नक्षीमध्यें " शिलेदार विश्वासराव शिर्के " असें नांव कोरलेलें होतें. हे दोघे मराठे कोण असावेत याबद्दल मुराररावाला फारच जिज्ञासा लागून राहिली होती. कारण आपापसांत बोलतांना सुद्धां एकमेकांना नांवानें हांक न मारण्याची सावधगिरी ते बाळगत होते. " माझी खात्री आहे, कीं नवशिका इसम या तिरकमठ्यानें लक्ष्यवेध करील- तुमच्या प्रतिपक्ष्याला मारावें अशी तुमची इच्छा आहे काय ? " मुरारराव त्या उंच मराठ्याला म्हणाला.

" नाहीं ! "

" अच्छा, मग नेम अचूक कसा मारावा त्याचप्रमाणें तो अचूक कसा चुकवावा तें मी तुम्हाला सांगतों. ऐका. लक्ष्याच्या उजव्या बाजूला दोन हात लक्ष्य कल्पून जर बाण मारलात तर वेध अचूक होईल ! "

" अस्सें ! बरें, आतां नेम कसा चुकवावयाचा तें सांगा बघूं."

" सरळ त्याच्या काळजावर नेम धरून मारा, म्हणजे तो पूर्ण निर्धास्त ! " मुरारराव ऐटींत म्हणाला.

" ह्या माहितीबद्दल मी आपला फार आभारी आहें. परंतु माझा प्रतिपक्षी जर इतक्यांत आला नाहीं तर मला तसेंच जावें लागणार." तो उंच मराठा हे शब्द बोलतो तोंच त्याच्या मित्रानें त्या दोघां रजपुतांना येतांना पाहिलें व तो म्हणाला, " ध्या, हाच ना तुमचा प्रतिपक्षी ? "

" होय." असें म्हणून तो उंच मराठा घाईघाईनें पुढें बोलला, " वीर मुरारराव, आपले माझ्यावर फार उपकार झाले आहेत आणि तरीही आमचीं नांवें आम्हीं तुम्हाला सांगितलीं नाहींत ह्याबद्दल क्षमा करा व कृपा करून आमचे चेहरे विसरून जाण्याचा प्रयत्न करा. कारण आमच्या वरिष्ठांना जर ह्या द्वंद्वयुद्धाबद्दल कळलें तर आम्हांला बडतर्फ करण्यांत येईल."

" तुम्ही कांहीं काळजी करूं नका. तुमची माझी भेट झाली होती हें बहुत-करून आजच्या आजच मी विसरून जाईन." मुरारराव उत्तरला.

" मुरारराव, तुम्हांला दिलेलें वचन मी विसरणार नाहीं. कारण तो माझा एका मराठ्याचा-शब्द आहे." एवढें बोलून तो उंच मराठा आपल्या मित्रासह युद्धाच्या जागेकडे गेला. ते दिसेनासे झाले तोंच ते दोघे रजपूत सराईजवळ येऊन पोहोंचले; परंतु सिरोहीच्या रस्त्यावरला तो धुळीचा लोट अजून जवळ जवळ कोसभर दूर होता. तिकडून जवळच असलेल्या एका उंचवटयावर चढून मुरारराव लांबवर पाहूं लागला. धुळीच्या लोटांत त्याला आतां कांहीं आकृति दिसूं लागल्या. त्यात अलक असेल काय ! जर त्या दोघां भावंडांची भेट झाली तर अलकसाठीं तिचा भाऊ माघार घेईल काय, इत्यादि विचार करीत मुरारराव सराईकडे परत फिरला. अलकच्या भावाला कांहीं तरी सांगावें किंवा त्याच्याबरोबर येणाऱ्या त्या रजपूताशीं तरी निदान बोलावें अशा हेतूनें मुराररावा त्या दोघांच्या जवळ जाणार तोंच अलकचा भाऊ आपल्या मित्राकडे कांहींसें बोलला. मुराररावाला ते शब्द नीट ऐकूं आले.

" ध्यानांत ठेव किसनसिंह. आपण काळाच्या दाढेंत जात आहोंत ! "

## प्रकरण तिसरें

# काळाच्या दाढेंत

ज्या इसमाला उद्देशून हे अशुभ शब्द उच्चारले गेले तो इसमही एक शिलेदारच होता. किंचित् हंसून त्यानें उत्तर दिलें, " विजय, तसें जर नसतें तर मी तुझ्याबरोबर इकडे आलोंच नसतों. कालच्या त्या अपमानकारक कृत्याबद्दल सूड उगविण्याचा हा एकच मार्ग आहे." विजयसिंहाच्या तोंडावरल्या काळ्या डागाकडे अर्थपूर्ण दृष्टीने पहात तो पुढे म्हणाला, " आणखी हें पहा विजय, ह्या बाबतींत तूं माझ्यावर पूर्णपणें विसंबून रहा मी सांगेन त्याप्रमाणे वाग."

" अगदीं खुषीनें, माझ्या तोंडावर गुद्दा लगावणारा तो इसम माझ्यासमोर आला, कीं बस्स. मग मी आहें आणि तो आहे." दांतओंठ चावून विजयसिंहाने आपली मूठ वळली फार उत्सुकतेमुळें त्याचें तोंड फिकट दिसत होतें. बहिणी-प्रमाणें–अलकप्रमाणें–त्याचेही डोळे काळेभोर व तेजस्वी होते. त्यामुळें आता त्याच्या फिकट वर्णात व तोंडावरल्या त्या काळ्या डागात आणि तसल्याच काळ्या डोळ्यांत फारच तफावत दिसूं लागली त्याचा स्वरही पुष्कळच अलक-च्या स्वरासारखा होता. त्या दोघांचें भाषण अर्धवट ऐकून व अर्धवट तर्कानें जाणून त्यांच्याशीं बोलण्याचें काम फार जड जाणार हे मुराररावाच्या ध्यानात आलें. तरीपण पुढें होऊन त्यानें विजयसिंहाशीं बोलण्याची आपली इच्छा दर्शविली. तें पाहून जरा घुटमळून विजयसिंह म्हणाला, " आपण जरा थांबा. पलीकडे उभ्या असलेल्या मराठा इसमाशीं माझें कांहीं जरुरीचें काम आहे, तेवढें आटोपून मी आपल्याकडे येतों " व त्यानें पटांगणात वाट पहात असलेल्या त्या दोघां मराठ्याकडे बोट केलें.

" जर माझें काम कशाविषयीं आहे ते तुम्हांला कळेल तर मला वाटतें तुम्ही आताच ते ऐकून घ्याल. तुम्हांला कांहीं निरोप सांगावयाचा आहे." मुरारराव पुन्हा म्हणाला.

विजयसिंहाचा मित्र किसनसिंह मुराररावाकडे वळून, शिलेदाराला उचित अशा मोजक्या शब्दात म्हणाला, " मला वाटतें मीं आपल्याला एकदां पाहिलेलें आहे. आपण सुमारें सहा वर्षांपूर्वी अबूकडील जंगलांत वाघाची शिकार केली होतीत काय ! "

" होय, केली होती; पण—हां, बरोबर. मी आतां ओळखलें आपल्याला. आपण शिलेदार किसनसिंह राठोड."

" तर मग आपण दख्खनचे वीर मुरारराव! आपला चेहरा मीं किंचित् विसरलों होतों खरा, पण त्या वेळीं आपण एका ढाण्या वाघाला तरवारीच्या पहिल्या फटक्यासरशीं मारलें होतें, तें मात्र माझ्या पुरें लक्षात आहे. विजय, या युद्धात हे तुझे प्रतिपक्षी नाहींत ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे. मुरारराव, हा माझा मित्र, विजयसिंह चौहान "

कित्येक वेळा मनुष्याला मोठ्या मजेदार रीतीने कांहीं टोपणनावे मिळतात. एकदा कधीं सहज मुराररावाच्या नावामागे लावलेला " मराठावीर " हा शब्द आता अवघ्या दाक्षिणेत त्याच्या नावामागे जोडलाच गेला जणु काय ते त्याचे आडनावच.

किसनसिंहानें दोघांची ओळख करून दिल्यावर मुरारराव विजयसिंहाला म्हणाला, " क्षणभर जरा बाजूला येता का! तुम्हाला कांहीं निरोप सांगावयाचा आहे."

तें ऐकून किसनसिंह बोलला, " हो. जरूर जा विजय मलाही त्या मराठ्याबरोबर कांहीं बोलावयाचे आहे. तेव्हा तुझी काही जरुरी नाही " व तो त्या दोघा मराठ्याजवळ निघून गेला.

" तुम्हीं मला निरोप सांगणार आहात! कोणाचा, कोणाचा तो?" विजयसिंहानें विचारलें. वयानें जरी तेवीस वर्षांचा असला तरी विजय एखाद्या बालकासारखा कोंवळा दिसे. प्रश्न विचारताना त्याने उत्तर ताडलें असावें असे त्याच्या चेर्यावरून दिसलं कारण प्रश्नाच्या विचाराने जरा क्रूर दिसणाऱ्या त्याच्या डोळ्यात आता अगदी मृदु तेज आल्यानें ते फारच सुंदर दिसत होते.

" तुम्हीं शिलेदारीचा पेशा पत्करलात त्या वेळेस जी बालिका होती, पण सध्या जी युवती आहे तिचा निरोप आहे तो. तुमच्या जुन्या वडिलोपार्जित वाड्याच्या दारात तुमची वाट पहात असलेली कालच मीं तिला पाहिली होती तेव्हा जर तो मराठा कांहीं तडजोड करीत असेल, तर तिची आठवण करा व तिच्यासाठीं ती तडजोड मान्य करा. ह, ही घ्या तुमच्या वहिणीची प्रेमाची देणगी " आतां सुकलेली व त्यामुळें जास्तीच सुगंधित झालेली अलकनें दिलेलीं तीं फुलें मुराररावानें विजयसिंहाच्या हातांत दिलीं. नंतर त्यानें अलकचा निरोपही त्याला हृदयस्पर्शी स्वरात सांगितला.

अलक व तिचें गाढ बंधुप्रेम यांच्या आठवणीने मुराररावाला आज अगदीं वेगळाच इसम बनविले. नेहमीचा सडेतोड व धीट शिपाईगडी आज प्रेमळ हृदयी पण भित्रा कवि बनला होता

" माझ्या वहिणीकडून ! माझ्या अलककडून ! " अत्यंत प्रेमानें विजयाने त्या फुलांचें चुंबन घेतलें. व त्याबरोबर त्याचे डोळे प्रेमाश्रूंनीं भरून आले.

" तिच्यासाठी तडजोड करूं ? होय-खरंच ! " परंतु कपाळावरून सहज हात फिरवितांना विजयाच्या हाताला तो वण लागला. त्याबरोबर डोळ्यातील प्रेमाश्रु जागच्याजागीं सुकले, व त्याची मुद्रा पूर्ववत कर्तव्यकठोर झाली.

" आपल्या लाडक्या वहिणीची आठवण ठेवाल ना ? " विनवणीच्या स्वरानें मुरारराव म्हणाला.

" होय, माझ्या वहिणीची मी जरूर आठवण ठेवीन ! पण त्याच्याकडून झालेला हा अपमान असाच गिळून जर मी निर्लज्जासारखा तिच्याकडे गेलों तर माझी शूर अलक माझ्याकडे नुसता दृष्टिक्षेपही करणार नाही "

मुरारराव यावर कांहीं बोलणार तोंच किसनसिंहाची हांक ऐकू आल्यामुळें विजयच पुढे म्हणाला " हें युद्ध संपल्यावर माझ्या वहिणीचा दूत झाल्याबद्दल मी आपले आभार मानीन. आपण कांही काळजी करूं नका. अलकनें दिलेलीं हीं फुलेंच माझें संरक्षण करतील." अगदीं हलक्या हातानें तीं फुले आपल्या छातीवर लटकावून विजय पटांगणाकडे गेला.

मुराररावानें सिरोहीच्या रस्त्याकडे पाहिलें तो धुळीचा लोट आता अर्ध्या कोसावर होता, म्हणजे आणखी पाव घटकेच्या आत अलक पोहोंचेल. अगदीं अल्प वेळ, पण त्याच्यावर एका भावाचें आयुष्य अवलंबून होतें.

द्वन्द्वयुद्ध पहाण्यासाठी मुरारराव पटांगणात एका बाजूला उभा राहिला. तो उंच मराठा जमिनीवरले खड्ग हातात घेऊन ऐलकत उभा होता मुराररावाच्या शब्दावरून या बाबतींत कांही तडजोड होणार असें वाटल्यावरून बाह्यतः तो निर्धास्त दिसत होता, तरी पण आपला मित्र किसनसिंहाशीं काय बोलतो सवरतो इकडे त्याचें पूर्ण लक्ष होतें. याच्या अगदीं उलट विजयसिंहाची स्थिति होती. आपल्या प्रतिपक्ष्याबरोबर लढण्यासाठी उत्सुक होऊन तो त्याच्याकडे व किसनसिंहाकडे आळीपाळीनें बघत होता. मुराररावाच्या मनाची स्थिति विचित्रच झाली होती. तडजोड करण्याच्या आपल्या प्रयत्नाचा कांहीं उपयोग होईल कीं

नाहीं अशी त्याला भीति वाटू लागली. किसनसिंह त्या उंच मराठयाला म्हणाला, " अद्यापि तुम्हीं आपलें नाव मला सांगितलें नाहींत. माझें नाव शिलेदार किसनसिंह राठोड."

" माझें किंवा माझ्या मित्राचें कोणाचेंच नाव कळविण्याची माझी इच्छा नाहीं. जर वरिष्ठांना याविषयीं कळलें तर आम्हांला बडतर्फ करण्यात येईल. " तो ठेंगू मराठा म्हणाला. हें ऐकून किसनसिंहाला फार राग आला, परंतु तो आंवरून त्यानें म्हटलें." तें कांहीं असलें तरी आपलें नाव सांगण्याइतका विश्वास तुम्हीं माझ्यावर टाकावयाला हवा होता. अशा परिस्थितींत युद्धाच्या नियमाप्रमाणें आव्हान परत घेता येतें, पण पोषाखावरून तुम्ही सभ्य दिसतां म्हणून मी या वेळीं तसें करीत नाहीं. तेव्हां आपण आतां कामाला लागू या. हा माझा मित्र तुमच्या मित्राबरोबर तरवारीनें किंवा भाल्यानें युद्ध करावयास खुषी आहे. त्या प्रत्येक शस्त्राची एक एक सारखी जोडी मीं आणलेली आहे. हं, बोला यांतलीं कोठलीं तुम्हाला पसंत येतात ?"

" कोठलींच नाहींत. मीं आपल्याबरोबर तिरकमठ्याची एक जोडी आणलेली आहे, त्यानें युद्ध करावयाला कांहींच हरकत दिसत नाहीं." आपल्या दूरदर्शीपणाचें आपणच हंसून कौतुक करीत त्या ठेंगण्या मराठयानें दोन तिरकमठे दाखविले.

" जर अशाच स्वरांत हा मराठा बोलत राहील तर पुढल्याच क्षणीं दोन बाजूचे हे दोघे दुय्यम प्रतिपक्षीच लढायला प्रारंभ करतील." मुरारराव हळूच लक्ष्मणसिंहाला म्हणाला. परंतु सुदैवानें मुराररावाचा तर्क कांहीं खरा झाला नाहीं.

" उत्तर हिंदुस्थानात आपापसातील असले तंटे सभ्य लोक तरवारींच्या साह्यानेंच मिटवितात. " एवढंच यावर किसनसिंहानें उत्तर केलं.

" कांहीं असलें तरी तुमच्या मित्रानें माझ्या मित्राला आव्हान दिले आहे. मला याविषयीं फार समजत नाहीं, तरी शस्त्रें पसंत करण्याचा हक्क ह्यावेळीं आम्हांला आहे एवढें मला कळतें. आणि म्हणूनच मी तिरकमठे पसंत करितों. दुसरें असे कीं, आम्हांला आता वेळ फारच थोडा आहे, व तेवढ्या वेळात मीं पसंत केलेल्या शस्त्राच्या साहाय्यानेंच मात्र या युद्धाचा निकाल होऊं शकेल" तो ठेंगू मराठा म्हणाला.

" अच्छा, मी माझा शब्द मागें घेतों. तुमच्याचसारखें होऊं द्या. आम्ही तिर-

कमठ्यानेंच खेळूं." ते तिरकमठे जरा तपासून किसनसिंह पुढें म्हणाला, "मला वाटतें कीं, या शस्त्रांनीं लक्ष्याचा अचूक वेध होणें जरा कठिण आहे तुमच्या मित्रानें ही कधीं वापरलीं आहेत काय?" "वापरलीं असल्यास मला तरी निदान ठाऊक नाहीं" असें उत्तर देऊन आपल्या मित्राकडे वळून पहात त्या ठेंगू मराठ्यानें विचारलें. "तूं वापरलीं आहेस का कधीं असलीं शस्त्रें?"

"छेः आजवर कधींच नाहीं." त्याच्या मित्रानें न डगमगतां उत्तर केलें

" ठीक आहे तर. आम्ही हींच वापरू," किसनसिंह म्हणाला

पहिल्यांदा किसनसिंहानें तरवार उचललेली पहातांच विजयानें आपला शिलेदारी पोषाख उतरला व अंगांत फक्त सुरवार व सैल सदरा एवढेच ठेवून तो ताठ उभा राहिला जणुं काय तारुण्याचें उपमानच! परंतु आतां किसनसिंहानें तिरकमठा उचलतांच विजयानें आपला पोषाख चढवला, व आपल्या प्रतिपक्ष्याला "लक्ष्य" दिसूं नये म्हणून त्यानें कबरेपासून वरच्या भागांत कोठेंही पांढरा डाग ठेवला नाहीं. फक्त त्याच्या छातीवर थोडी पांढरट जागा होती. कारण तेथें अलकनें दिलेलीं फुलें त्यानें लटकाविलीं होतीं

सराईचा मालक, लक्ष्मणसिंह रक्तपाताच्या कल्पनेनें जरा भावावला होता; तरी आपलें कर्तव्य न विसरतां तो मुराररावाला म्हणाला "जर या दोघां पैकीं एखादा जखमी झाला तर माझ्या सराईत एक स्वच्छ नवा कोरा बिछाना आहे. तो आतांच इकडे आणला तर बरें नाहीं का? या मराठ्याकडून मी अगदीं अल्प पैसे घेईन, व या रजपुताकडून तर कांहींच घेणार नाहीं कारण तुम्ही याला 'चौहान' म्हटलेलें मी ऐकलें आणि त्या थोर नांवासाठीं कोणीही रजपूत आपल्या हातून होईल तें करीलच सराईच्या एका म्हाताऱ्या मालकासाठीं तुम्ही एवढें कराच. जखमी दसमाला शहरांत वैद्याकडे नेण्यापेक्षा हें जास्त बरें नाहीं का होणार?"

हे शेवटले शब्द ऐकून मुरारराव दचकला युद्धाची वेळ पुढे ढकलण्याचा एक उपाय त्याला सापडला. व सध्यांच्या परिस्थितींत या उपायामुळें युद्धच थांबलें असतें "लक्ष्मणसिंह! केवढे उपकार केलेस तूं हे माझ्यावर? तुझ्या या तरतरीत डोक्याला हे जीर्ण शरीर अगदीं शोभत नाहीं." एवढें घाईघाईनें बोलून मुरारराव जवळजवळ धांवतच पटांगणाकडे निघाला.

युद्धाची तयारी चालली होती. एवढ्यांत मुरारराव किसनसिंहाकडे येऊन पोहों

चला व त्याला म्हणाला, " त्रयस्थ असून मी मध्यें बोलतों ह्याबद्दल मला क्षमा करा, पण असल्या बाबतींत बहुतकरून त्रयस्थांचेंच सर्व गोष्टींकडे लक्ष पोंचतें. विश्वबंधुत्वाच्या नात्यानें मी विचारतों कीं, तुम्हीं युद्धाच्या नियमाप्रमाणें इकडे वैद्य कसा ठेवला नाहींत ? "

आजुबाजूला पाहून किसनसिंह म्हणाला, " खरें सांगितलेंत मुरारराव ! या मराठ्यांनीं आपला सैन्यांतला वैद्यबुवा आणला असेल अशी माझी ह्या वेळपावेतों कल्पना होती.

" आणि आमची तुमच्या हकीमावर भिस्त होती " तो ठेंगणा मराठा उद्गारला.

" आम्हीं त्याला आणला असता, पण आज एकाएकीं त्याची प्रकृति नादुरुस्त झाली.''

" आणि इतक्यात आम्ही कूच करणार असल्यामुळें आमच्या वैद्याला फुरसत झाली नाहीं. त्याला जर जास्त आग्रह केला तर उगीच गाजावाजा होऊन वरिष्ठांच्या कानांवर ही गोष्ट जाईल म्हणून आम्हांला तसें करतां आलें नाहीं."

एवढें भाषण झाल्यावर ते दोघे आपापल्या मित्राचा विचार घेण्यास गेले थोड्याच वेळानें किसनसिंह परत येऊन मुराररावाला म्हणाला. " कांहीं झालें तरी युद्ध करायचेंच असें माझ्या मित्राचें म्हणणें आहे "

"सध्यां ही प्राणाशीं गाठ आहे. अशा वेळीं वैद्याविषयीं कोण विचार करतो ! " विकट हास्य करून विजय म्हणाला. तें ऐकून तो ठेंगू मराठा म्हणाला, " ठीक आहे. एका पक्षाला जर हरकत नाहीं तर दुसऱ्या पक्षालाही अर्थातच नाहीं. त्यामुळे रजपुताला जशी बरी वाईट संधि मिळेल तशीच मराठ्यालाही मिळेल. वैद्य असो वा नसो, आम्ही आता लढणारच ! तेव्हां नाणें उडवून आपण जागा ठरवू या तर. लौकर आटपा. कारण कूच करण्याचें पहिलें शिंग वाजलेलें मीं आतांच ऐकलें. ( आपल्या मित्राकडे वळून ) तुमची ती शकुनी मोहोर मला द्या. खात्रीनें तुम्हालाच छायेची जागा मिळेल." उंच मराठयानें आपल्या खिशांतून मोहर काढून दिली. एका क्षणानें त्याच्या मित्रानें ती वर उडविली. मराठा जिंकला. बारा पावलें अंतर ठरलें व दोन दगड ठेवून त्या दोघांची पविञ्याची जागा ठरवून टाकण्यांत आली. तो उंच मराठा व विजयसिंह आपापल्या जागेवर उभे राहिल्यावर, त्यांच्या मित्रांनीं

तिरकमठे त्यांच्या हातीं दिले. नंतर त्या ठेंगू मराठ्यानें ती शकुनी मोहर आपल्या मित्राला परत दिली. त्या उंच मराठ्यानें आपल्या उजव्या खिशांत ती ठेविली. व तो आपल्या मित्राच्या कानांत कांहीं पुटपुटला. असंमतिदर्शक कांहींसें बोलून ठेंगू मराठा पटांगणाच्या मध्यभागीं येऊन उभा राहिला व किसनसिंहाला हांक मारून पूर्ण निष्काळजी स्वरांत म्हणाला, " तुम्हांला सांगावयाचें राहिलेंच कीं, युद्धाला सुरुवात करण्यापूर्वी क्षमा मागावयाची माझ्या मित्राची इच्छा आहे"

" क्षमा मागावयाची !" किसनसिंह आश्चर्यानें उद्गारला.

" होय. त्यानें आपल्या वतीनें तुम्हांला कळविण्यास मला सांगितलें आहे कीं, त्यानें ह्या तरुण रजपुताला गुद्दा लगावला, त्याच्या डोळ्याच्या खालीं त्यामुळें डाग पडून त्याच्या रूपात व्यंग दिसू लागलें याबद्दल त्याला फार वाईट वाटतें" अत्यंत कुत्सित रीतीनें व हेटाळणीने बोलल्यामुळें हे शब्द फार अपमानकारक भासले. एवढेंच नव्हे तर ते तसे भासावे या उद्देशानेंच त्या ठेंगू मराठ्यानें उच्चारले होते असेंच मुराररावाला वाटले.

" ठीक आहे तुम्हीं आपलें काम केलेंत आता माझें बोलणें ऐका. तुमच्या मित्राला क्षमा मागायची आहे ! ठीक, त्याला येऊन माझ्या शेजारीं उभा राहूं द्या, व माझ्या मित्रानें नस्साच मारलेला गुद्दा त्याला सहन करूं द्या आणि गुद्दा लगावून झाल्यानंतर माझा मित्रही तडजोड करील." सावकाशपणें एक एक शब्द उच्चारीत किसनसिंह म्हणाला. त्यांचें भाषण चाललें असता तेथें भीषण शांतता पसरली होती. ते संपतांक्षणींच तो ठेंगू मराठा मूठ वळून किसनसिंहाच्या अंगावर धांवला, पण त्या उंच मराठ्यानें आपल्या मित्राला बाजूला सारलें, व तो किसनसिंहाच्या समोर उभा राहिला. हें भाषण ऐकत असतां रागानें व लज्जेनें तांबडेंलाल झालेलें त्याचें तोंड आतां पांढरें फटफटीत पडलें होतें. जोरानें श्वासोश्वास करीत तो म्हणाला, " असे कुत्र्यासारखे रट्टे खाण्याची तुम्हां रजपुतांना संवय असेल, पण आम्हीं मराठ्यांनीं ती अद्यापि पैदा केली नाहीं" विजयाकडे वळून, " तुम्हांला माझा प्राण घ्यावयाची इच्छा आहे ना ? आतांच ती संधि मी तुम्हाला देतों. पण त्याबरोबर मीही तुमचा प्राण घेण्याचा प्रयत्न करणारा !" कांहीं एक उत्तर न देतां विजय किसनसिंहाकडे वळून म्हणाला, " तिरकमठा इकडे कर पाहूं."

मुराररावानें जर त्या उंच मराठ्याला विजयाची क्षमा मागावयास सांगितलें

नसतें तर किसनसिंगाकडून असें अपमानकारक उत्तरही आलें नसतें व त्या उंच मराठयाच्या फक्त आपला प्राण इच्छेनें रक्षण करण्याच्या आपल्या प्रतिपक्षाचें प्राण घेण्याच्या इच्छेत रूपांतरही झालें नसतें. तेव्हां आपल्या तडजोड करण्याच्या प्रयत्नामुळेंच अलकच्या भावाचे प्राण जास्ती धोक्यांत आले हें पाहून मुरारराव-ला काय वाटलें असेल ?

तो उंच मराठा आतां मुराररावाजवळ येऊन हलक्या स्वरांत म्हणाला, " मीं तुमचें एक वचन पाळलें. त्याच्यापासून काय निष्पन्न झालें तें आतां दिसलेंच. तेव्हां पहिल्या वचनाचा निकाल लक्षांत घेतां, मीं दुसरें वचन पाळणें शक्य नाहीं हें तुमच्या लक्षांत आले असेलच. लक्ष्य कसें चुकवावें हें तुम्हीं मला सांगितलेंत, त्याच वेळीं लक्ष्याचा अचूक वेध कसा करावा हेंही सांगितलेंत. दोन हात उजव्या बाजूला लक्ष्य कल्पून बाण सोडावा म्हणजे अचूक वेध होतो आणि मधील अंतरही बारा पावलेंच असावें नाहीं का ? ठीक आहे, या माहितीबद्दल मी आपला फार आभारी आहें, मुरारराव ! "

बिचारा मुरारराव ! त्या मराठ्याला ही माहिती जर त्यानें कळविली नसती तर अलकच्या भावाच्या प्राणांला फार करून धोका नव्हता

परंतु तो उंच मराठा फार उमद्या स्वभावाचा होता. अशा प्राणसंकटाच्या वेळींसुद्धा मराठ्यांचा नैसर्गिक निःपक्षपातीपणा तो विसरला नाहीं. किसनसिंहाला उद्देशून तो मोठ्यानें म्हणाला, " ह्या बाबतींत मी कोणताही अयोग्य फायदा घेणार नाहीं. थोड्या वेळापूर्वी ह्या वीर मुराररावानीं हे तिरकमठे पाहून आपलें मत दिलें की, ते दोनही लक्ष्याचा वेध न करता दोन हात डाव्या बाजूला वेध करितात." तो स्वतःशींच पण मोठ्यानें पुढे पुटपुटला, " देवा, माझ्या बहिणीला संभाळ." कारण आतांच्या ह्या आपल्या शब्दांनीं आपले प्राण जास्ती धोक्यांत आले हें तो समजून होता, व आपली लाडकी बहीण पुन्हा कधीं आपल्याला दिसेल तरी कीं नाहीं अशी त्याला साहजिक भ्रांति वाटली.

किसनसिंहाला त्याची ही माहिती खरीच वाटेना. म्हणून त्यानें प्रश्नार्थक नजरेनें मुराररावाकडे पाहिले. तेव्हां मुरारराव म्हणाला, " हे शब्द अगदीं खरे आहेत. ते दोनही तिरकमठे मीं पाहिले आहेत. त्या मराठ्याच्या हातांतील नांव असलेला तिरकमठा लक्ष्याच्या दोन हात डाव्या बाजूला वेध करील. पण दुसऱ्याची तितकी खात्री नाहीं. तो सुमारें दीड पावणे दोन हात डाव्या बाजूला वेध करील.

माझें निशाणबाजीचें कौशल्य तुम्हांला ठाऊकच आहेच." बोलणें संपतें न संपतें तोंच मुराररावाला घोड्यांच्या टापांचा दूरवर आवाज ऐकूं आला. ती अलकच असणार असें वाटून तो अधीर झाला. अरेरे ! आपलें अनुभविक ज्ञान त्या दोघांच्या मृत्यूला कारणीभूत होणार तर !

किसनसिंह त्या उंच मराठ्याजवळ येऊन म्हणाला. "मला आपल्या उमद्या स्वभावाची जर ओळख असती तर आपल्याला लागण्यासारखें मघां मी बोललोंच नसतों. पण खरेंच सांगतों, मघा आपल्याला लागले नसतील तेवढे ते शब्द मला आता झोंबताहेत ! "

मुरारराव बाजूच्याच एका उंचवट्यावर उभा राहून टेहळूं लागला. अगदीं पहिला अलकचा घोडा होता ती भरधाव येत होती. कारण, ती आल्यास विजयाच्या हातून होऊं पहाणारें अविचाराचें कृत्य थांबेल असा मुराररावानें तिला निरोप पाठविला होता. अरे ! पण हें काय ? अलकचा घोडा एकाएकीं लंगडूं लागला ! आणि ती तर अद्यापि पाव कोस दूर ! खात्रीनें ती उशीरां येऊन पोंचणार. मुराररावानें मागें वळून पाहिलें तों बाण सुटले होते. त्यांत विजयाचा जरा नंतर सुटला.. विजय एका पायावर सर्व भार टाकून उभा होता; पण तो उंच मराठा वेडावांकडा झाला व आता खालीं पडणार तोंच त्याच्या मित्रानें त्याला सांवरलें व म्हटलें, "कुठें लागला बाण बघूं ! थांबा, मी काढतों जास्ती नाहीं ना लागले ? " कुशीत घुसलेला बाण त्यानें उपटून काढला, पण काय आश्चर्य ! रक्त वगैरे बिलकूल नाहीं. उंच मराठ्यानें ती जागा हातानें चाचपली, तेव्हां त्याला काहीं घट्ट लागलें; म्हणून त्यानें तें बाहेर काढले, तों काय ? बाण बसल्यामुळें मध्यभागीं भोंक पडलेली व दाबून चपटी झालेली ती शकुनी मोहर ? "आता कसें वाटतें तुम्हांला ? " घाईनें त्याच्याजवळ जाऊन मुराररावानें प्रश्न केला जरी वैद्यगिरी हा मुराररावाचा धंदा नव्हता तरी तो पुष्कळ धंदेवाईक वैद्यांपेक्षां जास्ती अनुभवी व विद्वान् होता.

"अं ! पुष्कळ बरें आहे या माझ्या मोहरेनें उपकार केले हे. मीं तिला कधीं विसरणें शक्य नाहीं." हें तो उंच मराठा अगदीं खरें बोलला. कारण तिच्या दाबामुळें पुढें पुष्कळ दिवस त्याच्या बरगड्या दुखत होत्या.

एवढ्यात किसनसिंह तिकडे येऊन म्हणाला, "या परिस्थितींत माझा मित्र पुन्हा युद्ध खेळण्याची इच्छा प्रदर्शित करितो "

" परंतु मला आतां वेळ नाहीं." तो उंच मराठा म्हणाला.

" कां बरें ! तुम्हांला कांहीं दुखापत झालेली नाहीं. व माझा मित्र उभा राहूं शकेल."

विजयसिंह जखमी झाल्याविषयींचा हा पहिलाच निर्देश होता.

" ही पहा शेवटची पुकारणी झाली आतां मला गेलेंच पाहिजे. माझा मित्र तर मघांच पळाला."

" पण अजून आहे हो थोडा वेळ."

" आहे, पण अगदींच थोडा आहे. तुम्हीही एक सैन्यांतील कामगार आहां. तेव्हां शिस्त जाणत असल्यामुळें मला माझ्या कर्तव्यापासून ढळवूं नका." आतां विजय स्वतःच तिकडे आला, व अगदीं निःशक्तपणें हळूहळू म्हणाला, " हा तिरकमठा मोडला आहे, आणखी मला आतां उभें राहणेंही शक्य नाहीं." कसें तरी एवढें बोलून तो जवळच्या दगडी पायऱ्यांवर बसला. तो उंच मराठा त्याच्याकडे पाहून म्हणाला, " छातीला, डाव्या बाजूला लागलेंय होय ! जास्त जखम झाली नाही, याबद्दल मला आनंद वाटतो जर जयपुराहून मी पुन्हा इकडे आलों, आणि तुमचा आग्रहच असेल तर..." पण वाक्य पुरेंही न करितां तो धांवत सुटला. कारण मराठा सैन्यानें कूच करावयास सुरुवात केली होती.

प्रकरण चवथे

## मृत्यु

विजयाचा तो निःशक्त आवाज ऐकून मुरारराव दचकला. पूर्वीचा त्याचा तो जोमदार आवाज व आतांचा आवाज यांत फारच तफावत दिसून येत होती. धांवतच त्याच्याकडे जाऊन, नाडी पाहण्यासाठीं मुराररावानें त्याचा हात उचलला. कारण एवढ्या थोड्या वेळांत इतका विलक्षण फरक फक्त एकाच गोष्टीमुळें होऊं शकेल हें वैद्यकीच्या अनुभवानें त्याला ताबडतोब कळलें. नाडीची परीक्षा करीत असतां मुराररावाचा चेहरा विजयाच्या चेहऱ्यासारखाच पांढरा फटफटित पडला. खालीं घसरून विजयानें दगडी चौथऱ्यावर आतां डोकें टेंकलें. त्याच्यानें नीट रहावेना. त्याच्या अंगरख्याच्या गुंड्या भराभर सोडून मुराररावानें आंतील सद्रा फाडला व हातानें त्याची जखम तपासली. तात्काळ मुराररावाचें तोंड चमत्कारिक झालें. जखमे-च्या भयंकर स्वरूपाबरोबर त्या मराठ्याविषयीं विजयाच्या मनांत वसत असलेल्या द्वेषाचीही यथार्थ कल्पना मुराररावाला झाली. त्या निरतिशय तीव्र द्वेषामुळेंच एवढी मोठी जखम सहन करून विजय पुन: युद्ध खेळावयास तयार झाला होता. सराईच्या मालकाला लौकर थोडें पाणी आणावयास सांगून मुराररावानें आपला अंगरखा काढला व त्याची घडी करून त्यानें तो विजयाच्या डोक्याखालीं ठेवला. त्याला तिकडेच जरा व्यवस्थेनें झोंपवून तो म्हणाला, " भारी दुखतें का ? मोठ्यानें बोलण्याचे श्रम नका हं घेऊं. माझे कान खूप तीक्ष्ण आहेत." विजयानें दिलेलें उत्तर ऐकून मुराररावानें किसनसिंहाला बाजूला नेलें व त्याचा आपल्यावर विश्वास बसावा म्हणून म्हटलें. " मी वैद्याची कामगिरी योग्य बजावीन या विषयीं काळजी करूं नका. कारण मला ."

" तर मग त्याला शहरांत कसा व केव्हां न्यावा तेवढें सांगा बरें ! "

" त्याला नेऊंच नये. त्याला इथेंच ठेवलें पाहिजे ! "

" इथेंच ! अन् किती वेळ ? "

" सारा कारभार आटोपेपर्यंत ! "

" चूप ! तो मरायचा नाहीं. याच जागीं जखमी झालेले शेंकडों इसम पुनः बरे झालेले मीं पाहिले आहेत."

" परंतु अशा रीतीनें जखमी झालेले नव्हे. मी खोटें सांगेन का असल्या बाबतींत !" बोलतां बोलतां मुराररावाचे डोळे भरून आले.

" अहो पण त्याच्या हृदयाला थोडीच जखम झाली आहे ? "

" तें खरें. परंतु मुख्य रक्तवाहिनीच फुटली आहे. त्याला काय इलाज ! आणखी दहा वीस क्षणांच्या आंत अति रक्तप्रवाहामुळे तो हें जग सोडून जाईल. "

" आणि तुम्हांला कांहींच करिता येणे शक्य नाही ? "

" वैद्यकीची सारीं शस्त्रें जवळ असतीं तरीही मला कांहींच करितां आलें नसतें. मुख्य रक्तवाहिनीच फुटली तिथे कोण काय करणार ? आतां तुम्ही हें त्याला सांगता, कीं मी सांगूं ? "

" तुम्हीच सांगा. त्या मराठ्यानें क्षमा मागितली तेव्हांच जर मीं तडजोड केली असती तर हें झालेंच नसतें. त्याच्या मृत्यूचे पातक माझ्या डोक्यावर आहे असेंच मी समजतों. काय करूं ? " एवढें बोलून किसनसिंह विजयाजवळ आला. त्या अल्पवयी युवकावर मृत्यूनें आपला पाश टाकला होता. खालीं वांकून किसनसिंहानें त्याच्या कपाळाचें बधुप्रेमानें चुंबन घेतलें. व तो दूर जाऊन उभा राहिला. अश्रूमुळें त्याला काहीं दिसेनासें झालें

मुरारराव विजयाजवळ जाऊन बसला व हलकेंच त्याचें डोकें त्यानें आपल्या मांडीवर घेतलें. थोडें पाणी त्याला पाजून मुराररावानें थोडेंसें त्याच्या कपाळावरही थापलें. नंतर खालीं वांकून ती भयंकर गोष्ट त्यानें विजयाला सांगितली. त्या बरोबर विजय उत्तरला, " पहिल्यादांच ती शंका मला आली कारण बाण लागतां च माझे पायच लटपटूं लागले. आणि ही शंका आली म्हणूनच दुसऱ्यांदां युद्ध खेळण्याची मीं तयारी केली. त्याचा जीव घेण्याची माझी इच्छा होती. तो माझ्याबरोबरच मरावा व तिसऱ्या पिढींत उगवावयाचा सूड माझ्या बहिणीच्या वांट्याला जाऊं नये अशी माझी इच्छा होती. पण काय करणार ? त्याच्या त्या शकुनी मोहरेनें घात केला. सूड उगविण्याचें काम आतां अलकवर सोंपविणेंच प्राप्त आहे." किंचित् थांबून विजय हलूहलू पुढें म्हणाला, " काय करूं हो ! माझ्या मृत्यूच्या आठवणीनें तिचें निष्पाप आयुष्य दुःखमय होण्यापेक्षां ती मला विसरली तरी तें पत्करलें असें वाटतें."

मुराररावाच्या मनांत एक कल्पना आली. जर जखमेंतील रक्तप्रवाह हातानें

थांबविला तर त्याची बहीण येईपर्यंत त्याच्या अंगांत थोडीबहुत धुगधुगी राहील. तसें करण्यासाठीं मुरारराव खालीं वांकणार तोंच घोड्यांच्या टापांचा व माणसें उतरल्याचा आवाज ऐकूं आला.

ह्या मर्त्य जगांतील आपलें वास्तव्य अगदीं संपत आलें असतां, परलोकींच्या कांहीं अजब शक्तीनें आपल्याला कांहीं गोष्टी पाहतां व ऐकतां येतात असें वाटतें. कारण त्या गोष्टी एरवीं मर्त्यलोकी काहीं आपल्याला समजत किंवा दिसत नाहींत. आतांच पहा, मुराररावाला अलकच्या आगमनाची चाहूल ऐकूं आली; पण विजयाला त्या दगडी पायऱ्या व सराईच्या पांढऱ्या भिंती यांच्या पलीकडे असलेली अलक दिसली. कारण " माझी अलक ! ती पहा मला दिसते आहे," असें पुटपुटून तो तिच्या कपड्यांचें वर्णन करूं लागला. नंतर किंचित् स्मित करून त्यानें 'अलक' अशी हांक मारली व तो मागें पायरीवर पडला.

त्या हांकेला प्रत्युत्तर म्हणून सराईच्या मागून आवाज आला. " विजयभाई ! ही बघ मी आलें." परंतु अलक हें बोलत असताच विजय मृत्युवश झाला. तिच्या स्वागतासाठीं त्याच्या तोंडावर उमटलेलें स्मित मात्र जसेंच्या तसेंच होतें.

चमत्कारिक आवाजानें किसनसिंह ओरडला, " जय एकलिंगजी, त्याची बहीण आली " व लगबगीनें त्यानें तो तिरकमठा लपविला.

अलक ज्या ठिकाणीं उभी होती तिकडून तिला विजयाचा देह दिसत नव्हता. मुराररावानें आपला रुमाल विजयाच्या तोंडावर टाकला. तसें करावयासाठीं तो खालीं वाकला असता अलकनें त्याला पाहिलें व ती धावतच तिकडे निघाली. त्या आनंदाच्या क्षणी ती आपला प्रवासाचा शीण विसरली आणि मनुष्यांच्या उत्तेजित मनोविकारांना बळी पडलेला विजयाचा तो मृतदेह पहावयास ती न कळून धावत आली

त्या वेळीं तिची मूर्ति अत्यंत मनोरम दिसत होती. मोतिया रंगाची ओढणी व त्याच रंगाचा जरीचा लेहंगा तिच्या सुंदर शरीरकांतीला व नाजुक बांध्याला फार शोभत होता. विजयाला आपल्या सुंदर बहिणीबद्दल किती बरें अभिमान आणि कौतुक वाटलें असतें ! उत्सुकतेमुळें तिची चर्या फिकट दिसत असली तरी किंचित चिंतायुक्त दिसणारे तिचे डोळे आशा व प्रेम यांच्या संयोगानें आनंदितच दिसत होते.

आपल्यापुढें काय वाढून ठेवलें आहे याची बिलकुल कल्पना नसल्यामुळें हसत

हंसत ती म्हणाली, " जासुदाबरोबर आलेल्या तुमच्या निरोपानें मी भारी घाबरून गेलें; पण आतां इतक्यांत मीं त्याचा आवाज ऐकला तेव्हां तो सुखरूप असणारच. कुठें आहे ? कुठें आहे हो माझा भाई ! "

दोघांपैकीं कोणींच तिला उत्तर दिलें नाहीं. तिच्याकडे पाठ करून आपल्या हातांतील मोडक्या तिरकमठ्याशीं खेळत किसनसिंह उभा होता. नाइलाजानें मुराररावानें वर मान करून अलककडे पाहिलें. त्याच क्षणीं पायरीवर पडले-ल्या त्या चेतनाहीन कलेवराकडे तिचें लक्ष गेलें. बिचारी अलक ! तिला दम कोंडल्यासारखें झालें. कारण आपल्या लाडक्या भावाचा पोषाक तिनें तात्काळ ओळखला. " अं ! हा कोण ! हें काय ! तुम्ही बोलत का नाहीं ! " ती संशया-त्मक स्थिति तिला दुःसह होऊन ती पुढें झाली. तिला थांबविण्यासाठीं मुराररावानें आपला हात पुढे केला, पण त्याचा प्रतिरोध करून तिनें विजयाच्या तोंडावरला रुमाल काढला. आणि आपल्या मृत भावाच्या चेहऱ्याचें अवलोकन केलें. तिला घेरी येईल अशी मुराररावाला अटकळ—नव्हे त्याला तशी आशा होती.

पहिल्याप्रथम अलकला कांहीं उलगडाच होईना. " माझें स्वागत करण्यासाठीं 'अलक' म्हणून त्यानें मला हांक सुद्धां मारली. छेः हें शक्यच नाहीं." खालीं वाकून तिनें त्याला हलूच हांक मारली. आपला प्रियबंधु झोंपलेला आहे अशीच तिची खात्री होती. त्याच्या गालाला तिनें स्पर्श केला, त्याचें चुंबन घेतलें, त्याला कुरवाळलें. अशानें तरी त्याला पुनर्जीवन येईल अशी आशा तिला वाटली. जेव्हां तो कांहींच उत्तर देईना, किंवा तिला कुरवाळीना, तेव्हां तिनें त्याच्या हृदयावर हात ठेविला. पण तेथे काय होतें ! वस्तुस्थितीची यथार्थ कल्पना आतां तिला आली. तिच्या तोंडून दुःखदर्शक अस्पष्ट किंकाळी निघाली. ' मला तुम्ही एवढ्याचसाठीं इथें आणलेंत काय ! ' दोन्ही हातांनी तिनें आपलें तोंड झांकलें. तिचा झोंक जाऊं लागला. परंतु एकाएकीं तिच्या मनांत दुसराच कांहीं विचार आला. तिचा तो नूर पार बदलला. अपूर्व तेजानें तिचे डोळे चमकूं लागले. " त्याचा खून करणारा इसम कुठें आहे ? मला दाखवा ! " मोडका तिरकमठा हातीं घेऊन उभ्या असलेल्या किसनसिंहाला तिनें पृच्छा केली. " काय ! तुम्हीच ते . "

तिचे ते तेजस्वी डोळे पाहून किसनसिंहाचें अंग थरारलें. आजपर्यंत कित्येक कठीण प्रसंगांना किसनसिंहानें निर्भय अंतःकरणानें तोंड दिलें होतें. शांतपणें तशींच बेफामपणें केलेलीं पुष्कळ अविचाराचीं कृत्यें त्यानें

पाहिलीं होतीं, पण रागानें वेडावलेल्या अलकचे ते नेत्र पाहून त्याचें तोंड पांढरें फटफटीत झालें. कसेंबसें त्यानें 'नाहीं' एवढें उत्तर दिलें. त्या उत्तरावर विश्वास ठेवून अलकनें पुनः प्रश्न केला, "तर मग हें भ्याडपणाचें कृत्य कुणीं केलें? भाईच्या मृत्यूची वार्ता मला सांगायला तुम्ही भ्यालीं! निदान त्याला कुणीं मारलें तेवढें तरी आतां सांगा!" उजव्या बाजूच्या रस्त्याकडे बोट करून किसनसिंह म्हणाला, "ती पहा धूळ दिसते आहे. त्या सैन्यामध्यें तो शिलेदार आहे. चितोड सोडून तें सैन्य कूच करीत आहे."

बालिकेनें त्या दिशेला आपले विशाल नेत्र वळविले. अनिमिष लोचनानीं ती तिकडे पाहूं लागली. आपल्या इच्छाशक्तीच्या जोरावर तें सैन्य परत फिरवावें अशी तर तिची इच्छा नव्हती?

एकदम ती ओरडली, "मराठ्याची पताका दिसते आहे. मी त्याला शोधून काढीन! खुनाला खून घेईन तरच मी अस्सल चौहानकुमारी!"

दुर्जनसिंह व दयाळसिंह तिच्या पाठीशीं उभे होते. अलकचा आवेशयुक्त चेहरा फारच मोहक दिसत होता तिच्याकडे पहात असतां दुर्जनसिंहाचें तोंड प्रफुल्लित झालें कदाचित् त्याच्या मनाला कांहीं गोड आशा वाटली असेल! "माझ्या विजयाचा खून करणाऱ्याला योग्य शिक्षा दिली नाहीं असा ठपका माझ्यावर कुणीही घेऊं शकणार नाहीं. कारण त्याचा सूड उगविण्याची शपथ मीं ह्या क्षणीं घेतली आहे. सूड! सूड!!" उच्च स्वरांत अलकनें शपथ घेतली.

विजयाच्या व अलकच्या पायाला हात लावून दयाळसिंहानें त्या शपथेचा पुनरुच्चार केला. अलकनें आपल्या भावाच्या मृत देहाकडे नजर फेंकून म्हटलें, "हाय! पण त्यामुळें माझा भाई मला परत थोडाच मिळणार?" व 'विजय' अशी एक हृदयद्रावक करुण किंकाळी फोडून आपल्या भावाशेजारींच ती मूर्च्छित होऊन पडली.

  

नंतर कांहीं आठवड्यांनीं मराठा सैन्याच्या त्या विशिष्ट तुकडीचें जयपूर येथें रजपूत सैन्याबरोबर युद्ध झालें व बरेच मराठा सैनिक जाया झाले.

प्रकरण पांचवें

## पाठलाग

चितोडला घडलेल्या गोष्टी मुरारराव विसरला नाहीं. परंतु चालू पिढींतील माणसाला भूतकाळाविषयीं विचार करावयाला फारच अल्प अवधि मिळतो. अनंत घडामोडी व असंख्य आचारविचारांनीं भरलेल्या जगाच्या रहाटीमध्यें हें योग्यच आहे. भूतकाळाविषयींचे विचार मनुष्यप्राणी आपल्या मेंदूच्या एका कप्प्यांत ठेवतो, व भविष्यकाळीं जरूर लागल्यास उल्लेखासाठीं तो ते बाहेर काढतो.

मुरारराव सध्या पुणें मुक्कामीं होता. विजयाच्या मृत्यूला एक वर्ष होऊन गेलें होतें. एक दिवस मुराररावानें पुण्यातील एका दुकानीं एक चित्रपट पाहिला. त्यामुळें चितोडांतील त्या विलक्षण प्रसंगाची त्याला पुन्हा आठवण झाली. कारण विजयाचें द्वन्द्वयुद्ध हा त्या चित्राचा विषय होता व विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यात मुराररावालाही रंगवला होता; पण त्याचें साम्य मात्र मुळींच वठलें नव्हतें. बाकीचा देखावा इतका हुबेहुब होता, कीं मुरारराव किती तरी वेळ त्या चित्राकडे पहातच राहिला. तो असा आणिक किती घटका राहिला असता तें कांहीं सांगतां येत नाहीं. पण त्याच्या बाजूला आतां दोघी स्त्रिया येऊन उभ्या राहिल्या. त्यांच्या बोलण्यामुळें त्याच्या तन्द्रीचा भंग झाला. त्या स्त्रिया उच्च मराठा कुळांतल्या होत्या. त्यातील एक पोक्त होती, पण दुसरी ? हं ! तिला पाहून मुराररावाच्या काळजांत चमकच निघाली. तिचा वर्ण जरी अगदीं गोरा नसला तरी त्यातलाच होता, पण तिची मुद्रा पूर्ण शुद्ध व निष्पाप दिसत होती. तिचे डोळे निळसर होते. ती ज्याच्यावर प्रेम करी त्याच्याकडे पाहताना तिचे डोळे मृदु होत. ज्यांचा ती द्वेष करी त्यांच्याकडे ते उग्र होत व ज्यांचा ती तिरस्कार करी त्याच्याकडे निर्विकार होत. तिचे केंस काळे असून कुरळे होते. तिच्या एकदर ठेवणीवरून तिचें आयुष्य निष्पाप सुखांत गेल्याचें दिसून येत होतें. त्या दोघींच्या भाषणावरून ह्या तरुणीचें नांव 'तारा' असून दुसरी तिची आत्या होती असें मुराररावाला कळलें. फार वेळ तिकडे राहाणें सभ्यपणाला अनुचित दिसेल असें वाटून नाइलजानें मुरारराव बाहेर पडला. घरीं पोंचल्यावरही तो त्या चित्राचें मनन करीत होता त्यातील कांहीं गोष्टी अगदीं बरोबर होत्या, तर कांहीं तितक्याच चुकीच्या होत्या. हें चित्र म्हणजे त्या

देखाव्याचें प्रतिबिंबच होतें. ती छोटीशी सराई, तिच्या पाठीमागील तें पटांगण, तो रस्ता, बाजूच्या त्या टेंकड्या हें सर्व इतकें हुबेहूब होतें कीं, आपण सध्यां त्या पटांगणांतच उभे आहों असा मुराररावाला भास झाला. परंतु त्यांत रंगविलेल्या साऱ्याच व्यक्ति तितक्या हुबेहूब नव्हत्या. त्या चित्रामध्यें दोन देखावे रंगविलेले होते. डाव्या बाजूला शिलेदारीचा पोषाक घातलेला विजय मुराररावाच्या मांडीवर डोकें ठेवून परलोकीं गमन करीत आहे असा तो देखावा होता. म्हणजे अलकनें विजयाला पहिल्यांदां ज्या स्थितींत पाहिलें ती स्थिति रंगविली होती. मध्यभागीं किसनसिंह एका मराठा शिलेदाराकडे रागानें पहात उभा असून, सराईच्या पायऱ्यांवर लक्ष्मणसिंह उभा आहे असें दाखविलें होतें. उजव्या बाजूच्या देखाव्यांत सर्वांच्या तिरस्काराला पात्र झालेला तो मराठा शिलेदार उभा होता. त्याच्या एका हातांत तिरकमठा होता. व दुसऱ्या हातांत ती चेंपलेली शकुनी मोहर असून तिच्या-मध्यभागीं बाण घुसलेला होता, आणि तो मराठा मोठ्या विजयानें व आनंदानें तिच्याकडे पहात होता. हेच दोन विकार त्याच्या मित्राच्याही चेहऱ्यावर दाखविले होते.

विजय, किसन व सराईचा मालक, यांचें चित्रांत पूर्ण साम्य वठलें होतें विशेषतः विजयाचें चित्र तर विशेषच कौशल्यानें रंगविलें होतें, आणि त्याचा चेहरा अनुपमेय सुंदर दिसत होता रक्तपिपासेच्या पायीं मृत्यु पावल्यासारखा तो न दिसतां बळी दिलेल्या एकाद्या निरपराध साधूसारखा दिसत होता. त्यामुळें या मृत्यूच्या बाबतींत त्याची कांहींएक चुकी नाहीं अशी चित्र काढणाऱ्या व्यक्तीची खात्री होती हें उघड दिसत होतें.

चित्रित मुराररावाच्या चेहऱ्यांत कांहींच साम्य नव्हतें ओझरत्या आठवणीच्या जोरावर रंगविल्यासारखा त्याचा चेहरा दिसत होता प्रतिपक्षीय मराठ्याना दुसऱ्याच्या वर्णनावरून रंगविलें असावें. चित्रकाराची त्या दोघांवर करडी नजर होती हें खास. कारण युद्ध खेळणाऱ्या त्या मराठ्याचें तोंड मिळालेल्या विजयानें आनंदित दिसलें तरी द्वेष, खून व भित्रेपणा या तिहींच्या मिलाफामुळें तें जरा काळवंडलेलें दिसत होतें. या चार विकाराचा त्याच्या चेहऱ्यावर केलेला संयोग फार विचित्र दिसत होता.

चित्रकाराचें कौशल्य या दृष्टीनें तें चित्र उत्तम नसलें तरी मनुष्याच्या मनोविकारांचें नैसर्गिक चित्र या दृष्टीनें तें उठावदार होतें. त्याला काळी लांकडी चौकट घातली असून, तीवर तांबड्या रंगानें 'खून' अशीं अक्षरें कोरलीं होतीं.

"अलकनें माझा चेहरा याहून सुंदर दाखवायला पाहिजे होता." असें मुरारराव आपल्याशींच म्हणाला. कारण तें चित्र अलकनेंच रंगविलें अशी त्याची खात्री होती. या दृष्टीनें जरी तें चित्र उच्च दर्जाचे नसलें तरी कला त्याच्यांत कांहींतरी आकर्षण-शक्ति होती खास ! कारण दुसऱ्या दिवशीं सकाळीं मुरारराव पुनः तिकडे गेला. सुमारें अर्धी घटिका तो त्या चित्रासमोर उभा होता. त्यांचें मन निरनिराळ्या मनोविकारांनीं भरून गेलें व त्याच्या तोंडून एक अस्पष्ट दुःखोद्गार निघाला. पलीकडे उभा असलेला एक म्हातारा इसम आतां हळुहळू पुढें आला. मुराररावा-च्या साऱ्या हालचालींकडे त्याचें लक्ष होतें. मुरारराव चित्राचें लक्षपूर्वक अवलोकन करीत असतां हा म्हातारा तितक्याच लक्षपूर्वक मुराररावाचें अवलोकन करीत होता.

कालची ती तरुणी आजही येईल का अशा आशेनें मुराररावानें दाराकडे नजर फेंकली तितक्यात तो म्हातारा पुढें आला त्याच्या एकंदर वागणुकीवरून तो दुकानाचा मालक असावा असें मुराररावाला वाटलें. चित्राला उद्देशून तो इसम मुराररावाला म्हणाला, "भयंकर आहे नाहीं !" जरी तो हें मराठींतच बोलला तरी तो मराठा नाहीं हें त्याच्या स्वरोच्चारावरून मुराररावानें ओळखलें."

" खरोखरीच भयंकर ! " मुरारराव उत्तरला. तें चित्रच मुळीं एवढें तंतोतत वठलें होतें कीं, मरणोन्मुख विजय आपल्या मांडीवर डोकं ठेवून पडला आहे असा मुराररावाला भास झाला व त्याचें अंग थरारलें. त्या म्हाताऱ्याच्या नजरें-तून हें सुटलें नाही. तो हळूच म्हणाला, " काय राव, आवडलं वाटतें चित्र ?"

" फारच आवडलं ! "

" खरें ? असें काहीं उच्च दर्जाचें नाहीं तें. चित्र काढणारी व्यक्ति तरुण व नवशिकी आहे असा माझा समज आहे."

" एकूण तुम्ही तिला ओळखतां तर ? "

" तिला ? " म्हातारा जरा गोंधळला. " हं–हं ! मीं तिला एकदां पाहिलें आहे. असें बघा, मीं कांहीं हें चित्र खास विकत घेतलेलं नाहीं. स्वस्तांत मिळालें तर घेईनही. चित्र भयंकर आहे खरं. पण कांहीं माणसांच्या आवडीही अशाच भयंकर असतात. न जाणो ! तसलें एकादे गिऱ्हाईक घेईलही म्हटलं हें विकत. चित्रविक्या आहें मी."

" तें मीं ओळखलेंच होतें."

" महाराज, घेतां का हे विकत ? "

" नको रे बाबा, फुकट दिलंस तरी नको. याच्या दर्शनानें कांहीं दुःखदायक आठवणी कशा डोळ्यासमोरून हालेनातशा होतात. सारें नजरेसमोर दिसतें आहे बघ.

हें ऐकून त्या म्हाताऱ्याने अंमळ खाकरून आपल्या हनुवटीवरून हात फिरविला.

मुराररराव त्या विवक्षित दिवसाविषयी विचार करूं लागला. त्याचा चेहरा गंभीर झाला. त्याच दिशेनें त्याचे विचार कुणीकडे वाहवले असते कुणास ठाऊक पण तेवढ्यांत आदल्या दिवशीं मुराररावाचें मन मोहून टाकणारी ती तरुणी तारा व तिची आत्या ह्या दोघी तिकडे आल्या. आपण जणुं तें चित्र पाहिलेंच नाहीं अशी निर्विकार मुद्रा करून मुरारराव बाजूस झाला. म्हाताऱ्या चित्रविक्याचें मुराररावाच्या प्रत्येक हालचालीकडे लक्ष होतेंच. तारेनें मुराररावाला पाहिलें नाहीं. त्या चित्रासमोर उभी राहून ती आपल्या आत्याबाईंना म्हणाली, " आत्याबाई या तरुणाविषयी मला फारच आदर वाटतो. किती परोपकारी नव्हे का ? आत्याबाई, हसूं नका गडे. मानें मन की नाहीं त्यानें अगदी आकर्षून घेतलें आहे."

असे म्हणून त्या चित्रांत मुरारराव म्हणून काढलेल्या त्या कुरूप तरुणाकडे तिनें बोट दाखविलें मुराररावानें तिचें भाषण ऐकलें " अरे देवा, अलकनें जर मला आहे तसा रंगविला असता तर " मुराररावाला पुढे विचार करवेना. समाधान एवढेंच की, चितोडला असताना मुराररावानें दाढी राखिली होती व हल्लीं कांहीं महिन्यांपूर्वी त्यानें तिला रजा दिली होती.

आत्याबाई बोलत होत्या, " तारे, काल आपण इकडे पाहिलेल्या त्या तरुणासारखा हा नाहीं का थोडासा दिसत ? "

" छेः हो, कांहींतरीच तुमचें."

" बरें; पण तारे, यापेक्षां एकाद्या सजीव तरुणावर कां नाहीं तुझें मन जडत ? निर्जीव चित्रावर कसलें बाई प्रेम ? "

" आत्याबाई, हें कांहीं मनानें, कल्पनेनें काढलेलें चित्र नव्हे. वस्तुस्थितीवरूनच हें रंगविलेलें आहे."

" कशावरून ग बये ! "

" प्रथमदर्शनींच मला या चित्राविषयीं जिज्ञासा कां वाटूं लागली हें तुम्हांला

ठाऊक आहे काय ? सुमारें आठ दिवसांपूर्वी राजपुतान्यांत घडलेल्या एका द्वन्द्व-युद्धाची हकीगत मला कळली. तींत या शकुनी मोहरेचाही उल्लेख केला होता. त्यामुळें मला या चित्राविषयीं व विशेषतः या तरुणाविषयीं—फारच जिज्ञासा वाटूं लागली. पण नतर मला मत्सरानें ग्रासलें.

" क-काऽऽय ? "

" या तरुणाच्या बाबतींत मला एक वांटेकरीण आहे." खोट्या गांभीर्यानें तारा उत्तरली. आत्याबाई थक्कच झाल्या.

" आत्याबाई, या तरुणावर दुसरी एक तरुणी प्रेम करिते. एका रजपूत कुमारीला याच ठिकाणीं एकसारखी प्रेमानें टक लावतांना मीं पाहिलें. मला या चित्रामध्यें जिज्ञासा वाटते हें तिनें ओळखलें व माझ्याकडे येऊन मी त्या चित्राकडे एकसारखी का पहातें असा मला तिनें बेधडक प्रश्न केला. त्या द्वन्द्वाविषयी मीं तिला कांहींच सुगावा लागूं दिला नाहीं. त्या सहानुभूति दाखविणाऱ्या तरुणाविषयीं मला भारी आदर वाटतो असें मीं सांगितलें. तेव्हा खिन्नपणें हंसून ती म्हणाली, " होय, त्यानें सहानुभूति दाखविली पण संभाळ, त्याच्यावर भाळूं नकोस हो. तो खराखुरा जिवंत इसम आहे." त्यावर मीं म्हटलें कीं, तूंही काळजी घे. कारण तूंही अगदीं प्रेमानें त्याच्याकडे पहातेस. तेव्हां तिनें उत्तर केलें कीं, " मी त्याच्याकडे पहात नसतें. मी त्या मृत तरुणाकडे पहातें. तो माझा भाऊ होता." नंतर ती निघून गेली. चौकशी करतां मला कळलें कीं, तो तिचा भाऊच होता व तिनेंच हें चित्र रंगविलें. असला विषय तिनें पसंत केला, म्हणजे किती विचित्र तिची रुचि नाहीं ? "

" कांऽहीं नाही. निर्जीव चित्रावर प्रेम करण्यापेक्षां हें पुष्कळ बरें. पण काय ग तारे, हा तरुण कधीं तरी आपल्याला भेटेल अशी खुळी आशा तर नाहीं ना तूं करीत ? "

" छेः छेः आत्याबाई, ती नको तुम्हांला काळजी ! " किंचित् हंसून तारा म्हणाली.

" अग पोरटे, पण तो खराच जर तुला भेटला तर ? "

" तर-तर काय ? तुम्हांला जांवईबुवा मिळतील. जाऊं दे ती थट्टा. पण आत्याबाई, खरेंच सांगा. द्वेष, विजय किंवा राग हे विकार साऱ्यांच्या चेहऱ्यावर

दाखविले आहेत; पण दया हा विकार त्याच्या खेरीज कुणाच्या तरी चर्येवर आहे का ? माझी खात्री आहे कीं, हा तरुण अत्यंत शूर व तेवढाच प्रेमळ असेल, काय करूं शक्य असतें तर मीं हें चित्र विकत घेतलें असतें." एवढें बोलून तारा आपल्या आत्याबाईबरोबर निघून गेली. पण जातां जातां तिनें त्या चित्रांतील मुरारराववर असा कांहीं गोड कटाक्ष फेंकला कीं, इकडे खराखुरा मुरारराव भलताच गाऽऽर झाला. मुराररावाला त्याचें सारें भाषण कांहीं ऐकायला आलें नाहीं. पण जें थोडें-फार त्यानें ऐकलें तें त्याला एकदम खुष करायला पुरेंसें होतें. हा वेळपर्यंत कुरूप वाटत असलेलें आपलें चित्र आतां त्याला फारच सुंदर दिसूं लागलें. बस्स, तें चित्र विकत घ्यावयाचें असा त्यानें निश्चय केला. तारेला तें इतकें आवडलें आहे, तेव्हां आपल्याबरोबर तिचें लग्न झाल्यास तिला तें लग्नादिवशीं बहाल....सूसू. आनंदाच्या भरांत मुराररावानें आपल्या हनुवटीलाच कुरवाळलें. पलीकडे कोंपऱ्यांत बसून तो चित्रविक्या मुरारराववर नजर ठेवीत होता. त्याला मुराररावानें हांक मारली, व तें चित्र आपल्या घरच्या पत्त्यावर पोंचतें करण्याचा हुकूम फर्मावला. सरसकट साऱ्या जगावर खुष होऊन मुरारराव आपल्या घरीं निघाले. त्यांच्या घराच्या अलीकडे सुमारें शंभर पावलांवर असले-ल्या एका वाड्याच्या बाहेर तारा व तिच्या आत्याबाई बोलत उभ्या होत्या. तिकडून पुढें जातां जातां मुराररावाच्या कानावर खालील शब्द पडले.

" तारे, थोडा फराळ तरी करून जा."

" नको हो. मला आतां मुळींच वेळ नाहीं. पिल्या आहे ना तयार ? चल म्हणावें हं बिजली, उचल पाय." शेवटले शब्द आपल्या घोडीस उच्चारून तारेनें टांच मारली व तिच्या नौकरानें लगेच तिचें अनुकरण केलें.

इकडे तिकडे न पहातां मुराररावानें झपाझप चालायला सुरुवात केली. घरीं पोंचल्याबरोबर घोड्यावर जीन कसायला सांगून तारा गेली त्या रस्त्यानें दौड करावयास त्यानें सुरुवात केली. तो गेला इतक्यांत दोन रजपूत घोडेस्वारांसह तो चित्रविक्या तिकडे आला. एका स्वारानें दोन्ही घोड्यांच्या लगामी हातीं धरल्या होत्या व तें चित्र दुसऱ्या स्वाराच्या हातांत असून तिघेही पायींच आले होते. मुराररावाला गेलेला त्यांनीं ओझरतें पाहिलें. चित्रविक्या त्या दोघांकडे वळून म्हणाला, "ठेवा तें चित्र खालीं. आणि पिटाळा त्याच्या पाठीं. नजर चुकूं देऊं नका. हलकाऱ्याबरोबर

वेळोवेळीं मला बातमी पाठवीत चला.'' हुकुमाप्रमाणें ते घोडेस्वार पाठलाग करूं लागले.

आपला पाठलाग होत आहे अशी अंधुकही कल्पना नसलेली तारा सर्वांत पुढें होती. मागून मुरारराव दौडत होता. त्यालाही आपला पाठलाग होतो आहे अशी कल्पना नव्हती. त्याच्या मागून ते दोघे रजपूत घोडे दामटीत होते. त्यांतील एक दुसऱ्याकडे वळून म्हणाला, "आपल्या सावजाला एवढें भिण्यासारखें काय झालें ! बाकी युक्ति पण युक्ति ! कनैयाला चित्र घरीं पाठवायला सांगून आपण स्वतः सातारच्या दिशेला जिवापलीकडे दौडत जातों काय ! वा जी वा !"

## प्रकरण सहावें

# साताऱ्च्या रस्त्यावर

पुण्यापासून सुमारें दोन अडीच कोस आल्यावर, तारा एका विवक्षित ठिकाणीं थांबली. पाव घटका कोणाची तरी वाट पाहिल्यावर, आजुबाजूला कोणी दिसले तर पहा असा तिनें आपल्या नौकराला हुकूम फर्माविला. पण सर्वत्र शुकशुकाट. तारेचे तोंड किंचित् म्लान झाले ती पुन्हा घोडीवर बसली व कूच करण्यास तिनें सुरुवात केली. ती गेल्यानंतर थोड्या वेळानें मुरारराव व नंतर ते दोन रजपूतही त्याच रस्त्यानें गेले

आणखी दीडदोन कोस दौड केल्यावर तारा पुनः थांबली. आतां ती थांबली तें एक साधारण मोठे खेडे होते, व वाटसरूंना उतरण्यासाठीं तिथें दोन तीन ठिकाणें होती. पिल्याला जवळ बोलावून तारा म्हणाली, " पिल्या, जा बरें. धर्म-शाळा साऱ्या शोध, आणि धाकट्या आत्याबाई कुठें उतरल्या आहेत तें पाहून ये. " दोन्ही घोडे झाडाला बांधून पिल्या शोधाला गेला. तारेचें मन उत्सुक झाल्यामुळें, तिने मुराररावाच्या घोड्याच्या टापा ऐकल्याही नाहींत. ती उभी होती तिथून थोड्या अंतरावर मुराररावाने आपला घोडा थांबविला, व तो खालीं उतरला. एवढ्यांत पिल्या परत आला, व आत्याबाई कुठेंही नाहींत असें त्यानें सांगितलें. तारेची स्थिति आतां विचित्र झाली, व तिला आपल्या धाकट्या आतेचा थोडासा रागही आला.

तिला मदत करावयाला ही बरी संधि आहे असें वाटून मुरारराव तिच्याजवळ गेला व अगदीं नम्रतेनें म्हणाला, " कुमारी, कांहीं मदत पाहिजे असल्यास हुकूम व्हावा ! " दचकून तारेनें पाठीं पाहिलें. आदल्या दिवशीं त्याला पाहिल्या-चें तिला स्मरलें; पण त्याच वेळी तिचें त्याच्याविषयीं वाईट मत झालें होतें. तो चित्रांतला तरुण अशी तर तिला कल्पनाही नव्हती. फणकाऱ्यांत मानेला हिसडा देऊन जरा तिरस्कारानें ती म्हणाली, " मराठा तरुणी एवढ्या परतंत्र नसतात."

आपली डाळ शिजणें कठिण आहे हें समजून मुरारराव गप्प राहिला. पिल्या-जवळ कांहीं बोलून तारेनें पुन्हा घोडीवर मांड कसली. तिला थोडें पुढें जाऊं देऊन मुराररावानेंही आपला घोडा सोडला. या वेळीं जर त्यानें पाठीं वळून

पाहिलें असतें, तर ते दोघे रजपूत एका झाडाच्या आड कांहीं मसलत करितांना त्याला दिसलें असतें व नंतर " दुर्जनसिंह राठोड यास " असा पत्ता लिहिलेला लिफाफा एका हलकाऱ्याजवळ त्यांनीं दिला हेंही त्यानें पाहिलें असतें. परंतु मुरार रावाचें मन कांहींसें उद्विग्न झालें असल्यानें त्यानें यांतील कांहींच पाहिलें नाहीं. तारेच्या दर्पोक्तीचा त्याला थोडा रागही आला. विचाराच्या भरांत तो अगदीं तारेच्या घोडीजवळ गेला. तारेनें तिरस्कारानें त्याच्याकडे पाहिलें. तिला एकटी पाहून कांहींतरी लघळपणा करावयाचा आपला विचार आहे, असा तर नसेल ना तिचा समज झाला ? या विचाराबरोबर मुराररावाला स्वतःचाच राग आला.

आणखी थोडा वेळ असाच पाठलाग करण्यांत गेला. मुराररावानें आतां मध्यें बरेंच अंतर ठेवलें होतें; पण आपण वेग न वाढवितां मधील अंतर भराभर कमी होत चाललेलें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. तारेच्या घोडीकडे निरखून पहातां ती लगडत आहे असें त्याला दिसलें. तोंच तारा खालीं उतरली. पिल्यानें घोडीचे पाय तपासले; तेव्हां पाठच्या डाव्या पायाचा नाल पडल्याचें त्याला आढळलें. वस्तीपासून ही जागा थोडी दूरच असल्यामुळें तारा अस्वस्थ झाली. आतां काय करणार ! पिल्यानें नाल मारायला घोडी नेली तर ती एकटी इकडे रानांत कशी रहाणार ?

मुराररावानें तर्कानें वस्तुस्थिति जाणली. मदत पाहिजे असल्यास तिला पुन्हा विचारावें असें एकदां त्याच्या मनांत आलें. पण दुसऱ्याच क्षणीं त्याला तिच्या शब्दांची आठवण झाली. ऊन बरेंच झालेलें. तशांत पुणें सोडल्याला किती तरी वेळ झाला असल्यानें तिला भूकही लागली असणार ! मुरारराव असले विचार करीत होता. एवढ्यांत तारेनें आपल्याकडे ओझरतें पाहिल्याचा त्याला भास झाला. धैर्य करून तो पुढें झाला, व " कांहीं मदत पाहिजे काय ? " असा त्यानें तारेला प्रश्न केला. तारेला आतां खरोखरीच मदतीची अपेक्षा होती. पण तिचा मानी स्वभाव आड आला. नजर दुसरीकडेच वळवून ती उत्तरली, " माझा नौकर बरोबर आहे, तो करील मला मदत."

आतां मात्र अपमानाची सीमा झाली ! मुराररावानें कांहीं विचार ठरविला व तो घोड्यावर चढला. आणखी सुमारें पाव कोस पुढें एक खेडें असून तिकडे चांगली धर्मशाळा व लोहाराचें दुकान असल्याचें त्याला माहीत होतें. तो घोड्याला टांच मारणार तोंच त्याला " महाराज, थांबा जरा ! " असे शब्द ऐकू

आले. त्यानें वळून पाहिलें, तर पिल्या पळत येत होता. जवळ येऊन पिल्या म्हणाला, "जवळपास एखादा गांव आहे काय ? लोहाराकडून नाल मारून घेतला पाहिजे व आमच्या ताईसाहेबांच्या फराळाची कांहीं व्यवस्थाही पहावयाला हवी."

" होय. आणखी पाव कोस पुढें तुम्हांला पाहिजे तसें एक खेडें आहे." तें ऐकून पिल्या आनदानें परतला. जरा पुढें जाऊन मुरारराावानें पाठीं वळून पाहिलें. तारा पिल्याच्या घोडयावर बसली असून, तिच्या घोडीची लगाम हातीं धरून पिल्या चालत होता. " हं या गतीनें तारा आल्यास आपण केव्हांच त्या खेडयांत पोहोंचूं !"

योग्य वेळीं मुरारराव त्या खेडयांत पोहोंचला. लगेच तो तिकडील खाणावळींत गेला. तिकडे तेवढी एकच खाणावळ होती. मालकाला जवळ बोलावून मुरारराावानें त्याच्या हातांत एक चांदीचें नाणें ठेवून म्हटलें, " मालकसाहेब, एक काम केलें पाहिजे."

मालकाचे डोळे चांदीनें निवालेच होते. तो लगेच मान हालवीत म्हणाला, " हुकुमाचा बंदा आहें सरकार. लागेल तें काम सांगावें."

" हें पहा काम बिनचूक झाल्यास दाम दुप्पट मिळेल. आणखी थोड्या वेळांत एक मराठा तरुणी व तिचा नौकर इकडे येतील; व तुम्हांला जेवणाची व्यवस्था करावयास सांगतील. तुम्ही 'ह्या वेळीं पुन्हा जेवण करणार नाहीं, केलेलें होतें तें आतां आणखी पाहुणे आले त्यांना पाहिजे' असें सांगा. कुठल्याही सबबीवर जेवण करूं नका. पहा बरें, यांत चुकतां कामा नये. मग तीं दोघें कंटाळून जरा बाजूस जाऊं लागलीं कीं, तुम्हीं मला हांक मारून पान वाढल्याची वर्दी द्या. बस्स हेंच तुमचें काम. विसरायचें नाहीं."

मान हालवीत मालक निघून गेला. नंतर मुरारराव लोहाराचें दुकान पाहूं लागला. लौकरच त्याला तें मिळालें. मालक आंत होता. मुरारराावाला पहातांच तो उठला. त्याच्यावरही मुरारराावानें रौप्यमुद्रांचा प्रयोग केला. खाणावळीच्या मालकाहून लोहार कसलेला होता. पैसे पहातांच लवून मुजरा करून तो म्हणाला, " हुजुरांचें काय काम आहे ! आतां चोख करून टाकतों." पैशाचा हा प्रभाव पाहून हंसत हंसत मुरारराावानें म्हटलें, " हें बघ, नाल मारण्यासाठीं घोडी घेऊन इतक्यांत एक नौकर इकडे येईल. पण अगोदर इकडे लोहाराचीं दुकानें किती आहेत तें सांग बरें."

"हुजूर, दुकान असें एवढें एकच आहे. पण माझे दोघे लेंक असे अली-पलीकडे झाडाखालीं बसतात जी. या डाव्या बाजूच्या पारावर एक बसतो आणि त्या उजव्या हाताला त्या थोरल्या झाडाखालीं दुसरा बसतो हुजूर. पण आज ते दोघेबी आपल्या आजोळला गेलेत; येतील उद्यां परवां." मुराररावाचें अर्धें अधिक काम झालें. तो म्हणाला, "बरें, आतां तूं असें कर. आजारी असल्याचें सोंग घेऊन पड. व तो नौकर आला म्हणजे आपल्याला काम होणार नाहीं असें त्याला सांग. नंतर मी ती घोडी घेऊन स्वतः नाल मारण्यासाठीं एकटाच येईन. तेव्हां तूं उठून झटकन् नाल मारून दे. कीं झालें तुझें काम. काम चोख कीं दाम रोख!"

इतकें सोपें काम पाहून लोहार खूष झाला व त्यानें पुनः एकदां मुराररावाला मुजरा केला.

प्रकरण सातवें

## पाठलाग [ पुढें चालू ]

नंतर खाणावळीत परत आल्यावर मुराररावानें आपला घोडा तबेल्यांत बांधला व चढाव काढून तो हातपाय धुवावयास जवळच्या विहिरीवर गेला. तिकडून परत येत असतां खाणावळीच्या मालकाचें व पिल्याचें मोठमोठ्यानें भाषण चाललेलें त्यानें ऐकलें. बाजूला उभ्या असलेल्या तारेकडे न पाहिल्यासारखें करून तो मुकाट्यानें मालकाजवळ गेला व त्या माणसाला काय पाहिजे असा त्यानें मोठ्यानें प्रश्न केला. शिकविल्याप्रमाणें बोलून मालकानें मुराररावाला पान वाढूं का म्हणून विचारलें. त्याबरोबर रागाचा आविर्भाव आणून मुरारराव म्हणाला, "तुम्हांला बिलकूल कळत नाहीं. मला नाहीं जेवण मिळालें तर मी कांहीं मरत नाही. चला, आधीं त्या माणसाच्या मालकिणीसाठीं पान वाढा. पण थांबा, मीच त्यांना सांगतों." मुरारराव तारेजवळ आला. क्षुधेनें व चिंतेनें तिचें मुखकमल कोमेजलें होतें. त्यांत आणखी आतां जेवणासंबंधीं निराशा झालेली. तिचा तो पडलेला चेहरा पाहून मुराररावाला खरोखरच वाईट वाटलें. तो म्हणाला, "इकडला मालक अगदीं मूर्ख आहे कांहींसुद्धां कळत नाही त्याला. जेवण तयार आहे. आपण जेवून घ्या." तारेचें मन आतां मुराररावाबद्दल बरेच साफ झालें. तिनें कृतज्ञतेनें एकदां त्याच्याकडे पाहिलें व पिल्याला हांक मारून आपण इकडे जेवण करणार, तोंवर घोडीला नाल मारून आण असें सांगितलें. पिल्या घोडीला घेऊन गेला. इकडे तारेचें जेवण व मुराररावाचा फराळ आटोपून तीं दोघें बाहेर आलीं. तोंच पिल्या परत आला. लोहार आजारी असल्यानें कितीही हुज्जत घातली तरी नाल मारून द्यायला तो कबूल नसल्याचें त्यानें सांगितले. तारेला मोठेंच संकट पडलें. मुराररावानें एकदां मदत केली असल्यानें आतांही तिची नजर त्याच्याकडे गेली. मुरारराव त्या नजरेंतील अर्थ उमजला, व पुढें होऊन तो पिल्याला म्हणाला, "इकडे कर घोडीची लगाम मला साधारण नाल मारतां येतो. दुकानांत जाऊन त्याच्या हत्यारांनीं नाल मारून आणतों. पिल्याला मुराररावाबरोबर जाण्याची तारेनें खूण केली. पण तसें केल्यास आपला बेत फसेल, म्हणून मुराररावानें त्याला आपल्या पोटाची व्यवस्था बघावयास सांगितलें व तो एकटाच निघून गेला. थोड्याच वेळांत

मुरारराव घोडीला नाल मारून घेऊन आला. अवघ्या दोन तीन घटकांपूर्वी ज्या तारेला मुराररावाविषयीं तिटकारा वाटत होता, तिलाच आतां त्याच्याविषयीं भक्कम पूज्यभाव वाटूं लागला. लाजेमुळें तिला आतां त्याच्याकडे नुसतें पहाणेंसुद्धां चमत्कारिक वाटूं लागलें. पण कांहींच न बोलणें हें शिष्टाचाराला वाईट दिसेल म्हणून तारा हळुहळू त्याच्याजवळ आली व म्हणाली, "आपण आज आमच्यावर फारच उपकार केलेत. आपण भेटलां नसता तर माझें काय झालें असतें कोण जाणे. आपण जर पुढे जाणार असला तर अनायासें आम्हांला चांगली सोबत होईल. शिवाय आपण आतां गेलां होतां तेव्हां दोघे रजपूत त्या झाडापलीकडे बसून काहीं कुजबुजत होते. मला तुटकतुटक ऐकू आले कीं, त्या मराठा पोरीवर नजर ठेव हां ! मराठमोळ्यापेक्षां हिचा त्रास कमी व कामही जास्त सोपें. एवढें बोलून त्यानें आपल्या साथीदाराजवळ माझें व आपलें वर्णन केलें. तेव्हां आपलें जरा हें वाटतें. मी एकटीच आहे. पिल्या आतां म्हातारा झाला आहे. आपली सोबत मिळाली तर फार बरें होईल."

"कुठें–कुठें आहे तो हरामजादा त्याला चांगला धडा शिकवितों मी"

"तो पलीकडे उभा आहे ना, तोच तो. दुसरा कुठें गेला काय जाणे. पण माझी स्थिति सध्यां जरा चमत्कारिक आहे, तेव्हां आपण आतांच असले धाडस करूं नये."

मुराररावाला हें पटले असावे, कारण तारा घोडीवर बसताच तोही घोड्यावर स्वार झाला. व त्यानें तारेच्या बाजूनें जावयाला सुरुवात केली. मुराररावानें घोड्याला फार वेग दिला नाहीं हे पाहून तारा म्हणाली, "घोड्याला टाच मारायला हरकत नाही. माझ्या दादानें घोड्यावर बसण्यांत मला बरीच पटाईत केली आहे." तारेचें घोड्यावर बसण्याचें तें कौशल्य पाहून मुराररावाला फार कौतुक वाटलें. सूर्य मावळूं लागला होता आता लागेल त्या खेड्यांत मुक्काम करावयाचा मुराररावानें विचार केला. व त्याप्रमाणें पुढल्याच खेड्यांतील एका बऱ्याशा खाणावळींत आपले तिघे प्रवासी उतरले. तारेला एका खोलींत बसावयाला सांगून व्यवस्था पहाण्यासाठीं मुरारराव बाहेर गेला. एवढ्यांत पिल्या आंत येऊन तारेला म्हणाला, "ताईसाहेब, धाकट्या आत्याबाई ह्याच खाणावळींत मुक्काम करणार होत्या म्हणून मीं मालकाकडे चौकशी केली. तेव्हां तो म्हणाला कीं, सकाळपासून कोणीच मुक्कामाला इकडे आलें नाहीं. मात्र थोड्या वेळापूर्वी लखोटा घेऊन साताऱ्याहून एक हलकारी आला होता. त्यावर आपलेंच नांव आहे. हा घ्या तो."

अत्यंत उत्सुकतेनें तारेनें लखोटा फोडला. आंतील पत्र साताऱ्याहून तिच्या धाकटया आतेनें पाठविलें होतें. प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें आपल्याला येतां येत नाहीं असा त्यांत मजकूर होता. तारा आतां अगदीं त्रासली, काय करावें तें तिला सुचेना. मुरारराव खोलींत आले हें सुद्धां तिनें पाहिलें नाहीं. तिच्या पुढ्यांत पत्र पडलेलें पाहून मुराररावानें त्याविषयीं तिला प्रश्न केला. तेव्हां भानावर येऊन तारा उभी राहिली व म्हणाली, " साताऱ्याहून धाकटया आत्याबाईनें तें पाठविलें आहे. माझा दादा सैन्यांत शिलदार आहे. तो उद्यां सातारला येणार आहे तेव्हां मला तिकडे उद्यां पोहोंचलेंच पाहिजे. दोन वर्षांनीं मला तो भेटणार मला सोबत ताबडतोब मिळणार नाहीं, म्हणून धाकटया आत्याबाई साताऱ्याहून निघून वाटेंत मला भेटणार होत्या आणि आतां हें पत्र धाडतात कीं, यायला होत नाहीं ! दादाला जास्ती दिवस रहाणेंही शक्य नाहीं. आतां काय करूं ? एकटीच पुढें तरी कशी जाऊं ? "

" जर हरकत नसेल तर मी सोबत करीन; कारण मलाही तिकडेच जावयाचें आहे."

" आपल्याला वारंवार असा त्रास देणें जिवावर येतें. पण इलाजच नाहीं. आणखीन् ते मेले आहेत ना दोघे ! पाठच पुरवताहेत. आपण बरोबर येणार हें ऐकल्यापासून मला किती समाधान वाटलेंय् पण ! आतां माझा दादा मला भेटेल; पण माझ्या उपकारकर्त्यांचें नांव नाहीं मला अजून कळलें."

मुराररावानें आपलें नांव वगैरे तिला सांगितलें. आतां तिचें नांव विचारण्याचा हक्क त्याला प्राप्त झाला. त्यानें विचारलें, " आपलें नांव नाहीं का मला कळणार ? "

" इश्श, त्यांत काय एवढें मेलें. माझें नांव तारा. पुण्याच्या सरदार शिर्क्यांची मी मुलगी." लाजत लाजत तारा म्हणाली.

हवें होतें तें मुराररावाला कळलें. पहांटे मुक्काम हालवावयाचा असें सांगून तो आपल्या खोलींत निघून गेला. " तारा शिर्के " या नांवाचा जप करतां करतां आपण शिर्क्यांचें नांव कुठें तरी ऐकल्यासारखें त्याला वाटलें. तिच्या भावाला तर नाहीं ना आपण ओळखीत असा विचार करीत तो झोंपीं गेला. पण जागें झाल्यावर, तारेकडून तिच्या भावाची माहिती मिळवावयाची असा त्यानें निश्चय केला.

## प्रकरण आठवें

# " तो नाहींच का कधीं मला सांपडणार ? "

दुसऱ्या दिवशीं पहांटे प्रवासाला परत सुरुवात झाली. थोडा वेळ गेल्यावर मुराररावानें तारेला तिची हकीकत विचारली, व तिनेंही ती मोकळ्या मनानें सांगितली. श्रीमंती विशेष नसली तरी ती सरदारकन्या होती. तिची आई व वडील ती लहान असतांनाच वारलीं होतीं, आणि तिला एक वडील भाऊ तेवढाच होता. तो सैन्यांत दुय्यम सेनापति होण्याचीच वाट पहात होता. नंतर तो नौकरी सोडून पुण्यास वतनवाडीची व्यवस्था पहाणार होता. कारण आतां तोच सरदार होता. तारेचें भावावर फारच प्रेम दिसत होतें. किंचित् काळ स्तब्ध राहून तिनें फिरून त्याचें स्तुतिस्तोत्र सुरू केलें. तो सैन्याबरोबर चितोडला गेला होता. नंतर जयपूर येथें रजपुतांबरोबर लढतांना तो कसा जखमी झाला, त्या वेळीं एका रजपूत कुमारीनें त्याची कशी शुश्रूषा केली. त्यानें अस्सल मराठा तरुणीबरोबरच विवाह करावा अशी तारेची मनापासून इच्छा असल्यामुळें त्या कुमारीवर त्याचें प्रेम बसलें असेल कीं काय असें तिला कसें भय पडले वगैरे सारें तिने मुराररावाला सांगितलें. त्याचें नांव " विश्वासराव " हें सांगायला तर ती विसरली नाहींच.

कांहीं वेळ विचार करून मुरारराव म्हणाला, " सुमारें सवा दीड वर्षांपूर्वी मराठ्यांची रजपुतांबरोबर चकमक उडाली त्यांत ते जखमी झाले काय ? "

" हो, त्याच वेळीं. पुढें तो बरेच दिवस जयपुरींच होता."

" मग मला वाटतें मीं त्यांना पाहिलेलें आहे. उद्यां येऊन मी त्यांना भेटेन.",

" जरूर या हं. मला भारी आनंद झाला हें ऐकून." आणि तिचे हंसरे डोळे तिच्या त्या शब्दांच्या सत्यतेची साक्ष देत होते.

मुक्कामाला पोंचेपर्यंत मुरारराव स्तब्धच होता. कारण विजयाबरोबर युद्ध करून जिंकलेल्या त्या मराठ्याच्या तिरकमठ्यावर तारेच्या भावाचेंच नांव होतें अशी त्याची आतां पुरेपूर खात्री झाली होती. म्हणूनच हें नांव त्याला ऐकल्या-ऐकल्यासारखें वाटत होतें ! तारेच्या भावाला ताबडतोब कांहीं अनपेक्षित बातमी सांगून काळजीपूर्वक वागण्याची सूचना देणें जरूर होतें. मुराररावाच्या मनांत

एकसारखा हाच विचार घोळत होता कीं, " महाराष्ट्रांत सूड उगविणें जरी अशक्य असलें तरी विश्वासरावानें आता या भागांत रहाणें जरा धोक्याचेंच आहे. कारण अलककुमारीविषयीं जरी आपल्याला आदर वाटतो तरीपण सूडाचें रजपूत बीं इकडे रुजायला नको."

अशा विचारांतच मंडळी साताऱ्यास पोंचली. तारेला तिच्या आत्याबाईच्या वाड्यांत सोडून मुरारराव खाणावळींत गेला; परंतु त्याला कांहीं चैन पडेना. शेवटीं संध्याकाळीं आत्याबाईच्या वाड्याच्या बाजूला फेरफटका मारावयास तो गेला, पण बाहेर कोणीच न दिसल्यानें तो परत फिरला. तोंच तारेने दाखविलेल्या त्या दोन रजपुतांपैकीं एकाशीं त्याची जवळ जवळ टक्करच झाली. तो रजपूत मुाररावाचा पाठ लाग करीत होता यांत शंकाच नाहीं. आतां मात्र मुाररावाचा राग अनिवार झाला. बिलकूल सूचना न देतां त्यानें त्या रजपुताला दोन हातांनीं वर उचललें व रस्त्याच्या कडेला असलेल्या गुलाबाच्या ताटव्यांत अलग झुगारून दिलें व आपण पुढें चालता झाला. रात्रीं जेवण झाल्यावर तो अत्याबाईच्या वाड्याच्या समोर असलेल्या एका वडाच्या पारावर येऊन बसला. परंतु तारेविषयीं विचार करावयास त्याला फार वेळ सांपडला नाहीं, कारण तो येऊन बसतो तोंच पाठीमागें असलेल्या झाडींत कोणीतरी कुजबुजत असलेलें त्याच्या कानांवर आलें. तो आतां लक्षपूर्वक ऐकूं लागला. तों त्याच्या कानावर पुढील शब्द पडले.

" जय एकलिंगजी ! एकूण आपल्याला सापडला तर तो ! " एका स्त्रीच्या कठांतून हे शब्द आले. हा आवाज ऐकतांच मुाररावाला त्या द्वन्द्वाची आठवण झाली. " कुमारी, तें चित्र पाहून त्याची फार चलबिचल झाली. एका मराठा पोरीच्या पाठीं तो एकडे आला आहे. कुमारी, तो क्रूर मराठमोळा आहे हें माझ्या चेहऱ्यावरील डागावरून दिसतेंच आहे." हें एक पुरुष बोलला.

" होय, माझ्या भाईला त्यानें असेंच क्रूर रीतीनें मारलें. भाईच्या तोंडावर तो काळा डाग शेवटपर्यंत होता. आज संध्याकाळीं आपण त्या खाणावळींत जाऊं, तेव्हां तूं मला व दयाळला तो दाखवून दे. बरें पण त्याचें नांव काय आहे रे ? "

" कनैयाला नांव सांगावयाचें त्यानें नाकारलें."

" अस्सें ! बरें, उद्या दुपारीं दोन वाजतां तूं मला भेट. जर तुझी बातमी खरी ठरली तर मी तुझें जन्माचें दारिद्र्य दूर करीन. हं, जा आतां." तो मनुष्य चालता होतांच, मुरारराव झट्कन् त्या झाडींत शिरला. एक तरुण स्त्री उभी

असून एक म्हातारा इसम जवळच बसला होता. नम्र स्वरांत मुरारराव त्या स्त्रीला म्हणाला, " अलककुमारी, आपल्याला अनपेक्षित इकडे पाहून मला फार आश्चर्य वाटतें."

किंचित् गोंधळून अलक म्हणाली, " आपण मुरारराव नाहीं काय ? आपल्या भेटीनें मला फार आनंद झाला. दयाळ, ह्याच सद्गृहस्थानीं माझ्या भाईचा जीव वाचविण्याचा प्रयत्न केला. मी सांगितलेलें आठवतें ना तुला ! "

दयाळनें डोळे किलकिले करून मुराररावाचें आपादमस्तक निरीक्षण केलें.

" आपण बरेच दिवस इकडे आहां काय ? " मुराररावानें अलकला विचारलें.

" नाहीं आजच सकाळीं मी इकडे आलें."

" कांहीं कामाकरितां—"

" छे—छेः, तुमचा सातारा पहाण्यासाठीं आलें मी. ह्या उभ्या वर्षांत आजच्या-एवढा आनंद मला कधींच झाला नव्हता."

" दुसऱ्याच्या आनंदात मिठाचा खडा टाकावा असें मला कधींच वाटत नाहीं. परंतु कुमारी, आपली निराशा होणार आहे. आपल्या भावाचा खुनी म्हणून आपल्याला कोणता इसम दाखविण्यांत येणार ते मला ठाऊक आहे."

" होय ! कोणता—कोणता इसम तो ! "

" तो इसम म्हणजे मी स्वतः माझ्यावरच त्याचा संशय आहे."

" काय आपण ! ते आपला पाठलाग करीत होते ! अरेरे, देवा, तो कधींच माझ्या तावडीत येणार नाहीं काय ? कधींच नाही का तो मला सांपडणार ? "

आतांपर्यंत स्तब्ध असलेला दयाळ पुटपुटला, " कधीं तरी येईलच तो तावडींत. जातो कुठें ? आणि मग—" सूडाच्या कल्पनेनें दयाळची वयातीत मुद्रा एकाद्या तरुणासारखी टवटवीत दिसत होती.

अलककडे वळून मुरारराव म्हणाला, " आपल्या भावाचा शेवटला निरोप आपल्याला कळवावयाचा आहे. कधीं होईल आपली भेट ? "

अगदीं करुण मुद्रेनें अलक म्हणाली, " रजपूत सराईत. उद्यां कुठल्याही वेळीं."

मुरारराव तेथून जातांच निराशेनें व्याकुळ झालेली अलक दोन्ही हातांत तोंड लपवून रडूं लागली. वृद्ध दयाळसिंग तिची समजूत करण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होता.

प्रकरण नववें

# दुर्जनसिंहाशीं मुलाखत

“ रजपूत सराई ” साताऱ्यांतील एका एकीकडच्या व उजाड अशा रस्त्यावर होती. दुसऱ्या दिवशीं दुपारीं अलकला भेटण्यासाठीं मुरारराव त्याच ठिकाणीं आला. तो जिना चढणार तोंच दुर्जनसिंह वरून खालीं आला व हंसत हंसत सलाम करून म्हणाला, “ सिरोहीला आपली भेट झाली होती त्याला निदान एक तप तरी झालें असेल नाहीं ? ”

सदा विचारी असणारा मानी दुर्जनसिंह इतका प्रेमांत आलेला पाहून मुरार-रावाला जरा विस्मय वाटला पण तसें न दर्शवितां तो उत्तरला, “ वाः दोस्त तुम्ही इकडे कोणीकडे ? बाकी, ” जरा डोळे मिचकावीत, “ अलककुमारीला इकडे पहातांच मी हें समजलोंच होतों. आपण जवळपास असाल असा कयास मीं तेव्हांच बांधला होता.” वास्तविक पहातां दुर्जनसिंहाला साताऱ्यांत पाहून मुरारराव चकितच झाला होता. सूडाची कल्पना एवढी प्रबळ होऊन अलक खुन्याचा पाठलाग करीत साताऱ्याला येते, व दुर्जनसिंह–तिचा पालक–तिला परवानगी देतो हें विचित्रच !

“ हं–हंः, अलकला घेऊन मी इकडे आलों आहें, समजलें का दोस्त मुरार ! ”

“ काय ? तिच्या आगमनाचा हेतु तुम्हांला ठाऊक आहे ? ”

“ अगदीं पूर्ण ! ”

“ भावाच्या खुन्याचा पाठलाग करून त्याचा सूड घेण्यासाठीं ती इकडे आली, हें तुम्हांला ठाऊक आहे ”

“ होय–होय. मला तें सर्व ठाऊक आहे ? ”

“ आणखी, जगांत टक्केटोणपे खाऊन अनुभवी झालेल्या तुम्हीं तिला परवानगी दिलीत ? तुम्ही तिच्यावर प्रेम ना करितां ? मग तिचें तारुण्य व सौंदर्य ह्यांची सूडाच्या पूर्तीमध्यें होळी करावयाला तुम्ही कसे तयार झाला ? ”

“ माझें तिच्यावर प्रेम आहे,म्हणूनच मी तिला मदत करीत आहें ! तारुण्यांतील तिची ही एक खुळी तडफ असेल असें वाटून प्रारंभीं मीं तिला मदत करावयाचें ढोंग केलें; पण पुढें लौकरच मला माझी चुकी कळून आली. विजयाच्या मृत्यूचा

सूड हें तिनें आपल्या आयुष्याचें अंतिम ध्येय ठरविलें आहे अशी माझी खात्री झाली. मी तिला वरवर मदत करीत आहें हें तिला कळून आल्यामुळं ती माझा–जो तिला आपला प्राण समजतो त्याचा–तिरस्कार करूं लागली. ती एकटीच जयपूरला पळून गेली. जर मी तिच्या मागें तिकडे गेलों नसतों, तर ती मला व आपल्या शपथेला विसरून गेली असती; परंतु मी अगदीं वेळेवर पोहोंचलों. तिच्याबरोबर मीं एक करार केला. मीं तिला खुनी शोधून द्यावा; सूडाची पूर्ति झाल्यावर प्रेमाची स्फूर्ति व्हावी व माझा मोबदला म्हणून तिनें माझ्याबरोबर विवाह करावा!"

"आणि तुमची मदत मिळावी म्हणून तिनें आपल्या देहाचा असा विक्रय करावयाचें कबूल केलें?"

"बऱ्याच प्रयत्नानंतर झाली बुवा कबूल. तिचें सध्यां कांहीं माझ्यावर प्रेम नाहीं. माझ्यावरच काय, पण सध्यां कोणावरही प्रेम करणें तिला अशक्य आहे. परंतु, तिच्या शपथेचा निकाल लागल्यावर ती माझ्याकडेच येईल. तिचे हात जरी रक्तानें माखलेले असले तरी मोठया आनंदानें मी तिचें पाणिग्रहण करीन" भविष्यकाळच्या सुखदायक कल्पनेनें त्याचा चेहरा खुलला.

"आपला हा बेत तुम्हीं मला कसा सांगितलात?"

"कां सांगूं नये? तिला विजयाचा कांहीं निरोप तुम्ही सांगणार आहां म्हणून? आपल्या निश्चयापासून ती ढळेल असें त्या निरोपांत कांहीं आहे काय? तुम्ही माझे मित्र आहां. माझी महत्त्वाकांक्षा तुम्हांला ठाऊकच आहे. आणि ती पूर्ण करून घेण्याचें एकमेव साधन म्हणजे तिची सूडाची प्रबळ इच्छा तशीच उत्तेजित ठेवणें!"

"मी हें सर्व अलककुमारीला जाऊन सांगेन."

"खुशाल सांगा. तिचें मन फिरणें शक्य नाहीं. बरे दोस्त, संध्याकाळीं एक फेरफटका मारावयाला याल काय?"

"नाहीं, मला दुसरे उद्योग आहेत."

"ओहो, प्रेमाचे नाजूक उद्योग ना! त्या मराठा कुमारीवर तुमची प्रीति बसली आहे, हें मला ठाऊक आहे. ठीक, पहिल्या मजल्यावर उजव्या हाताच्या तिसऱ्या खोलींत अलक आहे."

प्रकरण दहावें

# जयपूर येथील दयेची देवी

दुर्जनसिंहाच्या या भाषणावर मुरारराव कांहीं उत्तर देण्याच्या आधींच दुर्जन सिंह निघून गेला. विचार करीत करीत मुरारराव वर चढला. खोलीचें दार ठोकतांच अलकनें स्वतःच दार उघडलें. तिचें तें निष्पाप व करुण सौंदर्य पाहून मुराररावाचें मन कळवळलें. तिच्या मनोवृत्ति अगदीं क्षुल्लक कारणानें उत्तेजित होत. मुराररावाला पहातांच ती मोठ्यानें हंसली; पण त्या हास्यांत आनंद नव्हता. लगेच घाईघाईनें ती म्हणाली, " सांगा—सांगा लौकर त्याचे शेवटले शब्द छे: पण शेवटले कसे ते ! अगदीं शेवटीं त्यानें मला " अलक, अलक " अशा हांका मारल्या. होय ना ? हेच त्याचे शेवटचे शब्द. हाय ! भाई ! पण मला त्याचा निरोप सांगा ना. आणि तुम्हीं मला तो पूर्वींच कां सांगितला नाहीं ? " प्रारंभींचा आवेश नाहींसा होऊन तिचा स्वर आतां क्षीण व दुःखी येऊं लागला.

" कुमारी, त्या वेळीं तुम्हांला फार प्रबळ मूर्च्छा आली होती, व मेंदूला विकृति झाल्यामुळें तुम्हांला कांहींच समजत नव्हतें."

" खरें आहे. मला क्षमा करा. कालच्या त्या घोर निराशेनें माझी सारासार विचार करण्याची बुद्धि नष्ट झाली असावी. एक वर्ष जीवापाड मेहनत केल्याचें काल सार्थक झालें असें वाटून एकलिंगजीचे मी आभार मानणार, तों काय ? कांऽऽहीं नाहीं. सारीच निराशा ! हाय ! " तिच्या डोळ्यांतून अश्रु येत नव्हते; पण त्यामुळें तिची चर्या जास्तीच दुःखी दिसत होती. ती पुढें म्हणाली,

" मुरारराव, तुम्हांला हें समजणार नाहीं. तुम्हां मराठ्यांना विचार करितां येतो, पण अनुभवितां येत नाहीं. तुम्हांला देवानें फक्त मेंदू दिला आहे, हृदय दिलेलें नाहीं. आम्हां रजपुतांप्रमाणें तुम्हांला भावना नाहींत. बाकी याबद्दल तुम्हीं देवाचे आभारच मानले पाहिजेत."

" पण आपण माझा निरोप नाहीं ऐकलात ? त्याच्या योगानें आपली निराशा दूर होईल."

" अंहं, तर मग मला नकाच सांगूं. यालाच मी भितें. नका, सांगूं नका. आ

वर्षांत मीं काय काय केलें त्याचें आधीं सिंहावलोकन करा. त्या इसमाला शोधण्या-साठीं मीं किती प्रयत्न केले, किती त्रास सहन केला तें अगोदर लक्षांत घ्या. आणि विजयाच्या शब्दांनीं सुद्धां माझ्या निश्चयापासून मीं परावृत्त होणें शक्य नाहीं अशी तुमची खात्री झाली तरच मला त्याचा निरोप नंतर सांगा." मुरारराव खालीं मान घालून स्तब्ध होता. " मुरारराव, ज्या तुकडीमध्यें तो इसम शिलेदार होता, त्या तुकडीच्या सेनापतीला मी जाऊन भेटलें. पण काय ? व्यर्थ! नंतर मीं जयपुराला गेलें. तेथें लढाईत पुष्कळ मराठा सैनिक जखमी झाले होते. मी त्यांची शुश्रूषा करीत असें. हेतु हा कीं, तापाच्या बरळण्यांत एकादा मराठा कांहीं बोलला तर मला थोडासा धागा सांपडेल. परंतु हेंही सारें व्यर्थ झालें ! ज्याचा प्राण घेण्याची माझी शपथ होती तो जरी मला मिळाला नाहीं, तरी मीं पुष्कळजणांचे प्राण वांचविले. ते गरीब सैनिक मला "देवी" समजत. एक तरुण मराठा असाच जखमी होऊन अत्यवस्थ स्थितींत पडला होता. सर्वजण तेव्हां म्हणाले कीं, मींच त्याचा प्राण वांचविला."

इतक्या वेळांत मुराररावानें आतां डोळे वर करून अलककडे पाहिलें. त्याच्या अपेक्षेप्रमाणें त्याला सूडाची भुकेली क्रूर काली न दिसतां ती दयेची—प्रीतीची देवी दिसली. अलकचे डोळे स्नेहमय दिसत असून, गालांवर लज्जेची लाली चढली होती.

" तो तरुण मला 'दयेची देवी' म्हणत असे. बरें वाटूं लागल्यावर मी त्यांच्याबरोबर फिरावयाला जात असे. प्रकृति निकोप झाल्यामुळें विश्वासराव फारच—"

" कोण ? विश्वासराव ? "

" होय, शिलेदार विश्वासराव, आणखी आडनांव कायसं चमत्कारिक आहे. त्यांचा एक रुमाल आहे माझ्याकडे त्यावर मीं कलाबतूनें त्यांचें नांव गुंफलें आहे. दाखवूं का तुम्हाला." थोडक्याच वेळांत अलक तारेच्या भावाचा रुमाल घेऊन आली व तो मुराररावाला दाखवीत ती उत्सुकतेनें म्हणाली, " काय ? तुम्ही त्यांना ओळखतां ? फार उमदे आहेत नाहीं ते ? "

" मी त्यांच्या बहिणीला ओळखतों. "

" होय, भावाप्रमाणेंच तीही फार सुस्वरूप आहे. मीं तिला पुष्कळदा पाहिलें

पाहिलें होते. माझे तें चित्र पहात ती उभी होती. भारी सुंदर दिसली. मला वाटतें तुमचें तिच्यावर प्रेम आहे, होय ना ? "

या तिच्या प्रश्नाला उत्तर देण्याचें टाळून मुरारराावानें पूर्वीच्या संदर्भाला धरून प्रश्न केला. " नंतर पुढें काय झालें ?"

" पुढें काकाजींनीं जवळ जवळ जबरदस्तीनें मला जयपुराहून नेली. ती हवा मला सोसणार नाहीं असें त्यांचें म्हणणें पडलें. त्यानंतर मीं तें द्वन्द्वयुद्धाचें चित्र काढलें. प्रीति व द्वेष ह्यांचें तें मिश्रणच होतें. चित्र पहातांना एकाद्याच्या मनावर कांहीं विशेष परिणाम झाला व मला पाहिजे त्या गोष्टीचा थोडाफार सुगावा लागला तर पहावं या हेतूनें एक हेर रात्रंदिवस मीं तिकडे ठेवला होता; पण सारं सारं फुकट ! ज्या दिवशीं मी सूड उगवीन त्या दिवशीं माझें सुतक संपेल !"

विषय पालटण्याच्या हेतूनें मुरारराव म्हणाला, " तुम्हीं जयपुरी केलेल्या स्तुत्य कामगिरीविषयीं बोलत होतां त्याच वेळीं विजयसिंहाचा निरोप मीं तुम्हांला कळवावयास पाहिजे होता. माझ्या मांडीवर डोकें ठेवून कुमार निजधामाला गेला, तेव्हा त्यानें निरोप सांगितला कीं, माझ्या मृत्यूच्या आठवणीनें अलकच्या सुखमय आयुष्याची नासाडी होण्यापेक्षां ती मला विसरेल तर फार बरें ! म्हणून म्हणतों, कुमारी, तुम्हांला दुसरें एकादें ध्येय नाहीं का धरितां येत ? "

शांतपणें अलक म्हणाली, " मीं ह्याविषयीं पुष्कळ विचार केला आहे पण मुरारराव, मीं अस्सल चौहानकुमारी आहे. माझे जातभाई नाहीं तर माझा धिक्कार करतील. विजयाचा खून झाला हें त्यांना ठाऊक आहे. तुम्ही अगदीं किसनसिंहासारखंच बोलतां. "

" तुम्ही या विषयावर त्यांच्याशीं बोललांत तर ? "

" होय खुनी इसमाचें वर्णन मीं त्याला विचारलें."

" हं, मग ? "

" मग काय ? विजयाचा मित्र म्हणवतो, पण त्यानें कांहींही माहिती देण्याचें नाकारलें. द्वंद्वयुद्ध नियमाला धरून झालें व तो प्रतिस्पर्धी मराठा शूर, सभ्य आणि शीलवान् होता असें त्यांचें म्हणणें."

" माझें सुद्धां तेंच मत आहे."

" अस्सं ! एकूण आपला दुजोरा आहे तर त्याला ! हुं ! युद्ध नियमाला धरून झालें म्हणें, आणि काय, तर तो शूर होता ! शूर होता तर मग भाईबरोबर युद्ध करितांना नेभळटासारखें आपण तेवढें चिलखत कां हो घातलेन् त्यानें ?".

" चिलखत घातलें ! कोणीं सांगितलें हें तुम्हांला ! "

" सराईच्या त्या म्हाताऱ्या मालकानें. अहो, त्या मराठ्याला किनई वर्मी बाण लागला होता नी तोही भाईसारखाच आटपला असता, पण त्या शूर वीरानें अगोदर काळजी घेतली होती ना सारी."

मुराररावानें शांतपणें तिला त्या शकुनी मोहरेची सर्व हकीगत सांगितली. पण ती कांहीं आपलें म्हणणें सोडीना. " एकूण तुम्ही हें विसरणार नाहींत तर ! " निराश होऊन मुराररावानें विचारलें.

" जोंपर्यंत त्याच्या आठवणीसाठीं माझ्याकडे ह्या वस्तू आहेत तोंपर्यंत तरी तें अशक्य ! आणि अलकनें त्याला विजयाची एक छोटी तसबीर व एक तिरकमठा आणि बाण एवढें दाखवून म्हटलें, " मी हा बाण नेहमीं बरोबर बाळगीत असतें. माझ्या लाडक्या भाईचें रक्त याला लागलेलें आहे; आणि असें असतां माझी शपथ मी कशी विसरेन ! "

" तुम्ही तरुण आहांत. अद्यापि तुम्हांला विशेष अनुभव नाहीं. परंतु द्वेषा पेक्षां प्रीति श्रेष्ठ असते हें आणखी कांहीं दिवसांनीं तुम्हांला पटेल."

भाषण संपविण्याच्या उद्देशानें जाजमावरून उठून अलक म्हणाली, " आजन्म माझ्या मनांत एकाच विकाराची भावना प्रबळ राहील, आणि ती म्हणजे द्वेषाची भावना. आणि तिची पूर्ति झाल्याखेरीज जगांतील सर्व तरुण जरी आपल्या प्रेमसर्वस्वाचें दान करूं लागले, तरी माझ्या हृदयांत प्रीतीचा प्रादुर्भाव होणें अशक्य आहे ! "

" आणि जयपुरांतील बागेंत विश्वासराव शिर्क्यांनीं तें दान केलें तर ! " मुराररावानें अदमासानें फेंकलेला नेम अचूक लागला. अलक दचकली आणि लाजली; पण क्षणभरच. दुसऱ्याच क्षणीं लज्जेनें रंगलेले तिचे गाल पांढरे फटफटीत पडले. तिच्या तोंडून अत्यंत दुःखाचा एक सुस्कारा बाहेर पडला.

आतां तिकडे राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें लक्षांत येऊन मुरारराव तिकडून निघाला. पण त्याच्या मनांत विलक्षण खळबळ उडून राहिली होती. " जय भवानी ! जर हीं दोघं भेटलीं आणि हिला सारं कळलं तर ! अरे बापरे ! ! "

## प्रकरण अकरावें

## " दुसरे भावोजी "

रस्त्याने मुरारराव एकसारखा ह्याच विचार करीत होता. शेवटी त्यानें ठरविलें कीं, कांहीं झालें तरी तारेच्या भावाने सातारा ताबडतोब सोडणें भाग होतें. विश्वासराव जर साताऱ्यांतच राहिला तर अलकची व त्याची भेट न होणें अपरिहार्य आहे. विजयाचा खुनी तोच आहे हें अलक सहज शोधून काढील आतां काय करावें? तूं एका माणसाचा प्राण घेतला आहेस असें विश्वासरावाला तोंडावर तरी कसें सांगावें! बरें. न सांगावें तर तो सातारा सोडून जाणार नाहीं! कसें करूं? काय करूं ह्या अष्टाक्षरी मन्त्राचा जप करीत मुरारराव खाणावळींत पोंचला. तो सबंध दिवस त्यानें विचारांतच घालविला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तारेकडून त्याला जेवणाचें आमंत्रण आलें. तिच्या धाकट्या आत्याबाईच्या सांगण्यावरून हें आमंत्रण आलें होतें. बारांचें आमंत्रण होतें; पण चैन पडेना म्हणून मुरारराव अकरालाच तिकडे पोंचला. तो जाजमावर लोडाला टेंकून बसताच ताराही मर्यादेनें जरा दूर बसली. किंचित् घाबरत मुरार-रावानें विचारलें, " आपले बंधु कुठें दिसत नाहींत ते?"

" कोण, दादा होय! कालच्या कालच कूच करण्याचा त्याला एकाएकीं हुकूम आला व तस्साच तो गेला. सारा सहासात घटका तो इकडे होता." प्रेमळ-पणानें ओंठाला दुमड पाडून तारा म्हणाली.

हें ऐकून मुराररावाला अगदीं हुश्श झालें व त्या भरांत तो तारेकडे न कळत टक लावून पाहूं लागला. लाजून तारेनें मान फिरवितांच मुरारराव दचकला व मोठ्या कष्टानें दृष्टिकोण बदलून त्यानें म्हटलें, " तुमच्याकडे एखादी तसबीर आहे का त्यांची?"

" तसबीर? नाहीं बाई! दादाच इकडे भेटणार होता मग निर्जीव तसबीर कशाला आणणार बरोबर? आणिक, कळलें का, आपल्याला पाहिल्याचें दादाला कांहीं आठवत नाहीं."

" अस्सं! एकूण सहासात घटका बहिणभावंडांना मिळाल्या त्यांत माझा उल्लेख झाला म्हणायचा!" तारा लाजली. " ते रंगानें कसे आहेत? तुमच्याच-सारखे गोरे आहेत का?" मुराररावानें पुढें विचारलें.

“ होय, माझ्याच वर्णाचा आहे दादा.”

“ आणखी उंची ? ”

“ बरेच उंच आहे तो. तोंडावरून तो फारच उमदा दिसतो.”

या वर्णनावरून मुराररावाला कांहींच स्पष्ट बोध होईना. द्वन्द्वयुद्धांतील मराठा म्हणजे खात्रीपूर्वक विश्वासरावच कीं काय याचा उलगडा झालाच नाहीं. तो आणखी कांहीं विचारणार तोंच तारेची अतिबहीण हिरा खोलींत आली. हिच्याविषयी मुराररावाला तारेकडून बरीच बातमी लागलेली होती. हिरा ही भारी व्रात्य पोरगी होती. ही सध्यां वयानें दहा वर्षांची होती, पण लाडानें अगदीं बिघडल्यामुळें ती कधीं कधीं सहा वर्षांच्या पोरीसारखा हट्ट करी, तर कधीं सोळा सतरा वर्षांच्या एखाद्या आचरट तरुणीला देखील न शोभेल असें ‘प्रेम’ या विषयावर व्याख्यान देई. तारेकडून मुराररावाची हकीकत ऐकल्यापासून ताराताईचें या गृहस्थावर प्रेम जडलें असावें असें तिनें ठाम ठरविलें. तिला बरीच लांचलुचपत देऊन व धाकदपटशाहा दाखवून मुरारराावाच्या समोर कांहीं बडबडणार नाहीं असें तारेनें तिच्याकडून आज कबूल करून घेतलें होतें. पण हिराची कबुली ती, तिची काय शाश्वती असणार ? आतां खोलींत शिरतांच “ काय हो नवे भावोजी ? ” या शब्दांनीं तिनें मुरारराावाचें स्वागत केलें. हें ऐकून तारा तर लाजलीच पण मुराररावही लाजले. तारेकडून हिराची सारी ‘कीर्ति’ ऐकल्यामुळें तिच्या बोलण्याकडे त्यांनीं विशेष लक्ष पुरविलें नाहीं. पण हिरा काय अशी गप्प बसणार ? मोठ्यांदा ओरडून ती म्हणाली, “ काय हो असलें तुमचें ? रिकाम्या हातानींच आलांत वाटतें. ते—ते दुसरे भावोजी आहेत ना ? ” हळूच तारेकडे पाहून, “ ते मला दर वेळेला कशीं सुंदर गुलाबाचीं फुलें नाहींतर खोट्या मोत्यांचा गजरा आणतात ! ” तिच्या बोलण्यांत कांहीं अर्थ नसतो अशा समजुतीनें तिकडे दुर्लक्ष करणारे मुरारराव तिच्या ‘दुसरे भावोजी’ ह्या शब्दांनीं दचकले, व पटदिशीं तिच्याजवळ येऊन म्हणाले, “ हिराताई, दुसरे भावोजी म्हणजे काय ? ”

“ वा ! तुम्हांला नाहीं वाटतें ठाऊक ? अहो, ते सरदार भोसले आहेत ना तेच ते बरें का ! त्यांच्या मनांत आमच्या ताराबाईबरोबर लगीन करायचें. पण ताराताईला नाहीं बरें का ते आवडत ! कशावरून मीं हें ओळखलें, सांगूं ? पण आधीं मला गजरा आणाल का तें सांगा. आणाल ? बऽऽरें हें बघा, काल तुम्ही आलां

नाहींत ना ? तर ताराताई तुमची एकसारखी वाट पहात होती, बरें कां. आणीक......"

पण हिरेला हें वाक्य पुरें करावयाला सांपडलें नाहीं. ताराताईनें तिच्या तोंडावर आपला हात ठेवून म्हटलें, "बरें कां, बरें कां ! आचरट कुठली, जा बघूं बाहेर, मोठ्या माणसांत बडबड करूं नये म्हणून किती वेळां सांगितलें ? जा. नाहींतर सांगेन तुझ्या आबांना !" शेवटची मात्रा लागू पडली. हिरा वडिलांना थोडीबहुत भीत असे त्यामुळें आतां ती लगेच पसार झाली.

मुराररावाचें काम झालें. तारा खरोखरीच आपल्याविषयीं विचार करिते हें दोन वेळां सिद्ध झालें. हिरा गेल्यानंतर तारा बराच वेळ गप्प राहिली. शेवटीं शिष्टाचाराला तें वाईट दिसेल असें वाटून बाजूच्या पेटींतून एक सुंदर गड्डू तारेनें काढला, व तो हातीं घेऊन मुराररावाजवळ येऊन ती म्हणाली, "पाहिला का किती सुंदर गड्डू आहे ? कुणीं दिला असेल मला ओळखा बरें."

गंभीर मुद्रा करून मुरारराव म्हणाले, 'दुसऱ्या भावोजींनीं'. तारा लाजली व मुराररावाला तें दिसूं नये म्हणून हंसून म्हणाली, "छेः दादानें तो माझ्यासाठीं जयपुराहून आणलेला काल मला दिला आणि हें दुसऱ्या भावोजींचें काय प्रकरण काढलेंय उगीच ? तसें कांहींच नाहीं बाई." हें ऐकून मुराररावाचें तोंड फुललें आणि तें पाहून तारा जास्तीच लाजली. "म्हणजे असें कीं, तसें कांहीं नाहीं, अन् तसें कांहीं होणारही नाहीं" असें घाईघाईनें बोलली.

"छेः, उलट जेवढ्या लौकर तसें कांहीं होईल तेवढें बरें असें माझें मत आहे." मृदु शब्दांत मुरारराव उत्तरला, त्यानें असें एक प्रमाण बांधून ठेवलें होतें कीं, एकादी तरुणी एकादा विचार मनांत येऊन लाजली तर तो विचार बऱ्याच वेळां तिच्या मनांत येतो असें खास समजावें. तेव्हां आतां इतक्या जोरांत हिनें तसें कांहीं नाहीं असें आपल्याला जें सांगितलं तें म्हणजे तिचं हृदय अजून 'अनाघ्रातं पुष्पं' आहे ह्या सत्य गोष्टीचा अजाणता दाखल केलेला कां होईना पण भर-भक्कम पुरावाच होय.

मुराररावाच्या शब्दांचा संदर्भ न कळल्यानें तारेनें साहजिक "म्हणजे काय बाई ?" असा प्रश्न केला.

"म्हणजे असें कीं, विश्वासरावानें आता लौकरच स्वतःचा विवाह करावा म्हणजे जोडप्यानें बहिणीचें कन्यादान करायला सांपडेल, नाहींतर एकट्यानेंच करणें भाग पडेल."

तारा चकितच झाली, आपल्या ओळखीला उणे पुरे दोन दिवस झाले आणि ह्यांनीं आपल्याबरोबर विवाह करण्याची इच्छा दर्शवावी ? आणि वाईट हें कीं, आपल्याला त्याविषयीं रागही येऊं नये ? छेः–छेः बाई ! एकूण ग्वाल्हेरचे मराठे भारी उतावळे असतात म्हणून ऐकलें होतें तें खरेंच तर ! तारा पुनः विस्मित झाली आणि त्याबरोबरच सस्मितही झाली. पण मुरारराावाला जरासें जिरवावें अशा विचारानें ती म्हणाली, " तें खरें, पण म्हणतात ना, सत्पात्रीं दान करावें नाहींतर दात्याला पाप लागतें." मुरारराावाला हे शब्द बरेच झोंबले, त्याचें हंसरें तोंड लगेच उतरलें असें पाहून घाईनें तिनें दुरुस्ती केली, " मीं–मीं आपल्याविषयीं नाहीं हो म्हटलें " पण आतां लाजेनें तिला तोंड लपवितां पुरे वाट झाली. " माझ्याविषयीं नाहीं ना ? म्हणजे मी अपवाद–मी एकटाच अपवाद. असें ना ? अं ? काय म्हणतों मी ? " खालीं मान करून मुरारराावानें तारेचें तोंड न्याहाळलें व त्यावरील भाव पाहून ते खूष झाले. इतक्यांत, " हं, ताराताई, बागेकडील तिसऱ्या खिडकींत मी आहें बरें का ? आपलें तुला ठाऊक असावें. आणिक, आईही तिकडेच येत आहे."

आणि खरोखरीच तारेच्या आत्याबाई आंत आल्या. मुरारराावांची ओळख झाल्याबरोबर त्यांनीं अघळपघळ बोलावयास सुरुवात केली. पण त्यांतील मुख्य विषय म्हणजे त्यांचा आर्थिक व सामाजिक थोर दर्जा. मुरारराव ग्वाल्हेरचे असें कळतांच त्या म्हणाल्या, " ग्वाल्हेरच्या त्या सारजाबाईसाहेब मोहिते माझ्या चांगल्या ओळखीच्या आहेत. त्यांचे जडावाचे दागिने फारच उत्कृष्ट आहेत. एवढी श्रीमंत बाई, पण गर्व नाहीं हो. पुण्याला आल्या म्हणजे मला नेहमीं बोलावणें धाडतात नि आपणही येतात. तुमच्या आहेत का हो त्या ओळखीच्या ? "

" होय आहेत." मुरारराावानें हंसून उत्तर केलें.

जरा चकित होऊन आत्याबाईनीं विचारलें, " आहेत ? म्हणजे खूप आहे ओळख ? आणि ती कशी हो ! "

" म्हणजे असें पहा आत्याबाई, ती माझी थोरली बहीण." मुरारराावाच्या या संथ उत्तरानें आत्याबाईंवर बरीच छाप पडली. मुरारराव स्वतः सरदार घराण्यांतील नसले तरी एवढ्या बड्या प्रस्थाकडे त्यांचा निकटचा संबंध आहे तेव्हां ते आपल्या मैत्रीला योग्य आहेत असें त्यांना वाटलें. अशाच आणखी कांहीं गोष्टी होऊन मुरारराव परत गेले; पण:आज घडलेल्या एकंदर बारीकसारीक गोष्टींमुळें मुरारराव स्वतःवर व साऱ्या जगावर बेहद्द खूष झाले.

प्रकरण बारावें

# अलक व तारा

दुर्जनसिंहाच्या मनाची ठेवण कांहीं अपूर्वच होती. अगदीं क्षुल्लक गोष्टींना सुद्धां तो फार महत्त्व देत असे. प्रत्येक कार्याला सामान्य कारणाशिवाय कांहींतरी विशेष कारण असलें पाहिजे व प्रत्येक कृति करण्यापूर्वी मनुष्याच्या मनांत कांहीं तरी प्रयोजन तयार असून तें प्रयोजन नेहमीं वाईटच असतें असें त्याचें ठाम मत—नव्हे सिद्धान्तच होता. खरें निःस्वार्थी असें जगांत कांहींच नसतें. तेव्हां असें असतां अलकला तिच्या निश्चयापासून परावृत्त करावयाला मुरारराव एवढा कां झटतो त्याचा त्याला उलगडा होईना. बरें, पुन्हा विजयाचा खुनी हा एक दख्खनी मराठा होता. मुरारराव तर ग्वाल्हेरचा—उत्तरेचा. मग एकादा दख्खनी मराठा जगांतून नाहींसा झाला तर त्याचें काय सरतें! कांहीं तरी सरतें हें तर खास आणि तें काय असेल हेंच दुर्जनसिंहाला कोडें पडलें.

त्याचप्रमाणें मुराररावानें विजयाचा निरोप अलकला पुणें मुक्कामीं कां सांगितला नाहीं? आणि तोच निरोप आतां साताऱ्याला तिला सांगावयाची त्याला एवढी उत्सुकता कां? गेल्या आठ दहा घटकांतच त्याला ह्या निरोपाची एवढी धांदल कां झाली?

दुर्जनसिंहाला त्याच्या हेरांनीं दोन महत्त्वाच्या बातम्या कळविल्या होत्या. मुराररावाचें तारेवर विशेष लक्ष दिसतें ही पहिली व मराठा सैन्याविषयीं त्याच्या कांहीं गोष्टी चालल्या होत्या ही दुसरी.

आदल्या दिवशीं दुर्जनसिंगानें तारेबरोबर एक तरुण मराठा पाहिला होता. व तो तिचा भाऊ आहे असेंही त्याला कळलें होतें. पुढें विशेष चौकशी करितां तो सैन्यांत शिलेदार असून त्यानें त्याच दिवशीं सैन्याबरोबर कोल्हापूरच्या बाजूला कूच केल्याची त्याला बातमी लागली. दोन नि दोन मिळवून दुर्जनसिंहानें चार असें अचूक उत्तर काढलें. मग काय ह्या शिलेदार शिकर्यासाठीं मुरारराव अलकला तिच्या शपथेपासून च्युत करावयाला पहात होता? बहिणीला बरें वाटावें म्हणून तो भावासाठीं झटत होता काय? भावाला उपकृत करून बहिणीकडून त्या उपकाराच्या नाजूक फेडीची त्याला अपेक्षा होती काय!

अलकच्या चित्राविषयीं तारेला जिज्ञासा वाटत होती हेंही दुर्जनसिंहाच्या लक्षांत आलें. एकंदरींत इकडे बरेंच पाणी मुरतें आहे खास.

दुसऱ्या दिवशीं आपण कोल्हापूरच्या बाजूला जाणार असल्याचें त्यानें अलकला कळविलें व आपण परत येईपर्यंत दयाळसह तिनें साताऱ्यातच रहावें असें सुचविलें.

" काय तुम्ही कोल्हापुराला जाणार ? " त्याच्या सूचनेकडे दुर्लक्ष्य करून तिनें विचारलें. " काकाजी, कांहीं आशा आहे काय ? "

" हो, थोडी फार आहे."

" मग जरूर जा. तो सांपडला कीं मला कळवा. मी ताबडतोब येईन." आतांपर्यंत फिकट दिसणारे अलकचे गाल आशेच्या ओलाव्यानें टवटवीत झाले.

" ठीक आहे. मी एका आठवड्यानें येईन." अलकची रजा घेऊन तो निघून गेला.

त्याच दिवशीं संध्याकाळीं तारा व हिरा यांच्याबरोबर मुरारराव फिरावयास गेला होता. थोडेंसें लांब जातांच हिरेला तिच्या कांहीं मैत्रिणी परत येतांना भेटल्या त्यांच्याबरोबर ती पोर परत फिरली.

फिरत फिरत मुरारराव व तारा एका आंब्याच्या पाराजवळ आले. पारावर अलककुमारी एकटीच बसली होती. मुराररावाला पाहून ती किंचित् हंसली ओळख दाखविली न दाखविली असें करून मुरारराव तारेसह पुढें झटकले.

" मला वाटतें तिची तुमच्याशीं बोलण्याची इच्छा होती. आपण कां नाहीं तिच्याशीं बोललांत ? किती बिचारी उद्विग्न आणि दुःखी दिसते ! कसला बरें ती विचार करीत असेल ? ती पुण्यास एकदां माझ्याशीं थोडें बोलली होती. विसरली वाटतें आतां. पण मला तिचें नांव नाहीं बाई ठाऊक ! माझी ओळख करून द्या ना गडे तिच्याशीं ! " तारा म्हणाली.

तारेची व अलकची ओळख व्हावी अशी मुराररावाची मुळींच इच्छा नव्हती. पण आतां करणार काय ! तारेनें दर्शविलेली इच्छा अमान्य करण्याची त्याची छाती नव्हती. मुकाट्यानें तो अलककडे जाऊन म्हणाला, " अलककुमारी, आपण ओळखतां का यांना ? यांचें नांव कुमारी ताराबाई शिर्के. ताराबाई, या अलककुमारी चव्हाण."

एकदम ओरडून तारा म्हणाली, " कोण ? अलककुमारी ! मग तुम्ही जयपुरास होतां. होय ना ?"

" होय. होतें एक वर्षापूर्वी." हळूच अलक म्हणाली.

" मग तुम्हीं माझ्या भावाची शुश्रूषा केली होती ना ? "

" होय."

" अहा ! मग तुम्हींच त्याचा प्राण वाचविलात तर ! " तारा तिच्याजवळ गेली व किंचित् वेळ तिच्या तोंडाकडे पाहून तिने अलकची हनुवटी वर उचलली आणि अत्यंत प्रेमानें तिच्या गालाचें चुंबन घेतलें. मुरारराव त्या दोघींकडे पाठ करून उभा होता. अलकची चर्या निस्तेज झाली. तारेला दूर लोटण्याचा अर्धवट प्रयत्न करीत ती उभी राहिली. तिच्या अंतःकरणांत कांहीतरी कालवाकालव होत होती.

" काय ? तुम्हांला माझा विश्वासदादा आठवत नाहीं ? " तारेनें जरा खेदानें प्रश्न केला.

' मला, आणि ते आठवत नाहींत ! " एवढें बोलून भावनाप्रवण अलकनें तारेला मिठी मारली. आजूबाजूला कोणींच नव्हतें म्हणून बरें, नाहींतर हा सुंदर देखावा कोणाही सहृदय मनुष्याला मोहून टाकता.

" किती प्रेमळ नि बालिश स्वभाव हा तुमचा ! उगीच नाहीं दादा तुमची स्तुति करीत ! पण तुम्ही कोठें उतरला आहांत ? "

अलकनें रजपूत सराईचा पत्ता सांगतांच तारा उद्गारली, " अगबाई ! मग आमच्या वाड्यावरूनच जातो कीं तो रस्ता. चला गडे, आपण बरोबरच घराकडे जाऊं." तारा आता मुरारावाला अजिबात विसरली. रस्त्यांत दोघीजणींची एवढी बडबड चालली होती कीं, कुणाला वाटेल ह्या बाळपणापासूनच्या सख्या आहेत.

दुसऱ्या दिवशीं सध्याकाळीं मुरारराव अलककडे गेला तारा तिकडेच होती. अलक कामांत असल्यानें तीच मुररारावाशीं बोलत बसली.

" आमची दोघींची किनई फारच गट्टी जमली आहे. आम्ही एकमेकींला आतां बहुवचनानें नाहीं हांका मारीत. मला दादाचीं आलेलीं पत्रें मीं तिला दाखविलीं. एका पत्रात त्यानें तिचें अतिशयच प्रेमानें वर्णन केलें आहे तेवढें मात्र मीं दाखविलें नाहीं."

" अस्सें ! पण तुम्हीं एकदां मला म्हटलें होतें कीं, तुमच्या दादासाठीं तुम्ही अस्सल मराठयाची एवढेंच नव्हे तर दख्खनी मराठयाची मुलगी पाहणार. मग आता चालेल का ही वहिनी ? "

" अलक मुळीं आजन्म अविवाहितच राहणार आहे. ती किनई योगिनी, माता होणार आहे हो."

" कोण ? योगिनी ? "

" होय योगिनी. बरं पण तें राहूं द्या. मी उद्यां पहांटे अलकबरोबर शिकारीला जाणार आहें."

" हें पहा, हल्लींच्या ह्या दिवसांत शिकारीला जाणे जरा धोक्याचें आहे."

" मला नाहीं बाई मुळींच भीति वाटत."

" पण रजपूत, मोगल वगैरे मराठयांच्या मुलींना पळवावयाला टपलेले असतात!"

" तर ! मराठयांच्या मुली म्हणजे अगदीं बेवारशी मालच लागून राहलाय !" तोऱ्यामध्यें मानेला एक नाजूक हिसका देत तारा म्हणाली.

" शिकारीचा नाद मोठा वाईट. मित्र या नात्यानें मी तुम्हांला सांगतों आहें."

" न आवडणारा उपदेश नेहमीं मित्रच करितात."

" ताराबाई, तुमचा अपमान करावा अशी माझी इच्छा नाहीं. पण मी आपल्याला बरेच दिवस ओळखतों—"

" खरंच कीं, सबंध तीन दिवस !"

तारेच्या या टोमण्याकडे लक्ष न देतां मुरारराव म्हणाला, " शिवाय असें कीं, अलककुमारी रजपूत आहे, तेव्हां तिच्याबरोबर विशेष मैत्री—"

" आपली व तिची चांगलीच ओळख आहे हें आपण विसरला वाटतें. आपणच ना तिची माझी ओळख करून दिलीत ! "

" दिली खरी; पण ती केवळ तुमच्या आग्रहाखातर."

" तिची माझी मैत्री आपल्या व तिच्या मैत्रीच्या आड येते वाटतें ! "

" तुम्ही रागावलांत, ठीक आहे. तसेंच होऊं द्या. खुशाल शिकारीला जात चला बरें ! "

" जशी कांहीं परवानगीची वाटच पहांतें होतें मी !" असें रागारागाने पुटपुटून तारा आंत निघून गेली.

जरा खिन्न होऊन मुरारराव एकटाच तिकडे बसून राहिला. थोड्याच वेळांत अलक व तारा बाहेर आल्या. अलकनें मुराररावाकडे हंसून पाहून म्हटलें, " खरेंच मुरारराव, आपले मजवर भारी उपकार आहेत. माझें एकलकोंडें आयुष्य तुम्हीं किती बरें आनंदी केलेंत ! " अलक मुराररावाला म्हणाली होती तेंच खरें ! रजपूत लोक भावनाशील खरे. आतांच पहा हंसऱ्या अलकचे डोळे कृतज्ञतेनें क्षणांत पाण्यानें भरले. अत्यंत स्नेहानें तारेच्या केंसांवरून हात फिरवीत ती पुढें म्हणाली, " पण बाई माझ्या या लाडक्या मैत्रिणीचें काय बिघडलेंय् ? मुरारराव, काय केलेंत हो तुम्हीं ! कालपासून विनोदानें, आनंदानें मला रिझविणारी ही हंसरी पोर एकाएकीं अशी गंभीर आणि अबोल कां झाली ? "

भिंवया आकुंचित करून तारेनें अलककडे पाहिलें. विषयांतर करण्याच्या इच्छेनें अलक म्हणाली, " मुरारराव, आम्ही फिरायला जातों आहों. येतां आम–"

पुढचे शब्द तिच्या तोंडातच राहिले. कारण त्याच वेळीं तारेनें तिला सडकून चिमटा घेतला व तिला बोलणें पुरें करण्याची संधि न देता आपणच पुढें म्हणाली, " आम्ही खूप बोलावूं, पण बाई, आपली योग्यता कुठें आहे एवढी ! " आणि अलकचा हात ओढीत ती चालूं लागली. तिला जिना उतरतांना मध्येंच सोडून अलक पुन्हा मुराररावाकडे आली व जरा रागानें म्हणाली, " तुमचा स्वभाव इतका निष्ठुर कसा हो ? "

" निष्ठुर ! तो कसा ? "

" नाहींतर काय ? त्या बिचाऱ्या तारेनें तुमचें काय केलें आहे ? काय बोललांत तुम्ही तिला ? "

" मी कशाला बुवा बोलूं ? मी कांहींच बोललों नाहीं."

" अशक्य ! ती आंत आली तेव्हां तिचे नाकडोळे लाल झाले होते. मीं किती विचारलें तरी सांगेचना. शेवटीं जेमतेम तुम्हीं तिचा अपमान केला असें म्हणाली. तिच्यावर प्रेम आहे असें तुम्हीं तिला भासवलेंत आणि आतां तिला रडविता ? "

" मला हें ऐकून फार आनंद झाला." मुराररावानें शांतपणें आपलें मत दिलें.

" अस्सं काय ? एकूण तिची फसवणूक करण्यांत तुम्हांला धन्यता वाटते ! पण लक्ष्यांत ठेवा, ती माझी लाडकी मैत्रीण आहे. तुम्हीं जर तिच्या प्रेमाचा असा

खेळ केलांत तर तुम्हांला त्याचा जाब मला–चौहानकुमारी अलक–हिला द्यावा लागेल, समजलांत." रागारागांत अलक तारेच्या पाठीं निघून गेली. आणि तारेचें आपल्यावर प्रेम आहे ही लाख रुपयांची गोष्ट कळल्यामुळें खूष होऊन, आनंदाच्या भरांत अलकच्या रागाकडे लक्ष न देतां मुरारराव खाणावळीकडे चालता झाला.

दुसऱ्या दिवसाची गोष्ट. शिकारीहून आल्यापासून तर तारेला अगदींच चैन पडेना. मुररारावाबरोबर विनाकारण भांडल्याबद्दल तिचें मन तिला खात होतें. आणि विशेष हें कीं, मुरारावाच्या अटकळीप्रमाणें शिकारीच्या जंगलांत प्रकार झाला. दोघेतिघे मोगल या दोघींच्या पाठीं लागले. तारा व अलक यांच्या-बरोबर चार-पांच नौकर होते, पण ते साधारण दूर होते व या दोघी एकट्याच आहेत अशी त्या हलकट मोगलांची कल्पना. खूपच जोरानें घोड्यांना दामटीत या दोघी मंडळीपर्यंत कशाबशा पोंचल्या; परंतु त्याच्या मनाची–विशेषत: तारेच्या मनाची व हृदयाची फार चलबिचल झाली. म्हणून पुढें शिकारीच्या भानगडींत न पडतां त्या तशाच परत आल्या.

त्यांतून आज आत्याबाईही कुठें बाहेर गेल्या होत्या. हिरेसारख्या वात्रट पोरीशीं तारा काय गप्पा मारणार ! त्यामुळें आज तारेला अगदीच करमेना. शेवटीं बागेंत हिरा होती तिकडे जाऊन तिला गाणें म्हणावयाला तरी सांगावें अशा विचारानें तारा बाहेर आली. तों हिरा अगदीं जोराजोरांत मुररारावाबरोबर गप्पा मारीत आहे. मुरररावानें तारेला पाहिलें व लगेच त्यांनीं हंसून तिला उत्थापन दिलें. आतां परत जाणें वाईट दिसेल म्हणून तारा एका छोटया दगडी चौथऱ्यावर बसली, व तिनें हिरेकडे कपाळाला आंठ्या घालून पाहिलें. हिरेला त्या नजरेचा अर्थ समजला, पण तिला आंत बाहेर कांहींच नव्हतें. ती पटदिशीं म्हणाली, "बरें का, ताराताई, मुरारराव खुशाल परक्यासारखे वाड्यावरनं जात होते. मग मीं हांका मारल्या त्यांना. हो म्हटलें, ते सबंध दिवसांत इकडे फिरकले सुद्धां नाहींत, त्यामुळेंच आमच्या ताराताईला करमत नसणार म्हणून—"

"हिरे, काय फारसा आचरटपणा चालवला आहेस ! एकाद्याला वाटायचं कीं, खरंच मला करमत नव्हतं." तारा आतां मुरररावाकडे वळून पुढें म्हणाली, "कांहीं तरीच बडबडते आहे हां ही. मीं कांहीं तुम्हांला हांका मारायला तिला सांगितलं नव्हतं. सांगेन कशी ! तुम्ही रस्त्यावरून जात आहां हें मला थोडेंच माहिती होतं. म्हणजे असं कीं, माहिती असतं तरी मीं कशाला बोलवायला

सांगतें आहे. हो, काल अशा रीतीनें वागल्यावर कोण कशाला एवढं हे करणार!" येत असलेलें हंसूं मोठ्या प्रयासानें दाबून मुरारराव पश्चात्तापदग्ध चेहरा करून म्हणाले, "खरोखरच काल माझी चुकी झाली., ओहो, हिराताई, तिकडे पहा किती सुंदर फुलं उगवलीं आहेत. तोडा जा कीं!" हिरा लगेच तिकडे गेली.

"पुरुषांनाच जसा कांहीं शिकारीचा छंद असावा!" तारेचा मारा सुरू होताच.

"छेः बुवा, चुकी झाली म्हणतों ना? असें काय करतेस–कराव?" मुरारराव फार हुशार होता ह्यांत शंकाच नाहीं. त्याच्या जागीं जर दुसरा कोणी कमी हुशार माणूस असता तर त्यानें या वेळीं हिरेकडून कळलेला शिकारीच्या तिकडे घडले त्या धांदलीचा उल्लेख केला असता व आपला दूरदर्शीपणा शाबीत करण्याचा प्रयत्न करून आपली तारेवर प्रेम करण्याची संधि मात्र गमावली असती. कारण तारेचे स्वभाव भारी मानी होता; पण मुराररावानें आपल्या हुशारीनें वेळ जिंकली खरी तारेचा गोळीबार संपल्याचें चिन्ह दिसूं लागलें. किंचित् पुढें वांकून आर्जवाच्या स्वरानें मुरारराव म्हणाला, "अलककुमारीसह आपण आज फिरायला जाऊं या, मग तर झाल?"

"नको, मी कशाला?"

"वा:, हें काय बोलणं? पुण्याच्या प्रवासांत विशेष ओळख नसतांही तुम्हीं आपला सहवासलाभ मला दिलांत. मग आतां इतकी जास्ती ओळख झाली असून असा अनमान कां?"

मुराररावाची चिकाटी जबरी खरी प्रवासांतल्या त्याच्या चांगुलपणाची आठवण होऊन तारा आपला राग विसरली. निरोप घेतांना मुरारराव हलकेंच म्हणाला, "काय? गेला ना राग?"

"गेला तर काय झालं! बाकी आपण रागवाल असंच मला भय पडलं होतं. खरंच आपल मन किती मोठं आहे. कां बरं आपण इतक्या चांगुलपणानं माझ्याशीं वागतां!" वाक्य पुरं होतं न होतं तोंच तारा आंत पळाली. कारण आपल्या ह्या सहजोद्गाराला मुरारराव, कांहीं तरी सूचक उत्तर देतील कीं काय अशी लाजरी भीति तिला वाटली.

त्याच खेपेला सातारा एवढा मनोरम कां वाटतो, असं मुराररावाला कोडं पडलं व त्याविषयीं विचार करीत तो घरीं गेला.

## प्रकरण तेरावें

# लग्नाचें ठरलें

दुसऱ्याही दिवशीं मुराररावाला तारेच्या आत्याबाईकडून आमंत्रण आलें. सर्व मंडळी एकत्र बोलत बसली असतां तारेची वृत्ति जरा गोंधळल्यासारखी दिसत होती. आत्याबाईंनी त्याबद्दल तिला एकदा विचारलें सुद्धां, पण ती कांही बोलली नाहीं तेव्हां हिरा पटदिशीं म्हणते, " बरें का आई, सरदार भोंसले लौकरच इकडे येणार आहेत असें काल रात्रीं म्हटलेंस ना तूं, तेव्हांपासून ताराताईचा असा गोंधळ उडाला आहे." हे शब्द ऐकून तर तारा जास्तीच गोंधळली. मुराररावाचा स्वभाव जात्या जरा मत्सरी होता. आताचे हिराचे शब्द ऐकून त्यांनीं तारेकडे जरा वेळ टक लावून पाहिलें. त्यामुळें तारेला काय वाटलें कोण जाणे, ती तशी-च उठून बाहेर बागेंत गेली. " अग, अजून उन्हं परतलीं सुद्धां नाहींत. एवढयांत कशाला बाहेर जातेस ?" असें आत्याबाई म्हणतात तों तारा गेली सुद्धां. आत्या बाईची मुरारराववर बहाल मर्जी झाली होती. त्या जरा स्तुतिप्रिय होत्या, आणि मुराररावांनीं ती गोम ओळखली असून त्या धोरणाने त्यांनीं बोलणें सुरू ठेवलें होतें. आत्याबाई किंचित हंसून म्हणाल्या, " मुरारराव, तुम्हांला माहिती आहेत का हे भोंसले ? आमच्या आक्काचे पुतणे लागतात ते. फार लांबचेही नाहींत हो. सरदार आहेत ते त्याच्या मनांत किनई आमची तारा फाऽऽर भरली आहे. पण काय करणार या पोरीला ? ही त्यांच्या वाऱ्यालासुद्धा उभी रहात नाहीं. केवढी थोरली यांची श्रीमंती ! काय इतमाम ! पण म्हणतात ना, देव देतो नि कर्म नेतं, त्यांतलीच गत !" आत्याबाईंच्या या दुःखाश्चर्यमिश्रित हल्ल्यांतून कशी तरी सुटका करून मुरारराव तारेला शोधण्यासाठीं बागेंत गेले. लताकुंजांत तारा बसलेली त्यांना लांबून दिसली, त्याबरोबर " अशी वेळ पुन्हा येणार नाहीं," असं पुटपुटून ते तिकडे गेले व अगदीं प्रेमळ, मृदु स्वरांत त्यांनीं " तारे " अशी हांक मारली. त्यांच्या अपेक्षेप्रमाणें तारेनें ओ दिली असणार, कारण तीं दोघें नंतर एकमेकांत एवढीं गुंग झालीं होतीं कीं, हिरा धांवत बागेंतून अलकच्या घराकडे गेली तें त्यांनीं पाहिलं सुद्धां नाहीं.

रजपूत सराई जरी जास्ती दूर नव्हती तरी धांवत आल्यामुळें हिराला भारी दम

लागला होता. तशीच थांपा टाकीत ती अलकला म्हणाली, " अग अलकताई, लौकर वाड्यात चल आणि ताराताईला वाचव."

" वांचवूं ! तें ग कशापासून ? " आश्चर्यानें अलकनें विचारलें.

" कशापासून नव्हे, मुराररावापासून ! हें बघ, लताकुंजांत ताराताई बसलेली आहे, नि मला वाटतं कीं, ती रडते आहे, बरं का ! नि ते मुरारराव काय काय बोलताहेत."

" म्हणजे ग काय पोरी ? "

" नाहीं समजलं तुला ? आणि मला बघ कसं पहातां क्षणींच कळलं. अग, मुरारराव तिला लग्नाची मागणी घालताहेत. बाकी ताराताई रडत नसणार म्हणा. रडायचं काय त्यात ? कारण बघ, मुराररावाने तिला जवळ—" पुढे बोलूं न देता अलक तिला रागे भरून म्हणाली, " एवढ्याशा चिमुरड्या पोरीला कशाला ग या गोष्टी ! जा बघू घरीं. नाहींतर मी थोड्या वेळानें येणार आहे तिकडे तेव्हां तुझ्या आईला सांगेन "

सुमारें घटकाभरानें अलक तारेच्या घरी आली. चौकशी करतां तारा आपल्या खोलींत असल्याचें कळल्यावरून ती तडक तिकडेच गेली हिराचा अजून अलक वर राग असल्यामुळें अलकला पाहून ती पाठ फिरवून बसली, व अलकनें न विचारतांच " ताराबाई बाहेर गेली आहे " असं बोलली. पण ती आपल्याला फसविण्यासाठीं आचरटपणानें खोटें बोलत आहे अशी अलकची खात्री असल्यामुळें ती काहीं न बोलता तारेच्या खोलींत गेली. तारा एका हाताने डोकें दाबीत होती, तें पाहून अलक म्हणाली, " कां ग तारे, डोकं दुखतंय होय ? "

" होय ग, घरांत कंटाळा आला म्हणून उन्हाची बागेत जाऊन बसलें त्यामुळें जरा डोकं कणकणल्यासारखं झालंय."

" एकटीच जाऊन बसलीस बागेंत ? "

" होय. नंतर तिकडे येणं-म्हणजे मुरारराव तिकडे आले. पण अशी काय गडे पहातेस तूं ! अगबाई, तुला कसं कळलं ? "

" हिरानं सांगितलं."

" हिरानं ? म्हणजे ! तिला कसं कळलं ? "

" तिनं पाहिलं."

" काऽऽय ! पाहिलंन तिनं ? बाई–बाई, काय ? काय पाहिलंन ग ? इश्श, आतां काय करूं तरी ! ती आत्याला कांहींच्याबाहींच जाऊन सांगेल ना ! "

" अग, अशी भितेस काय ? हिराच्या तोंडाला मीं कुलूप घातलें आहे. ती नको काळजी. पण मला सांग तारे, त्याच्यावर तुझं पूर्ण प्रेम आहे ना ? "

" म्हणजे ? नाहींतर आणखी दोन महिन्यांनीं त्यांच्याबरोबर लग्न करायला मीं झालें असतें का तयार ? "

" अस्सं. बाकी तुझ्या जागीं जर मीं असतें तर मीं इतके दिवससुद्धा थांबलें नसतें." प्रेमानें तारेच्या गालावर चिटकी मारीत अलक चेष्टेनें म्हणाली.

" तुझ्या स्वभावाला तें योग्यच आहे. तुम्ही रजपूत लोक असेच भावनाशील. हें बघ, तूं आलीस तेव्हा मीं दादाला पत्र लिहीत होतें. भारी लाज वाटतं ग लिहायला. तो परवानगी खात्रीनं देईल म्हणा, पण आपलं जरा विचित्र वाटतं नाहीं ?"

ॐ ॐ ॐ

मुराररावाना काहीं धीर धरवेना. तारेचें म्हणणें होतें कीं तिच्या दादाची लेखी परवानगी आल्यावर मग आत्याबाईंना ती बातमी कळवून त्यांची औपचारिक परवानगी घ्यावी. पण मुराररावाना अगदीं घाई झाली, दुसऱ्याच दिवशीं सकाळीं ते आत्याबाईंकडे येऊन म्हणाले, " सरदार भोंसल्याचा पत्ता ठाऊक असेल ना तुम्हाला ? कुठें असतात ते सध्यां ? "

" पुण्यासच आहे सध्या स्वारी, पण लौकरच येणार आहेत इकडे."

" अस्सं का ! तर मग त्याना आताच्या आता एक निरोप पाठवायचा आहे. मला वाटतं थोरल्या आत्याबाईमार्फत पाठवावा. विशेष काहीं नाहीं. इकडलं तिकडलं थोडं कळवावं आणि नंतर सहज म्हणून त्याना कळवावं कीं, तारेचं माझ्याबरोबर लग्न ठरलं आहे."

" आं ! तुमच्याबरोबर ? "

" हो, माझ्याबरोबर व आणखी दोन महिन्यांनीं ! "

" दोन महिन्यांनीं ! "

" हो. दोन महिन्यांनीं. पुणें मुक्कामीं ! "

" हं ! " आत्याबाईंनीं एक जंगी सुस्कारा सोडला.

" आपलं असं कीं, तुमच्या सरदारसाहेबबहादुरांना आपलं अगोदरच कळलेलं ठीक. म्हणजे तारेच्या पाठचा त्यांचा त्रास व त्यांच्या पाठचा प्रवासाचा

त्रास, असं त्रासद्वय चुकेल. शिवाय वडिलपणानं आपली परवानगी पाहिजे आहे आम्हांला."

"अहो, माझी कसली परवानगी ! माझ्याहून आक्का वडील. पण ही पोरगी तिलासुद्धा धाब्यावर बसविते. लहानपणापासून अशीच हट्टी. नाहींतर कधींपासून आक्काच्या मनांत तिला आपली सून करून घ्यायचं होतं. सून म्हणजे चुलत सून. हो, सरदार भोसले तिचे चांगले जवळचे पुतणे लागतात. त्या राजबिंड्या सरदाराला सोडून तिनं तुम्हांला पसंत केलं ना ? दोघंही भावंडं अशींच तऱ्हेवाईक. विश्वासाला अगदीं खास पसंत पडेल हें. त्याचा सरदार भोसल्यावर विनाकारण कटाक्ष होता. बरं, काय हो, आजवर ती जशी आरामांत वाढली तशा आरामांत तिला यापुढं ठेवण्याची ऐपत आहे का तुम्हाला ! सरदार भोसल्यासारखी नावापाठीं सुरेखशी पदवी, हुद्दा लावण्याची तुम्हांला उमेद आहे का ? आतांच नसली तरी पुढेंपाठीं कधींतरी तो मान मिळण्याची आकाक्षा तरी आहे का तुम्हाला ?"

"तसली उमेद किंवा आकांक्षा मला काहीं नाहीं"

"काऽहीं नाही ? काय ग बाई तरी ! काहीं एक आकाक्षा नाहीं नि म्हणे आमची नक्षत्रासारखी पोरगी आपल्याला द्या. कशाला हो द्या !"

"पण त्या तुमच्या भावी आकांक्षापेक्षा माझ्याकडे दुसरी एक जास्ती उपयोगी व भरीव गोष्ट आहे."

"होय ! कसली ती ?" आत्याबाईचा स्वर थोडासा नरमला.

"सालिना पाऊण लाखाचें उत्पन्न आहे मला."

"बरं झालं बाई, पोरीला आईबाप नाहीं, तेव्हां आम्हांलाच तिची काळजी ! जांवईबापू, तिला चांगलं सुख द्या बरं का. बाकी एवढं थोरलं उत्पन्न असल्यावर सुख न लागायला काय झालय ! चला बाई, सुटलें, पण जांवईबापू, ती पोर कुठं गेलीय ?"

आत्याबाईच्या 'अहो' ह्या परकी संबोधनाचें एकदम 'जांवईबापू' या आपुलकीच्या संबोधानत परिवर्तन झालेलें पाहून मुराररावाना हसूं आलें, पण ते दाबून ते म्हणाले, "तेंच आतां मीं आपल्याला विचारणार होतों. जरा तिला शोधून इकडे पाठवून द्या ना. थोडस महत्त्वाचं काम आहे तिच्याकडे"

आत्याबाईसुद्धां एका काळीं तरुण होत्या. मुराररावांनीं जरी हें बोलतांना गंभीर मुद्रा केली होती, तरी मुराररावांच्या कामाचें महत्त्व त्यांनीं तेव्हांच जाणलें

व हंसत हसत त्या बाहेर गेल्या. थोडक्याच वेळात लाजत-मुरडत तारा आत आली. ती येतांच मुरारराव जरा गंभीर स्वरांत म्हणाले, " तारे, आत्याबाईची संमति मिळाली बरं. आतां बघ मी तुला एक महत्त्वाचा प्रश्न विचारणार आहे. त्याचं मला खरं खरं उत्तर दे हं ? "

मुराररावांच्या भाषणांतील एकेरी संबोधनानें तारेच्या गालांवर चढलेली लाली गंभीर स्वरांत विचारलेल्या त्याच्या या प्रश्नानें पार नाहींशी झाली. घाबरलेल्या स्वरांत ती म्हणाली, " अगबाई, काय विचारायचंय तें ? "

" अशी घाबरतेस काय ? वेडी कुठली, घाबरण्यासारखं कांहीं नाहीं समजलीस ! अलक कुमारीनें काढलेल्या, पुण्यांतील एका दुकानांत असलेल्या, चित्रांतल्या एका विशिष्ट व्यक्तीवर आपलं प्रेम आहे असं तू म्हणाली होतीस त्याचा अर्थ काय ? "

इश्श, आपल्याला कसं कळलं तें ? "

" कळलं कसं तरी, पण त्या शब्दाचा अर्थ मला कळला नाहीं, तो आतां कळला पाहिजे."

" कां ? आपल्याला त्या व्यक्तीचा मत्सर वाटायला लागला वाटतं ? "

किंचित् हंसून मुरारराव म्हणाले, " छेः, मुळीं सुद्धां नाहीं. पण मला उत्सुकता वाटली म्हणून विचारतों "

" तें असं झालं कीं, थोरल्या आत्याबाई मला सरदार भोंसल्यांवरून नेहमीं चिडवीत व त्यांच्याबरोबर लग्न करावं म्हणून पाठ पुरवीत, तेव्हां अशांतशानं त्या ऐकायच्या नाहींत म्हणून त्या चित्रांतल्या अगदीं गोगलगाईसारख्या दिसणाऱ्या त्या इसमाला मी पसंत केलं एवढंच. इश्श, किती पण कुरूप काढला होता त्याला ! "

" इतकंच ? बरं, आतां आणखी एक प्रश्न ? "

" बाई-बाई, अजून खात्री होत नाहीं ना ? किती मत्सरी स्वभाव हा ! "

" तारे, कांहीं दिवसांनीं तुझी खात्री होईल कीं, निदान त्या इसमाचा तरी मला मत्सर वाटणें शक्य नाहीं. पण तुला त्या चित्राविषयीं एवढी जिज्ञासा आणि कौतुक कां वाटत होतं ? "

तारेच्या तोंडावरलें स्मित पार मावळलें. जरा चुटमळून ती म्हणाली, " आपल्यापासून मीं कांहीं गुप्त ठेवूं नये हें खरं, पण हें माझं गुपित नाहीं, दुसऱ्याचं आहे."

" बर. जेवढं सांगता येईल तेवढं तरी सांग. तसच कांही कारण आहे म्हणून विचारतो."

" काय तें कारण ? "

हुबेहूब तारेसारखा बारीक, लाडीक आवाज काढून मुरारराव म्हणाले, " तुझ्यापासून मी कांही गुप्त ठेवूं नये हे खरं. पण हें माझें गुपित नाही, दुसऱ्याचं आहे "

हंसत-हंसत तारा म्हणाली, " अस्स काय ते ? सांगा ना मला."

" अगोदर माझ्या प्रश्नाचं उत्तर दे."

" मला किनई त्या वेळीं जयपुराहून एक पत्र आलं होतं त्यामुळं मला त्या चित्राविषयीं उत्सुकता व आपलेपणा वाटूं लागला या पत्रांत एका द्वंद्वयुद्धाचं व त्यांतील शकुनी मोहरेचं वर्णन होत पण हे द्वंद्वयुद्ध त्या चित्रांतल्यासारखं दुःखपर्यवसायी नव्हतं."

" तुझ्या दादाचंच होत ना ते पत्र ? "

" अऽहं, मीं नाही ते सांगायची "

" मग, दुसऱ्या पुरुषाकडून आलं होतं तर ते ?"

" बाई–बाई, शर्थ झाली हो, माझ्या दादाचंच होत ते पत्र. पण आर्धी एकाद्या पुरुषाकडून ते आलं होतं म्हणून कुणीं सांगितलं आपल्याला ? काय तरी मत्सरी जात ही पुरुषांची ! "

" बरं, काय ग तारे, त्या युद्धांतील मुख्य योद्धा कोण होता ? "

" दादानं त्याचं नांव नाहीं सांगितलं. बाहेर गवगवा झाला तर त्या इसमाला बडतर्फ करण्यांत येईल असं त्यानं लिहिलं. हो, आपल्या मित्रावर आपल्या निष्काळजीपणामुळं असा प्रसंग यावा असं वाटेल का त्याला ? "

" केव्हांही नाही."

" हं, आतां सांगायचं मघाचं कारण ! "

विजयाचा मृत्यु विश्वासरावाच्याच हातून झाला त्याबद्दल मुराररावांना आतां शंकाच नव्हती. नाइलाजास्तव आतां तारेला खोटें सांगितलें पाहिजे म्हणून ते म्हणाले, " विशेष कांहीं नाहीं ग. मला त्याचा जरा मत्सर वाटला इतकंच ! "

" मत्सर ! जुलूम झाला हा. पहिल्यांदा त्या चित्रांतल्या इसमाचा, नंतर

एका पत्रांतल्या माणसाचा मत्सर ! वाः, नमुनेदार संसार होणार आहे तर आपला ! मी अगदीं स्वच्छन्दी तरुणी आहें, हे आतां तरी कळल ना आपल्याला ? ”

“ आहे नव्हे—होतीस, पण आतां एकदम सुधारली आहेस.”

तारेचा मानी स्वभाव कसा गप्प बसणार ! चिडून ती म्हणाली, “छेः छेः, हा भ्रम आहे हो आपल्याला. अजून मला आपला कंटाळा आला नाहीं एवढंच. कारण आपल्या ओळखीला सारा एकच आठवडा झाला आहे.” तिच्या चिडण्यातील राग कांहींसा उसना होता.

“ होय बाईसाहेब, फक्त एकाच आठवड्यापूर्वी सातार्‍याला येत असतां आपण मला झिडकारून टाकलं होतं ”

तारेचा उसना राग मुराररावांच्या ह्या वाक्यानें बहुतेक गेलाच ती म्हणाली, “ एका आठवड्यापूर्वी मी आपल्याला ओळखतसुद्धां नव्हतें, आणि तरीही मी सुखी होतें. आणि आतां जर आपली ओळख तुटली, तर माझं सबंध आयुष्य दुःखी होईल ! ”

“ का ? हिराचे दुसरे भावोजी आहेतच कीं उमेदवार ! ” चेष्टेनें मुरारराव म्हणाले. पण तारेनें इतक्या रागानें त्याच्याकडे पाहिलें कीं, मुराररावांनी मुकाट्या- नें आपल्या आराध्यदेवतेची माफी मागितली व तिला पूर्ववत हंसरी केली. पण या आराधनेंत बराच वेळ गेला असणार, कारण जांवईबापूंचे काम फारच लांबलें असा आत्याबाईंना नंतर टोमणा मारला.

## प्रकरण चौदावें

# कोल्हापूरकडील वार्ता

योग्य वेळीं तारेच्या पत्राचें विश्वासरावाकडून उत्तर आलें. तें तिनें मुराररावांना दाखविलें. पत्र वाचून पहातांच मुरारवांनीं आपल्या खिशांतून दुसरें पत्र काढून तारेच्या हातांत दिलें. अक्षर ओळखून तारा आश्चर्यानें म्हणाली, " अगबाई, दादाच आपल्याला आलंय ! आपण लिहिलं होतं त्याला ! मला नाहीं कुठं सांगितलं तें ! " अत्यंत उत्सुकतेनें तारेनें वाचलेल्या त्या पत्रांतील मुद्द्याचा भाग खालीलप्रमाणें होता.

"………माझ्या बहिणीबरोबर लग्न करण्याची तुमची इच्छा मला मान्य आहे काय व मी तुम्हांला परवानगी देईन काय, असं तुम्हीं विचारतां. खालील दोन कारणांसाठीं मी माझी परवानगी देतों. पहिलें कारण म्हणजे, तारेच्या मला आलेल्या पत्रांवरून तिचं तुमच्यावर पूर्ण प्रेम असून तुम्हीं तिला सुखी कराल अशी तिची खात्री आहे, हें मला कळून चुकलं. आणि ती सुखी व्हावी हीच माझी इच्छा आहे. दुसरं कारण म्हणजे ज्या अर्थी तारेसारख्या हुशार व गुणी मुलीच्या पसंतीला तुम्ही पडलां आहांत, त्या अर्थी तुम्हीं खरोखरच तिच्या योग्यतेचे असणार. आणखी १०।१२ दिवसांत मी पुण्याला जाणार तेव्हां आपली भेट होईल, आणि आपण परस्पर मित्र बनूं.

आणखी सात आठ दिवसांनीं आत्याबाईही पुण्यास येणार आहेत. त्यांच्याबरोबर ताराही येईल.

तुम्ही जरी खुद्द पुण्याचे नसलां, आणि पुण्याच्या व उत्तरेच्या मराठ्यांचा बेबनाव असला तरी तुम्ही माझे मेहुणे व्हावयास माझी कांहींच हरकत नाहीं. माझें असें मत आहे कीं, हृदयाच्या असल्या नाजुक गुंतागुंतींत मेंदूनें भाग घ्यावयाचा नसतो. तारा माझी फार लाडकी बहीण आहे. तेव्हां एवढं लिहिल्यावांचून मला रहावत नाहीं कीं, तिला सर्वस्वीं सुखी करणें हें तुम्ही आपलें कर्तव्य समजा. ती तुमच्या सुखासाठीं झटेलच, कारण ती अत्यंत सुस्वभावी व गुणी आहे……"

पत्र वाचून तारा आपल्या दादावर फारच खूष झाली. नंतर किंचित् विचार करून ती म्हणाली, " पाहिलं का, आपली योग्यता त्यानं अगदीं बिनचूक ताडली आहे. मला वाटतं त्यानें आपल्याला केव्हां तरी पाहिलेलं असावं ! "

आणि बरोबर ह्याच विचार मुराररावांच्या मनांत आला होता. ते म्हणाले, " होय, मलाही तुझ्यासारखंच वाटतं. तुमच्या पुण्याच्या वाड्यांत त्यांची तसबीर असेल ना ? "

" होय, आहे कीं."

" मग ती बरोबर कुठंशी आहे तें मला सांग बघूं. म्हणजे तुझा तर्क खरा आहे कीं काय तें मला कळेल."

" किती घाई पण ! आमच्या वाड्याच्या थोरल्या दिवाणखान्यांत समोरच्या भिंतीला त्यांची तसबीर आहे. त्या भिंतीला तेवढी एकच तसबीर आहे."

" अस्स का ! ठीक आहे. मी उद्यां पुण्याला जाणार आहे, तेव्हां पाहीन ती."

" उद्यांच ! "

" हो ! जास्ती वेळच नाहीं आतां. सारा दीड महिना राहिला आहे माझ्या लग्नाला, तुला काय त्याचं ! "

" इश्श, जसं कांहीं एकट्याचंच लग्न होत असतं. मग काय जाणारच उद्यां ? दादा लिहितो कीं, आणखी सात आठ दिवसांनीं आम्हीं निघायचं. पुण्याला येणार ना आमच्या इकडे दादाला भेटायला ? "

आणखी थोड्या गोष्टी झाल्यावर मुरारराव तारेविषयीं विचार करीत घराकडे जाऊं लागले. तोंच त्यांच्या कानाजवळ कोणीतरी पुटपुटलें, " आप्पलपोटी खरी पुरुषजात ! "

मुराररावांनीं दचकून आजूबाजूला पाहिलें तो अलककुमारी शेजारीं उभी. तेव्हां ते म्हणाले, " अलककुमारी, आपल्या या उद्गारांचा अर्थ मला कळला नाहीं."

" माझ्यापासून माझ्या लाडक्या मैत्रिणीला चोरून नेलीत ! हल्लीं सबंध दिवसांत तारा माझ्या दृष्टीलासुद्धां पडत नाहीं. मला अशी एकटी टाकायला कारण तुम्हीं."

आणि हें अगदीं खरें होतें. मुराररावांनीं मुद्दामच तसें केलें होतें. जरी तारेजवळ त्यांनीं तसें म्हटलें नाहीं, तरी तारेची व अलकची मैत्री जास्ती दृढ झाल्यास अलकची व विश्वासरावांची पुन्हा भेट होईल अशी त्यांना भीति वाटत होती.

ते आतां कांहीं बोलणार तोंच अलक पुन्हा म्हणाली, " तुमच्या देवतेबरोबर बोलावालायची माझी योग्यता नाहीं म्हणून तुम्हीं तिला अशी दूर ठेवतां काय ? कीं मी दुःखी असल्यानें माझ्या दुःखाची धग तिला लागेल अशी तुम्हांला भीति वाटली ? तुमच्याविषयीं मीं एक तरी वाईट शब्द कधीं तिच्याकडे काढला आहे का ? माझ्या त्या प्रतिज्ञेमुळें मीं शापभ्रष्ट आहे, असं 'तर नाहीं ना तुम्ही समजत ? "

किंचित काल विचार करून मुरारराव सावकाश म्हणाले, " खुनाच्या भीषण प्रतिज्ञेमुळें जोंवर तुमचें रक्त सळसळत आहे तोंवर तारेशीं–माझ्या भावी पत्नीशीं–विशेष परिचय ठेवण्याला तुम्ही अयोग्य आहांत असंच मी समजतों. आपल्या मृत्यूमुळं तुमच्या आयुष्याचा नाश होऊं नये अशी कुमाराचीही शेवटली इच्छा होती. एखाद्या भाग्यवान् योग्य पुरुषावर प्रेम करून सुख देण्यासाठीं आणि घेण्यासाठीं तुमचा जन्म आहे. खुनाच्या छंद्यासानें वेडावून जाऊन दुःख भोगण्या-साठीं नाहीं."

" ईश्वरसाक्ष सांगते, तुमच्या म्हणण्याप्रमाणं विचार करण्याचा मी कित्ती कित्ती प्रयत्न करतें. तुमचं व तारेचं प्रेममय मुख पाहून स्वर्गसुखाला आंचवलेल्या पाप्याप्रमाणं माझ्या मनाला हुरहूर वाटते हो. पण काय करूं ? मुराररावजी, तुम्हां-ला हृदय आहे ना ? मग माझ्यावर एवढी दया कराच. मला ही एवढी एकच मैत्रीण आहे तेव्हां तिला माझ्यापासून दूर करूं नका."

अलकची ती करुणावस्था पाहून मुराररावांचें मन द्रवलें, व लौकर आटोपतें घेण्याच्या उद्देशानें ते म्हणाले, " कां बरं ? दुर्जनसिंहाला विसरतां तुम्ही."

" दुर्जनसिंह ! नांवाप्रमाणेंच दुर्जन खरा. माझी निराशा हीच त्याची आशा सर्वस्वीं निराधार झालें तरच मात्र मी त्याचा व त्याच्या प्रेमाचा स्वीकार करीन हें तो समजून आहे. मुरारराव, त्याच्या मनाचं मला आकलनच होत नाहीं. मला त्याचा तिरस्कार वाटतो; पण तेवढीच मला त्याची भीतीही वाटते." अलकचा सुंदर देह कांपत होता.

" होय ना ? तर मग माझ्या उपदेशाप्रमाणंच वागा." जरा प्रेमळपणानें मुरारराव म्हणाले. कोमेजलेल्या कलिकेसारखें अलकचें तें सौंदर्य पाहून कोठला सहृदय माणूस निष्ठुर राहूं शकेल ! " कुमारीसाहेब, तर मग माझं ऐकाच. दुर्जन-

सिंहाच्या आशांचा समूळ उच्छेद करा. हा नाद सोडा. यामध्यें अपयशापेक्षां यशच जास्ती दुःखदायक होईल. ”

“ छे–छे ! तें होणं नाहीं. प्रतिज्ञेचा जर मीं त्याग केला तर मला माझ्या जन्मभूमीला कायमचं पारखं व्हावं लागेल. माझे जातभाई माझा उपहास करतील. अस्सल बीजाची रजपुतानी कम अस्सल निघाली, आपलं ब्रीद विसरली, भावा चा खून झाला तरी तिनें खुन्याला जिवंत ठेवला असं बोलून ते मला शरमिंदी करतील. नाहीं, नाहीं. तें मी कसं सहन करूं ! तें माझ्या शक्तीबाहेरचं आहे. मुरारराव, मला मोह पाडूं नका. तुमचा मार्ग वेगळा, माझा मार्ग वेगळा; बिलकूल भिऊं नका, तुमच्या त्या स्वर्गीय पुष्पाला माझ्या या सैतानी प्रतिज्ञेची कीड पोखर-णार नाहीं अशी खबरदारी मी घेईन.” एवढे बोलून ती स्वाभिमानी कुमारी जवळ जवळ धांवतच सराईकडे गेली.

दुर्जनसिंहाकडून आलेला एक लिफाफा तिकडे तिची वाट पहात होता.

“ आशा सोडूं नको ” एवढाच त्यांत मजकूर होता.

“ आशा ! आतां या जगांत मला कुठं बरं आशा आहे ! दुसऱ्याच्या नशिबीं प्रेम आणि सुख. माझ्या फुटक्या कपाळीं मात्र द्वेष आणि दुःख.” अत्यंत दुःखा-नें एक सुस्कारा सोडून अलक हताश होऊन जाजमावर पडली.

प्रकरण पंधरावें

# भेट

दुसऱ्या दिवशी सकाळीं मुराररावांनीं जाण्याची तयारी केली व तारेचा निरोप घेण्यासाठीं ते तिच्या घरीं गेले. अगदीं वांकडें तोंड करून तारा दारांत उभी होती.

मुराररावांना पाहतांच ती म्हणाली, "ही पाहिली का चिठी, अलकनें धाडलेली ?"

"हं, काय म्हणते ती ?"

"दोन दिवसांमागें आपल्या लग्नाला पुण्याला यावयाचं तिनं कबूल केलं होतं नि आज म्हणते कीं, आपल्याला तें शक्य नाहीं."

"अं:, एवढंच ना !' मुराररावांनीं म्हटलें. विश्वासरावांची व अलकची बहुतकरून आतां गांठ पडणार नाहीं, अशी मुराररावांना आशा वाटली. आदल्या रात्रीं अलकशीं झालेल्या संवादाचा हा परिणाम आहे, हेंही त्यानें ओळखलें. जास्ती कांहीं बोलत राहिल्यास या बातमीपासून आपल्याला वाटलेला निश्चित आनंद तारेला दिसून येईल अशी भीति वाटून मुराररावांनीं ताबडतोब तिचा निरोप घेतला.

मुरारराव गेल्यावर अलकवर रुष्ट झालेली तारा आपल्या खोलींत परत आली. तिच्या पाठोपाठच हिरा आंत येऊन हळूंच म्हणाली, "ताराताई, बरं झालं मुरारराव-भावोजी गेले ते."

"बरं झालं ! तें ग कसं ?"

"शहाणी म्हणवितेस, आणि ताराताई, तुला एवढंसुद्धां कळत नाहीं ना ! अग, तुमच्या दोघांच्या प्रेमांत बिघाड पाडण्याचा ती प्रयत्न करत होती ना ?"

"ती ! कोण ती ?"

"अग ती रजपुतीण ! तुझी लाडकी मैत्रीण—अलक हो !" आपल्यापासून तारा-मुराररावांच्या प्रेमाची सर्व माहिती काढून घेऊन बक्षिसादाखल तिनें आपल्याला दम मात्र भरला, हें हिरा विसरली नव्हती. तिला त्या दिवसापासून अलकचा भारी राग आला होता.

"कोण अलक ? हुं:, अगदींच अशक्य !" आपले नाजूक खांदे संकुचित करीत तारा म्हणाली.

" अग, ताराताई, तूं तिला ओळखत नाहींस. ती फार आंतल्या गांठीची आहे. तुझी मैत्रीण आहे असं दाखविते अन् तुझ्या भावी पतिराजांवर प्रेम करते."

" काय ! खरं असेल हें ? "

" खरं म्हणजे ! अगदीं–अगदीं खरं. नाहींतर त्या दिवशीं ती मला कां रागें भरली असती ? तुमचं दोघांचं लगीन ठरलं असं मीं सांगतांच ती जी एवढी चिडली ती कां, त्यांच्यावर तिचं प्रेम असल्याशिवाय ? तिला तें ऐकून मत्सर वाटला. तसंच रात्रीं तुम्हीं दोघं बोलत होतां ना इकडे बागेंत; तेव्हां ती तुला भेटायला म्हणून आली होती. एवढाले डोळे करून ती तुमच्याकडे पहात उभी होती. आणखीन् तूं आंत जातांच आपण आड झाली नि भावोजी बाहेर पडले तशी त्यांच्या पाठून गेली; आणि रस्त्यांत त्यांच्याकडे बोलत उभी होती. भावोजींना कांहीं तिच्यावर प्रेम करितांना मीं पाहिलं नाहीं. पण बाई, पुरुषांचं प्रेम चंचल असतं म्हणतात. तेव्हां तूं आपली संभाळ. अं ? हें ग काय ताराताई, केवढ्यानं गालगुच्चा घेतलास हा. आम्ही नाहीं जा अशानं." बिचारी हिरा ! त्या दिवशीं अलकनें तशी तऱ्हा केली. आज ताराताईवर उपकार करायला गेली तर हा प्रकार ! धुसफुसत ती पोर बाहेर गेली. तरी पण जातां जातां ताराताईला पुरुषांच्या प्रेमाच्या चंचलतेचा अनुभव नसल्यानें ती फसणार, पण तें तिला योग्य शासन होईल असे विचार तिच्या मनांत आलेच.

इकडे तारा बराच वेळ विचार करीत होती. हिराचें बोलणें तिला खरेंही वाटेना आणि खोटेंही वाटेना. 'खरं म्हणावं तर मुराररावांचं आपल्यावर केवढं प्रेम आणि अलकचा–दादाचा जीव जिनं वाचविला त्या देवतेचा–आपल्यावर केवढा जीव ! छे–छे, तें शक्यच नाहीं ! पण मग अलकनं आपल्या लग्नाला येण्याचं कां नाकारलं ? तिच्या मनाला वाईट वाटत असेल काय ? आपलं सुख पहावणार नाहीं काय तिला ?' तारेला कांहीं कळेना. शेवटीं अलकला भेटून एकदां समक्षच सोक्षमोक्ष करावा अशा विचारानें ती अलककडे गेली.

म्हातारा दयाळसिंह मोठ्या आनंदांत अलकचें सामान बांधीत होता. त्याचा तो सुरकुत्या पडलेला चेहरा हंसरा दिसत होता. " देव दयाळु आहे. विजयाच्या मृत्यूचा सूड उगविलेला पहायला मीं जिवंत रहाणार " असें तो एकसारखा पुटपुटत होता. कारण अलकला नुकताच दुर्जनसिंहाकडून एका हलकाऱ्याबरोबर

संदेश आला होता, " तो बहुतेक मिळालाच. लगेच साताऱ्याहून मुक्काम हालव व पुण्याच्या रस्त्याला लाग—"

तारेला आलेली पहातांच अलकनें दयाळला कांहीं कामासाठीं बाहेर पाठविलें; पण तिनें तारेचें कांहीं नित्याप्रमाणें प्रेमानें स्वागत केलें नाहीं.

" अलक, तूं जाणार ? मला नाहीं तें सांगितलंस ? " तारा म्हणाली, आणि मुराररावांच्या पाठीं तर अलक जात नसेल ना, असा अंधुक संशय तिच्या मनांत आलाच.

" इतक्यांत कांहीं निरोप कळल्यामुळें मला ताबडतोब पुण्यास जाणं भाग पडत आहे." अलक उत्तरली.

" ह्या कामामुळेंच आमच्या विवाहाला येण्याच तू नाकारलंस ? "

" होय ! "

" पण लग्नाला अजून सहा आठवडे आहेत. तोंपर्यंत नाहीं का तुझं काम संपणार ? "

" संपेल बहुतकरून. परंतु तरीही मला मला तुझी इच्छा मान्य करणं शक्य नाहीं." अगदीं तिऱ्हाइतासारखें एवढें बोलून अलकनें एक दुःखाचा सुस्कारा सोडला.

मुराररावांसाठीं तर तो सुस्कारा नव्हता ना ! एक क्षण तारेला मत्सरानें ग्रासलें; पण अलकच्या त्या कोमेजलेल्या चेहेऱ्याकडे लक्ष जातांच तारेला जरा वाईट वाटलें व ती म्हणाली, " तूं यावंस अशी माझी फार इच्छा होती; पण झालं तेंही ठीकच झालं."

" काय ? मी येण्याचं नाकारलं म्हणून तुला आनंद झाला ? " अलकनें आश्चर्यानें विचारलें. व तारेच्या उद्दाम आणि निष्प्रेम चेहऱ्याकडे लक्ष जाऊन ती पुढें म्हणाली, " तारे, तूं माझ्याकडं अशी परक्यासारखी कां पहातेस ? त्यांनीं सांगितलं तर तुला ? "

" त्यांनीं ! ते कोण ? " आपल्या खांद्यावरील अलकचा हात झिडकारीत तारा उद्गारली.

" ते म्हणजे मुरारराव."

तारे, तुला माझा इतका तिटकारा आला ना ? " अलकनें केविलवाणा प्रश्न केला.

मोठ्या कष्टानें आपला राग आवरून तारा म्हणाली, " मला नाहीं बाई तुझा

तिटकारा आला. पण स्वतःवर तुझा एवढासुद्धां ताबा नाहीं हें पाहून मला वाईट वाटलं हो. आम्हीं मराठाकन्यका आपले मनोविकार आपल्या प्रतिस्पर्धिनीला कधीं दिसूं देत नसतों. असो. मीं जातें आतां."

ती खोलींतून जाणार तोंच अलक ओरडली, "प्रतिस्पर्धिनी ? म्हणजे काय ? तारे, थांब. ह्या शब्दाचा खुलासा केल्याखेरीज मी तुला जाऊं देणार नाहीं."

"खुलासा करण्याविषयीं कां हा तुझा विनाकारण हट्ट ?"

"कां म्हणजे ? माझ्याही अंगांत स्वाभिमान आहे म्हणून. हं सांग बघूं आतां."

"बरं, तुझा हट्टच आहे तर ऐक. माझी प्रिय मैत्रीण म्हणविणारी तूं, माझ्या भावी पतीवर चोरून प्रेम करतेस."

तारेचे हे शब्द ऐकून अलकचे नैसर्गिक विस्तृत नेत्र आश्चर्यानें अधिकच विस्तृत झाले. "प्रेम ! आणि त्यांच्यावर !"

"काय ! माझ्या तोंडावर नाकबूल जातेस ! मनांतून प्रेम करून पाठीमागं त्यांची टर करतेस होय !"

काय स्वभावाची मौज आहे ही ! अलक मुरारराववांवर प्रेम करते हा तारेच्या मतें पहिला गुन्हा, तर प्रेम करून पुन्हा तसें करणें ही अगदींच असंभवनीय व विचित्र गोष्ट आहे, असें दर्शवून त्याची टर करते हा पहिल्याहूनही अधिक घोर गुन्हा !

"माझं, नि त्यांच्यावर प्रेम ! तारे, खूळ तर नाहीं लागलंय तुला ?"

"नाहीं बरं. खूळ लागलंच असलं कुणाला, तर तें तुला हो. मीं त्यांच्यावर प्रेम करितें म्हणून तूं माझा तिरस्कार करतेस, तुच्छतेनें वागतेस. आम्हा दोघांना प्रेमांत, आनंदांत पाहून तुला आमचा मत्सर वाटतो ना ?"

"होय, खरंच मत्सर वाटतो." आणि हें अलक एवढया केंविलवाण्या स्वरांत बोलली कीं, तारेचें मन एवढें मत्सरग्रस्त झालें नसतें तर तें तेव्हांच द्रवलें असतें.

"अस्सं ! आतां वळणावर आलांत होय ! काल आमच्या पाळतीवर राहिलीस, नंतर त्यांना एकटं गाठून आपल्या प्रेमाचं दिग्दर्शन केलंस; रडलीस, भेकलीससुद्धां असशील. पण ते आपल्या सत्त्वापासून ढळले नाहींत तेव्हां निराश होऊन निघून गेलीस."

"काय, त्यांनीं हें सारं असत्य सांगितलं ?"

" त्यांनीं ! हुं:, ते अत्यंत उमद्या स्वभावाचे आहेत. स्त्रियांचं दौर्बल्य ते असं कधींच उघड करून दाखविणार नाहींत. मला हें दुसरीकडून समजलं."

" तारे—"

" माझा असा विश्वासघात करून पुन्हा वर तोंड करून माझ्याकडे पहातेस ! माझ्या लाडक्या दादाला सेवाशुश्रूषा करून तूं वांचविलेंस म्हणून मी तुझ्यावर किती प्रेम करीत होतें. अजुनी तुला पश्चात्ताप नाहींना होत ? अस्सं ! आतां कशी मुद्रा मावळली." आणि खरोखरीच तारेनें विश्वासरावाच्या आजाराचा उल्लेख केलेला ऐकून अलकचे डोळे पाण्यानें भरले.

" तारे, थांब ! योग्य तोच न्याय कर. तुम्ही मराठे लोक स्वतःला न्यायी ना म्हणवितां ! मग नीट ऐक नि माझा निवाडा कर. तारे, मी प्रेम करितें."

" क–काऽऽय ? " रागानें तारेचा शब्द फुटेना.

" होय, मी खरंच प्रेम करतें, पण तुला वाटतंय त्यांच्यावर मात्र नाहीं. तर दुसऱ्यावर तुझ्याचसारखं, किंबहुना, तुझ्याहूनही जास्तीच प्रेम मी करतें; पण माझ्या प्रेमाची परत फेड मिळण्याची मला आशा नाहीं ग !"

" आशा नाहीं ! अरेरे—अलक, तूं ज्यांच्यावर प्रेम करतेस ते तुझ्यावर प्रेम करीत नाहींत ? " रागानें विकृत झालेली तारेची चर्या सहानुभूतीनें अगदीं मृदु झाली.

" मला तें ठाऊक नाहीं आणि काय सांगूं तारे, तें समजून घेण्याचं धैर्यही मला नाहीं. ते माझ्यावर प्रेम करीत असतील अशी एकच क्षण मला आशा वाटली आणि म्हणूनच मी त्यांच्यापासून दूर पळालें. मीं एक प्रतिज्ञा केलेली आहे व ती पुरी होईपर्यंत प्रेमाची आशा करणं व्यर्थ आहे ! "

" प्रतिज्ञा ? समजलें मी. योगिनी होण्याचीच ना प्रतिज्ञा ? "

" अंहं. माझी प्रतिज्ञा अशी स्वर्गीय नाहीं. स्वर्गापेक्षां मला वाटतं नरकपुरीशींच तिचा जास्ती संबंध असेल. काल रात्रीं मुरारराव याचविषयीं माझ्याकडे बोलत होते. माझ्या त्या प्रतिज्ञेमुळं मी तुझ्या मैत्रीला अपात्र आहें, असं त्यांचं म्हणणं ! "

" अलक, गडे माझ्यासाठीं तूं ती प्रतिज्ञा विसर ना ! " प्रेमानें अलकच्या गळ्यांत हात टाकून तारेनें विनविलें. पण तो हात दूर करीत अलक म्हणाली, " नको—नको, तारे, शपथ आहे तुला. मला अशी मोहांत घालूं नकोस गडे ! "

किंचित् थांबून तारेनें विचारलें, " मग त्यांनीं तुला ती चिठी लिहायला लावलं तर ! "

" होय."

" अरेरे ! अलक, ते तुझ्याशीं किती बरं निष्ठुरपणानं वागले. अलकताई, माझ्याकरितां सुद्धां तूं ती प्रतिज्ञा विसरणार नाहींस काय ? "

" नाहीं—नाहीं. तें अशक्य आहे. तुझा प्रियकर सांगतो तेंच खरं. तूं फार गोड पोर आहेस. मी तुला कधींही विसरणार नाहीं. पण आपली मैत्री इथंच तुटली पाहिजे. तारे, आपली पुन्हा भेट तरी होईल कीं नाहीं कोण जाणं ! " इतका वेळ आवरलेला प्रवाह मोकळा झाला. एकमेकींच्या गळीं पडून त्या दोघी रडूं लागल्या. पण एवढ्यांत दार लोटून हिरा आंत आली व गाल फुगवून म्हणाली, " ताराताई, ते रावसाहेब परत आले आहेत."

" काय ? खरंच. अलक, गडे तूं पण चल तिकडेच." घाईघाईनें तारा अलकसह आपल्या वाड्यांत आली व अलकला बागेंतील लताकुंजांत बसावयास सांगून तारा आंत पळाली.

" कशासाठीं बरं मुरारराव परत आले असतील ! "

हिराला विचारून अत्यंत उत्सुकतेनें तारा पुढील दालनांत शिरली. पलीकडील कोंपऱ्यांत दाराकडे पाठ करून बसलेल्या व्यक्तीकडे धांवत जाऊन, ते मुरारराव असणार अशा समजुतीनें, त्यांच्या गळ्यांत हात घालून तारा प्रेमानें पुटपुटली, " मला सोडून जायला होईना म्हणूनच स्वारी परत आली. होय ना गडे ? " पण लगेच दचकून ती मागें झाली. तेव्हां तो इसम तारेकडे तोंड करून म्हणाला, " ओहो ! ताराताई, एकूण आपली 'स्वारी' गेली वाटतं ! "

" कोण, दादा ! " एवढेंच म्हणून तारेनें प्रेमानें आपल्या भावाला मिठी मारली.

तारेचा दादा विश्वासराव फार शूर व उमदा होता. तो चांगला धिप्पाड असूनही देखणा होता. त्याचे डोळे त्याच्या मोकळ्या मनाची साक्ष देत होते परंतु त्याचें हास्य त्याच्या तरुण वयाला अयोग्य म्हणजे असावें तितकें आनंदी व मोकळें नव्हतें हा त्याच्यामध्यें झालेला फरक तावडतोब ओळखून तारा म्हणाली, " दादा, हें काय ? तुझी प्रकृति बरी नाहीं का ? तुझें तें गोड नि पोरकट हास्य कुठं लोपलं ? "

" माझं हास्य ! अहो ताईसाहेब, तुम्हीं मला आपली 'स्वारी' असं समजून जेव्हां प्रेमानें गाढालिंगन दिलंत तेव्हां नाहीं का माझं हास्य ऐकलंत ! "

" तें सारं खरं. पण तुझ तें पूर्वीचं हास्य–तुझ्या आनंदी वृत्तीची साक्ष देणारं तें हास्य–कुठं गेलं दादा ! "

" तें होय ! तें मी जयपूरला विसरून आलों."

" जयपूरला ? "

" होय. दुःख, क्लेश, लढाई, मृत्यु हीं सर्व आसपास असतां ताई, माझा पूर्वीचा आनंदी स्वभाव कसा कायम राहील ! पण आपली प्रकृति काय म्हणते ! वाः ! तूं तर फारच सुंदर दिसते आहेस. तुझी 'स्वारी' एकूण तुला मानवली तर ! "

" अस रे काय दादा ! " एक नाजुक मुरका मारून तारा म्हणाली.

" वाहवा, पोरी, असे मुरके मारायला कुठून शिकलीस तूं ! तुझ्या 'स्वारी'नंच शिकवलं वाटतं ! "

त्याचा हा आचरटपणा थांबविण्यासाठीं तो विषय बदलून तारा म्हणाली, " पण तूं इकडे कसा नि कां आलास तें सांग ना मला."

" तुला आणि तुझ्या 'स्वारी'ला भेटावं म्हणून ! अनायासं मला आधींच रजा मिळाली तेव्हां म्हटलं इकडे जरा मौज करून सर्वांनीं बरोबर पुण्याला जावं."

"खरंच ! दादा, किती प्रेमळ आहेस रे तूं. आपण उद्यांच जाऊं या गडे पुण्याला म्हणजे तुझी नि त्यांची भेट होईल. कारण नंतर ग्वाल्हेरला जायचं आहे त्यांना."

" अग, किती घाई पण. मला जरा साताऱ्याची हवा तर खाऊं देशील ! बाकी, तारे, तूं कांहीं म्हण, पण तुझ्या त्या पहिल्या आलिंगनांतली जादू कांहीं अजबच होती बघ ! "

" तूं मला आपलं लागेल तेवढं चिडव; पण एकदां उद्यांच्या उद्यां मला पुण्याला घेऊन जा म्हणजे झालं. आतां बागेंत फिरायला जा तूं हवं तर. मी जातें सामान बांधायला."

जर सामान बांधून सारी तयारी केली तर दादा आपल्याला नेल्याशिवाय रहाणार नाहीं अशी तारेची कल्पना होती.

तारेला जातांना पाहून विश्वासराव स्वतःशींच म्हणाला, " प्रेमाचा प्रादुर्भाव होतांच तारा अगदीं निराळी तरुणी झाली आहे, आणि मीसुद्धां नाहीं का निराळाच झालों ! पण काय उपयोग ! अशक्य गोष्टीविषयीं विचार करून काय

होणार ! चला, त्यापेक्षां जरा बागेंत तरी भटकावं." असा विचार करून विश्वासराव बागेंत आला. फिरतां फिरतां तो तिकडल्या लताकुंजाच्या जवळ गेला. त्यांत असलेल्या दगडी चौथऱ्यावर एक तरुणी बसलेली त्याला ओझरती दिसली. दुरूनसुद्धां ती फार दुःखी दिसत होती. विमनस्कपणें चालत विश्वासराव तिच्याजवळ गेला आणि तिला ओळखतांच तो दचकला. एवढा वीर पण आतां त्याचें हृदय धडधडूं लागलें. पुढें जाण्याची इच्छा असतांही जमिनीला खिळल्यासारखें त्याला झालें. पण तें कांहीं क्षणच. तो स्वतःला सांवरून आंत गेला व अगदीं मृदु आवाजांत–आशा आणि प्रेम एकवटलेल्या मृदु आवाजांत–म्हणाला, " अलक, शेवटीं आज भेटलीस ना ! "

प्रकरण सोळावें

# प्रेमाचे कांटे

अलकनें मागें वळून पाहिलें मात्र आणि तिच्या त्या दुःखी पण सुंदर मुखावर आश्चर्यकारक फरक झाला. आनंदानें तिचे डोळे हंसूं लागले. तें पाहून विश्वासराव कौतुकमिश्र आनंदानें म्हणाले, " अलक, एकूण मला पाहून तुला आनंद झाला तर ! "

" आनंद ? म्हणजे शंका का आहे ? पण–हाय ! " अलकनें एक हृदयभेदी निःश्वास सोडला. तिचा सारा आनंद मावळला. ज्यांच्या नुसत्या दर्शनानें आपलें हृदय एवढें विकसित झालें, त्यांच्याच सहवासामुळें आपलें दुःख व निराशा दुणावणार याची तिला जाणीव झाली. तिचे सुंदर ओंठ कांपूं लागले.

बिचारा विश्वासराव ! स्त्रीहृदयाची त्याला कल्पना नव्हती. आदल्या क्षणीं आनंदानें विस्तृत झालेल्या तिच्या हंसऱ्या डोळ्यांत दुसऱ्या क्षणीं अश्रु कां यावेत हें त्याला कळेना. युद्धांमध्यें न डगमगणारा शूर विश्वासराव प्रेमाच्या युद्धांत मुराररावाप्रमाणें धीट नव्हता. जवळ जाऊन तिचें समाधान करावें हें त्याच्या डोक्यांतच आलें नाहीं. " मला क्षमा कर हं अलक. मीं तुला घाबरवलें काय ? " एवढेंच मात्र तो बोलला.

अलकला कांहीं बोलवेना. थोडा वेळ स्तब्ध राहून ती म्हणाली, " होय, मला खरंच आश्चर्य वाटलं. कुठं जयपूर नि कुठं सातारा ! बाकी तुम्ही मराठे सदा घोड्यावर स्वार, हें मी विसरलेंच. मला वाटतं आपण आपल्या बहिणीला भेटायला आलां आहांत. होय ना सरदारसाहेब ? "

" अलक, जयपूर सोडलं म्हणजे तिकडे घडलेल्या गोष्टीही विसराव्यात काय ? अलक, त्या वेळीं तूं प्रेमानं मला 'विश्वास' म्हणत होतीस ना ? मग आतांच हें असं परकं संबोधन कां ? हा परका भाव तुला तरी आवडतो का ? " अत्यंत कोमल-कुशल प्रेमयोद्धा मुरारराव ह्यांनीं वापरण्यायोग्य नितांत प्रेमळ-स्वरांत विश्वासरावानें विचारलेल्या ह्या प्रश्नाला जात्याच भावनाशील असलेल्या त्या दुःखी बालिकेनें काय बरें उत्तर द्यावें ? पण असल्या प्रश्नांना उत्तरेंही तसलींच प्रेमाच्या मुक्या भाषेंतच असावयाचीं. एकच क्षण वर पाहून अलकनें मान खालीं

घातली; परंतु तितक्यानेंच विश्वासरावाचें समाधान झालें. " अलक, किती ग सुखाचे दिवस ते ! पुनः कधीं बरं तसे येतील ? "

आपली करुण दृष्टि विश्वासरावाच्या मुखावर स्थिर करून अलक म्हणाली, " नको त्या आठवणी. मला आतां जाऊं द्या. मला आज सातारा सोडून गेलं पाहिजे."

" ठीक, सुरेख ! एक वर्ष मी आपल्याला धुंडाळतों आहें, तेव्हां आज कुठं दर्शन झालं आणि म्हणे आज जाणार ! माझं येणं आपल्या जाण्याला कारण झालं वाटतं ? "

" असं कां बरं बोलतां ? छे—तसं नाहीं, पण मला आज गेलं मात्र पाहिजे."

तोंडानें तिनें जाण्याची गोष्ट काढली तरी तिचा पाय निघेना. कदाचित् पुन्हा कधींही विश्वासराव आपल्याला दिसणार नाहींत असें वाटून तिनें त्यांच्याकडे पाहिलें. तिला नकळत तिचे डोळे प्रेमळ झाले होते. विश्वासरावाला त्यामुळें धीर येऊन तो तिच्या जवळ जाऊन म्हणाला, " अलक, मग आज नाहीं ना जाणार तूं ? "

" काय करूं मी ? मला आज गेलंच पाहिजे ! "

" ठीक आहे. कुठं जाणार तेंही कळलं म्हणजे बरं होईल. कारण मीही तुझ्या-बरोबर येणार."

अलक गोंधळली. दुर्जनसिंहाबरोबर खुनाबद्दल वाटाघाट करतांना जर ह्यांनीं आपल्याला पाहिलें तर ! ज्यांचें मत आपल्याबद्दल उच्च असावें अशी आपली इच्छा, त्यांना तें कळलें म्हणजे आटोपलेंच. विश्वासरावाची सद्-सद्विवेकबुद्धि किती जागृत आहे त्याची तिला चांगलीच जाणीव होती.

" हें पहा. आपण माझी आशा सोडा."

" उं—हुं. मीं सांगतों तें सारं तूं ऐकलंच पाहिजेस ! "

" कां बरं हा भलताच आग्रह ? या पायीं आपणा दोघांनाही दुःख भोगावं लागेल !"

" छेः—छेः ! माझ्या सुखासाठींच हा आग्रह आहे. मी विचारीन त्या प्रश्नाचं आतां उत्तर तरी दे, किंवा तूं कुठं जाणार तें तरी सांग. नाहींतर एक वर्ष प्रवास केला तसाच आणखी करूं."

" काय म्हणावं तरी या हट्टाला ! ठीक आहे. विचारा काय विचारायचं तें."

" अलक, विचारायचं तें काय ! तें तुला नाहीं का ठाऊक ? एका वेळीं मला

आशा–नव्हे खात्री–होती, कीं तूं माझीच होणार. अलक, त्यांत माझी चुकी का होती ? सांग ना–बोल ना ! ''

तरीही अलक स्तब्धच. तिच्या चर्येंत मात्र फरक होत होता. अधोवदन करून ती उभी होती तरी दुःखाची जागा आनंद व लज्जा पटकावीत आहे हें दिसून येत होतें.

" अलक, मला आशा आहे का, तें सांग. मला जर तूं नकार दिलास, तर याउप्पर मी तुला त्रास देणार नाहीं. पण अलक, स्वतःच्या मनाची व माझी उगीच फसवणूक कां करतेस ? '' जरा पुढें होऊन तिचा हात आपल्या हातीं घेत तो पुढें म्हणाला, " अलक, तूं माझी होणार हें तर खरंच. तेव्हां आतां लग्न कधीं करायचं तें ठरवूं या. अं ! सांग पाहूं ! ''

हा प्रश्न ऐकतांच अलक दचकली. प्रेमाची समाधि खाड्कन् उतरली. आपला हात हलकेंच सोडवून घेत अलक म्हणाली, " अंहं. या जन्मीं तरी तें शक्य नाहीं.''

अलकच्या अधोवदनाकडे वांकून पहाणारा विश्वासराव आतां ताठ उभा राहिला. त्याची मुद्रा कठोर झाली. " अलक, बस्स झाला हा खेळ ! स्त्रिजात म्हणजे पुष्पासारखी आदरणीय, तिची नीट प्रेमानं जोपासना केली पाहिजे असं मी आजपर्येत समजत होतों; पण फुलांचे रंग जसे बदलतात तसे तुमचे मनोविकार बदलतात, हें नव्हतं मला ठाऊक. पण बाईसाहेब, एवढं लक्षांत ठेवा कीं, मी हें सहन करणार नाहीं. अलक, तुझं माझ्यावर प्रेमच नसतं तर गोष्ट निराळी. पण तुझं माझ्यावर प्रेम आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. मी तुझ्यावर किती प्रेम करतों तें नाहीं का तुला ठाऊक ! मग अलक, तूं माझ्याबरोबर कधींच लग्न करणार नाहींस याचा अर्थ काय ? अलक.'' आवाजांतील प्रारंभींचा कठोरपणा नाहींसा होऊन विश्वासराव आतां प्रेममृदु आवाजांत विनवूं लागला, " अलक, असं कां मला छळतेस ? तूं–तूं कोणाची वाग्दत्त वधू तर नाहींसना ? ''

अलकनें तावडतोब नकारार्थी मान हालविली. हें पाहून समाधानाचा एक निःश्वास टाकून विश्वासरावानें पुनः विचारलें, " अलक, मग आपल्या विवाहाला कांहीं अडचण आहे काय ? ''

" होय, तसं म्हटलें तरी चालेल.''

" आणि तूं माझ्यावर प्रेम करतेस ? ''

" होय, होय. आणि त्याचसाठीं मी आपणांपासून दूर पळतें."

" अच्छा. कुछ फिकिर नहीं. मी तुला माझी पत्नी करणारच. तेवढा अडथळा काय आहे तें मला सांग बघूं आतां."

" अंहं. तें कळल्यावर माझी कींव न करितां आपण माझा तिरस्कारच कराल !"

विश्वासरावाचे नेत्र प्रेमळ झाले. अगदीं हलक्या हातानें अलकची हनुवटी वर उचलून आदरपूर्वक तो म्हणाला, " अलकदेवी, तूं प्रयत्न केलास तरी तुझ्या हातून वाईट गोष्ट होणं शक्य नाहीं. जयपुरांतील माझी दयेची देवी सातार्‍यांत तिरस्कारार्ह कशी होईल ? "

अलकचें हृदय पिळवटून निघालें. आपल्याविषयीं केवढा आदर यांना ! आणि जर ती गोष्ट त्यांना कळली तर ! प्रतिज्ञेविषयीं विश्वासरावाला एक अक्षरही कळूं न देण्याचा अलकनें निश्चय केला.

" हं–अलक, लौकर–सांग, चट्दिशीं सांग—"

" कसं सांगूं ? माझ्या सदसद्विवेकबुद्धीला त्या गोष्टीनं टोंचणी लावलेली आहे ना ? "

" म्हणजे ? अलक, ती एकादी लाजिरवाणी गोष्ट तर नाहीं ना ? "

" मुळींच नाहीं. मला त्या गोष्टीचा अत्यंत अभिमान वाटतो. काय करूं ? हें पहा, आपण थोडा धीर धरा. मी विचार करून काय तें ठरवितें."

" मग, माझी पत्नी होणं न होणं तुझ्या हातातलं आहे ? होय ? "

" हो—य ! "

" किती गोड उत्तर दिलंस. आतां कांहीं काळजी नको. तूं माझी पत्नी होणार खास. बरं, मग विचार करून मला कधीं सांगशील ? "

" सांगणार नाहीं. ताराताईमार्फत मी कळवीन. माझी प्रतिज्ञापूर्ति करावयाला मात्र आपण अडचण आणूं नका."

" प्रतिज्ञापूर्ति ? कसली प्रतिज्ञा ही ? "

" अंहं, तें माझं गुपित आहे. तें नाहीं आपल्याला सांगायचं."

" अच्छा. माझी पत्नी होण्याचं जर उद्यां कबूल केलेस, तर तें मला नको सांगूस. नाहींतर मात्र...पण जाऊं दे. तो उद्यांचा प्रश्न आहे. बरं, मग मी जाऊं आतां ! "

अलकनें मानेनेंच परवानगी दिली. आशा व प्रेम यांच्या संयोगानें तिचे गाल

आणि डोळे फारच मनोहर दिसत होते. ती आजच्याएवढी सुंदर विश्वासरावाला कधींच दिसली नव्हती.

विश्वासराव गेल्यावर अलक लगेच सराईत परतली. पुण्यास जाण्याचा बेत आपण रहित केला आहे तरी सामानसुमान बांधूं नको, असें सराईत येतांच तिनें दयाळला कळविलें. थोड्या वेळानें दयाळसिंह एक थैली घेऊन आला. दुर्जनसिंहाकडूनच ती आली असून आंतील कागदावर पुढील शब्द होते—

"विशिष्ट इसम सांपडला! तो आपल्या हाताच्या टापूंतच आहे. आनंदांत रहा!"

अरेरे! दैवानें अखेर डाव साधलाच! सूड उगविण्याची संधि आली खरी; पण प्रतिज्ञापूर्ति झाली तर सुखाची काय वाट! विश्वासरावाची कायमची निराशा करावी लागेल ना? विजयाची तसबीर हातीं घेऊन अलक त्याला उद्देशून बोलूं लागली, "भाई, तुझ्या लाडक्या अलकला सुखांत पाहून तुला आनंद नाहीं का होणार? विजय, तुझी अलक तुला कधींच विसरणार नाहीं; पण द्वेषासारख्या तीव्र भावनेनें करपून जाण्यापेक्षां, भाई, प्रेमाच्या कोमल ओलाव्यानें मीं फुलूं नको का? भाई, प्रेमाच्या पवित्र दानाचा मीं स्वीकार करूं ना? मग दे तर मला आशीर्वाद. माझ्या प्रेमानें त्यांना सुखी करून मीही सुखी होईन, असा गोड आशीर्वाद मला दे!"

प्रकरण सतरावें

# रजपुतांचें ब्रीद

ठरल्याप्रमाणें अलकनें तारेच्या मार्फत विश्वासरावाला आपला होकार कळविला. तारेचीं पूर्वीचीं मतें वेगळीं होतीं खरीं, पण अलक आपल्या लाडक्या दादाची लाडकी पत्नी होणार हें ऐकून तिला फार आनंद झाला. कदाचित् तिला सांपडले-ल्या प्रेमाच्या निधीनें तिचें मन मोठें केलें असेल.

बोलतां बोलतां तारेनें अलकला विचारलें, "अलक, तुझीं वडिल माणसं कोण कोण आहेत ?"

"ताराताई, तुम्हां दोघांशिवाय या जगांत माझं असं प्रेमाचं मला कुणीही नाहीं; पण पालक या नात्यानं दुर्जनसिंह राठोड यांची परवानगी घ्यायला सांग हां."

"सांग म्हणजे ? कुणाला सांगू अलक ? वाः ! बरीच आहेस कीं ग ! जयपुरीं दादाची एवढी सेवा करून त्याचं मन हिरावलंस नि आतां त्याच्याविषयीं बोलतां-ना लाजतेस ! दादानं तर एकदां मला लिहिलं होतं कीं, तूं त्याला विश्वास म्हणून हाकसुद्धां मारीत होतीस आणि आतां—"

"दुसऱ्याला बोलतेस मात्र; पण ताराताई तूं कां ग मुराररावांना हांक मारून पूर्वीसारखा तोडून तुकडा देत नाहींस ?"

आतां तारेची लाजायची पाळी आली; पण ती वस्ताद होती, लगेच विषयां-तर करून ती म्हणाली, "म्हटलं वहिनीसाहेब, दादाची नि दुर्जनसिंहजींची हल्लींच मैत्री जमली आहे. हल्लींच म्हणजे अगदीं नुकतीच. दादा कोल्हापुराला होता ना, तेव्हां ! दादा त्यांची भारी स्तुति करीत होता. अलक, ती काळजी नको, ते सहज परवानगी देतील."

"काकाजी उद्यांच इकडे येणार आहेत, तेव्हां—" अलक थांबतांच तारा म्हणाली, "तेव्हां त्यांना भेटायला दादाला सांगायाचं, असंच ना ! बरं, सांगेन हो." तारा आनंदानें निघून गेली.

त्याच दिवशीं संध्याकाळीं वृद्ध दयाळसिंह अलकच्या खोलींत आला. लहान-पणापासून त्यानें व त्याच्या बायकोनें अलकला वाढविलें असल्यानें तो तिच्या

वडिलांचा आश्रित असतांही तिच्याकडे वृद्ध नातलगाच्या सलगीनें वागत असे. आतां अलककडे येऊन धमकावणीच्या स्वरांत तो म्हणाला, "बेटा, मी हें काय ऐकतों आहे ? तूं एका मराठमोळ्याबरोबर लग्न करणार ? तूं—अस्सल बीजाची रजपुतानी—आपलें उच्च ब्रीद विसरणार ? एका मराठ्यानेंच विजयाचा बळी घेतला हें तुला ठाऊक आहे ना ? कीं तूं आपली प्रतिज्ञा विसरलीस ? रजपूत लोक न्यायाच्या बाबतींत अति निष्ठुर असतात म्हणून असलेली त्यांची ख्याति तूं लोपवणार ?"

प्रत्येक शब्द अलकच्या हृदयांत भोंसकून जात होता. परंतु दयाळनें अशा स्वरांत बोलावें हें न आवडून, आपल्या कृत्याचें समर्थन करण्यासाठीं ती म्हणाली, " दयाळ, असा रागावतोस काय ? सूड घेणं वाईट आहे. ईश्वर न्यायी आहे. मग न्याय करणं त्याच्यावर न सोंपवतां आपण दुर्बळ माणसांनीं उगाच ढवळाढवळ कां करावी ? माधशी मला नेहमीं सांगत असे कीं, 'उसनें फेडूं नयेचि सोसावें'. मग दयाळ, माझं चुकलं कुठं ? "

" चुकलं कुठं ? पोरी, तूं आपल्या कुळाला काळोखी लावलीस ! तिसऱ्या पिढींत घ्यावयाचा सूड तूं अंगाबाहेर टाकतेस ? बाळ विजय, तुझी बहीण तुला आणि आपल्या ब्रीदाला साफ विसरली; पण मी मात्र तुला कधींच विसरणार नाहीं. प्रेम म्हणे प्रेम ! कर्तव्याची भूल पाडणारं कसलं हें प्रेम ? अलककुमारी, एक दिवस तुला ह्याचा पश्चा.........."

" दयाळ, बस्स कर. वृद्ध आहेस म्हणून तुला मी मान देऊन वागवितें, त्याचा तूं गैरफायदा घेतलास. एखाद्या निकटच्या नातलगाप्रमाणें मला तुझ्याविषयीं प्रेम वाटतं; पण आज तें संपलं. माझ्या कृत्याचा मला तूं जाब विचारणार ? बस्स झालं. दयाळ सांगून ठेवतें, माझ्या पतींना योग्य तो मान जर तूं देणार नसलास तर मला तुझी मुळींच गरज नाहीं."

दयाळसिंह आतां अगदीं नरम आला, " बेटा, या म्हाताऱ्यावर असा रोष करूं नकोस. मी मनाचा वाईट नाहीं. मीं तुझा इमानी कुत्रा आहें. मला दूर करूं नकोस." दयाळच्या डोळ्यांतून अश्रु पडत होते.

" दयाळ, तुला जर एवढं वाईट वाटतं तर तूं जाऊं नकोस; पण यापुढें मात्र जीभ स्वाधीन ठेव ! "

अलकच्या समोर जीभ स्वाधीन ठेवण्याचें दयाळनें कबूल केलें असेल, तिच्या पाठीमागें नाहीं. कारण बाहेर जातां जातां तो स्वतःशीं पुटपुटला, " मी जाब विचारायचा नाहीं काय ? ठीक आहे. पण दुर्जनसिंह हक्कानें जाब विचारील तेव्हां काय करशील ? "

आणि त्या वेळीं बरोबर हाच विचार अलकच्या डोक्यांत आला. " देवा, हा नोकर असून इतका चिडला, मग काकाजी केवढा गहजब करतील ? "

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दुर्जनसिंह जेव्हां अलकच्या मुक्कामीं आला तेव्हां तिला पहातांच तो फार चकित झाला. विजयच्या मृत्यूनंतर त्यानें अलकला आनंदी कधींच पाहिली नव्हती. त्यामुळें आजचें तिचें सौंदर्य त्याला अगदीं अद्भुत वाटलें व तो हंसत हंसत तिला म्हणाला, " वाः ! अलक, माझा संदेश मिळाला तर तूं एवढी खुषी झालीस; मग प्रत्यक्ष खुनी दिसल्यावर तूं मला किती शाबासकी देशील ? आपल्या कराराप्रमाणें माझा शब्द मीं पाळला. आतां तुझा तूं पाळ. हं अलक, तूं माझी पत्नी कधीं होणार ? "

" कधींच नाहीं. माझ्या वचनाची मला आठवण देण्यांत आतां कांहींच मतलब नाहीं ! "

तिच्या शब्दांकडे दुर्लक्ष करून दुर्जनसिंह पुढें म्हणाला, " अलक, कालच्या बातमीनें तुला एवढा आनंद झाला ना ? तूं अगदीं आनंदांत दिसते आहेस ? "

" होय. खरोखरीच मी सध्यां आनंदांत आहें आणि तुमची परवानगी मिळाली म्हणजे जन्मभर अशीच आनंदांत राहीन ! "

" माझी परवानगी ? म्हणजे ? अलक, सूडासारखें पवित्र कर्तव्य करायला तुला परवानगी द्यावयाला हा अस्सल रजपूत वीर डगमगणार ? भिऊं नकोस अगदीं शेवटपर्यंत मी तुला जरूर मदत करीन. विजयाच्या आत्म्याला आतां शांति मिळेल ! "

" खरं असेल तुमचं म्हणणं; पण काकाजी, तें सारं मीं आतां विसरणार. प्रेमाचा महिमाच असा आहे ! "

" अलक, तुझं डोकं तर ठिकाणावर आहे ना ? "

" पूर्वी नव्हतं, पण आतां आहे. सूड घेणे म्हणजे पाप आहे ! "

" पाप आहे ? पोरी, तूं हा अनाचार करीत आहेस ! "

" नाहीं—नाहीं. काकाजी, मी विजयाचा आशीर्वाद ग्रहण करूनच प्रतिज्ञेचा त्याग केला आहे. मला पाप लागणार नाहीं."

" आणि हें तूं कशासाठीं करणार ? नुसती लहर फिरली म्हणून प्रतिज्ञेचा त्याग केलास ? "

" नाहीं. प्रेमासाठीं मीं तो त्याग केला. द्वेषाच्या तीव्र भावनेनं मी करपून जात होतें. आतां प्रेमाच्या शीतल छायेंत मीं सुखी झालें. प्रेमदान ही अजब चीज आहे. खरंच आपल्या प्रेमानं आपण सुखी होऊन दुसऱ्याला सुखी करणं हा केवढा पुण्यसंचय आहे ! " अलक आतां स्वतःशींच बोलत होती. एका अनिर्वचनीय भावनेनें तिचे डोळे सौम्य पण तेजस्वी दिसूं लागले. यापूर्वी तिचे डोळे असे झालेले दुर्जनसिंहानें कधींच पाहिले नव्हते. त्याला आतां सर्वत्र अंधार दिसूं लागला. अलककुमारी व आपण ह्यांमध्यें मोठा थोरला तट उभारला जात आहे असें त्याला वाटूं लागलें.

" अलक, तूं प्रेम करतेस ? "

" होय. अत्यंत आदरपूर्वक प्रेम करितें ! "

" काय ? खरं सांगतेस ? अलक, तुझ्या प्रतिज्ञापूर्तीसाठीं मी तुला मदत करीन, तशी तो करूं शकेल काय ? "

" तशी त्यांची मदत मला नकोच आहे."

" अलक, विचार कर. एकाद्या अविचारी तरुण पोरावर प्रेम करून तूं काय सुखी होणार ! मी तुझ्यावर करतों तेवढं प्रेम कोणीच तुझ्यावर करणार नाहीं. अलक, माझें काय तुझ्यावर आजकालचें प्रेम आहे ? तूं एवढीशी होतीस तेव्हां-पासून मी तुझ्यावर प्रेम करतों आहें. माझ्याच प्रेमाच्या सांवलींत तूं वाढलीस, आणि आतां तेंच प्रेम तुला कडू झालं काय ? "

" तुम्हीं मला आजपर्यंत फार चांगुलपणानं वागविलंत. खरंच काकाजी ! " मृदु स्वरांत अलक म्हणाली.

" असो. एकूण तुला आठवण आहे तर ! लहानपणीं तूं मातीच्या बाहुल्यां-साठीं हट्ट घ्यावास, तेव्हां मींच ना तुझे हट्ट पुरवावे ? आतां तरुणपणीं तूं सूडा-साठीं हट्ट घेतलास, तेव्हां साऱ्या सुखसोयी दूर सारून मी वणवण हिंडूं लागलों आणि त्या मला, एका उपटसुंभासाठीं तूं गरज सरल्यावर अळित्याच्या चोथ्या-प्रमाणें फेंकून देणार ? इतका मी तुला नकोसा झालों ? "

" काकाजी, असं कां बरं बोलतां? तुम्ही नि तुमचं प्रेम मला कसं बरं नकोसं होईल! काकाजी, मी तुम्हांला तुमच्या बेटीसारखी; मग असं भलतं कां बरं मनांत आणतां?"

" अलक, नको ग अशी निष्ठुर होऊंस. मला तुझ्याखेरीज ह्या जगांत कोणी नाहीं. चल, विजयाच्या खुन्याचं नांव मी तुला सांगतों. तूं आपला पण पुरा कर आणि मला सुखी कर!"

" अंहं, काकाजी, कृपा करून त्याचं नांव उच्चारूं नका!" अंगांत कसला तरी संचार झाल्याप्रमाणें अलक ताठ उभी राहिली, व दुर्जनसिंहाच्या नजरेला नजर देऊन, प्रत्येक शब्दावर योग्य जोर देत ती म्हणाली, " काकाजी, ऐका, तें नांव तुम्हीं सांगतां कामा नये. मी तुम्हांला मनाई करते आहे. जर तें नांव उच्चाराल तर जन्मभर मीं तुमचा तिरस्कार करीन. एकदां सभोंवार नजर फिरवा आणि विजयाची तसबीर कुठं दिसते का पहा. मीं होऊन विजयाची तसबीर आंत ठेवून दिली आहे. स्वखुषीनें मीं प्रतिज्ञेचा त्याग केला आहे. ज्याच्या प्रेमासाठीं मीं हा त्याग केला, त्यांची योग्यता यावरून ओळखा आणि मग काकाजी, मला सांगा कीं, मीं त्याग केलेल्या त्या प्रतिज्ञेमुळेंच केवळ तुमच्या हृदयांत उगम पावलेल्या त्या अयोग्य आशांकुरांचा आतांच मोड करणं योग्य आहे कीं नाहीं?"

" अलक, तूं त्याच्यावर एवढं प्रेम करतेस!"

" होय. त्यांना माझ्याविषयीं आदर वाटावा असंच मी नेहमी वागणार."

" अशक्य आहे हें!"

" अशक्य? आणखीन् पंधरा दिवसाच्या आंत आमचा विवाह होणार."

" अस्स? एवढी खुळावली आहेस काय? पण मी तुझा पालक आहें, हें लक्षांत ठेव. मी मुळींच परवानगी देणार नाहीं."

" मीं त्या गोष्टीचा विचार केलेला आहे. मी ज्यांची पत्नी होणार ते रजपूत असते तर तुम्हांला अडथळा करतां आला असता; पण ते रजपूत नाहींत!"

अलकपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं अशी खात्री होऊन दुर्जनसिंहानें विचारलें, " ज्याच्यावर तूं एवढी भाळली आहेस तो उमदा आणि सद्वर्तनी तरी आहे ना?"

" माझी रुचि आणि मतं तुम्हांला ठाऊक आहेत ना ? मला सर्व कांहीं उत्तम, सर्वोत्कृष्ट पाहिजे असतं ! "

" होय ना ? मग माझं काम फार सुलभ आहे तर ! तुझ्या त्या सद्वृत्तनी प्रियकराला मी हें सर्व ऐकवतों. शिकारी आपल्या सावजाचा पाठलाग करतो तशी तूं गेलं सबंध वर्ष एका मानवी सावजाचा पाठलाग करीत होतीस हें त्याला सांगतों. बघूं या तो असल्या रजपूत वाघिणीबरोबर कसं लग्न करतोय तें !"

" खुशाल जाऊन सांगा. तुम्ही खोटं बोलतां असंच ते तुम्हांला सांगतील !" भीतीचें लवमात्र चिन्ह न दर्शवितां अलक म्हणाली.

" मी त्याला माझा शब्द सप्रमाण सिद्ध करून दाखवीन. आणि नंतर माझ्या तोंडावर माझा अपमान केल्याबद्दल त्याचे कान उपटून हातांत देईन !"

" त्यांचे कान तुम्ही उपटणार ? तुम्ही ? एकाद्या घुंगुरट्याला लीलेनं पकडून मारावं त्याप्रमाणं ते तुमची विल्हेवाट लावतील ! मी मारेकरीण आहे असं तुम्ही त्यांना सिद्ध करून दाखविणार ? जयपुरीं त्यांची दयेची देवी झालेली मी वाघीण ! जा बरं, खुशाल त्यांना हें जाऊन सांगा ! त्यांच्या हातचा मार खाऊन कुत्र्या-प्रमाणं शेंपटी पायांत घालून परत याल ! काकाजी, काय समजलांत तुम्ही ! ही आपली सिरोही नाहीं बरं ! हा मराठ्यांचा सातारा आहे. आणि तुम्हीं ज्यांना मुलाखत द्यायला जाणार ते सरदार विश्वासराव शिर्के, शूर वीर आहेत ! "

अलकच्या भाषणाचा प्रारंभींचा भाग ऐकतांना काळवंडलेलें दुर्जनसिंहाचें तोंड तिचें शेवटचें वाक्य ऐकतांच आश्चर्यानें विकृत झालें. अलकच्या तोंडून तें विशिष्ट नांव ऐकतांच क्रूर विजयानें दुर्जनसिंह मोठ्यानें हंसणार होता; पण मोठ्या प्रयासानें त्यानें तें दाबलें. आनंदानें लुकलुकणाऱ्या आपल्या बारीक घाऱ्या डोळ्यांची उघडझांप करीत तो म्हणाला, " सरदार विश्वासराव शिर्के ! हें–हें नांव त्याचं ? "

" होय ! " अलक हळूच म्हणाली. आपलें पालकाचें कार्य विश्वासूपणानें बजावणाऱ्या दुर्जनसिंहाला आपण टाकून बोलल्याबद्दल तिला थोडें वाईट वाटत होतें. " काकाजी, तुम्ही त्यांना ओळखतां ? त्यांच्या उदात्त चारित्र्याची तुम्हांला जाणीव आहे ? "

" मी विचार करून काय तें उद्यां कळवीन. पण अलक, आज तूं मला जें तोडून बोलली आहेस त्याचा एक दिवस तुला पश्चात्ताप होईल ! "

" आतांच मला वाईट वाटतंय, काकाजी ! " अलक त्याला उद्देशून म्हणाली. पण दुर्जनसिंह झपाट्यानें जिना उतरून गेलाही होता. व तो त्या वेळीं विचारांत इतका गढला होता कीं, त्यानें तें ऐकलें असतें तरी त्याला त्या शब्दांचा अर्थ कळलाही नसता. त्याच्या चेहऱ्यावरील दुःखाच्या रेषा, म्हातारपणाच्या सुरकुत्या आणि आनंदाची तरतरी यांचा विचित्र मिलाफ जर अलकनें पाहिला असता तर ती निःसंशय दचकली असती. पण अलकनें त्याच्या चर्येकडे पाहिलेंही नाहीं आणि नंतरचें त्याचें तें खुनशी हास्य ऐकलेंही नाहीं. कारण तिचें मन विश्वासरावाविषयीं-च्या प्रेमाभिमानानें भरून गेलें होतें.

## प्रकरण अठरावें

## " फांसा टाकला "

त्या दिवशीं संध्याकाळींच दुर्जनसिंहाकडून अलकला एक चिठी आली. त्यांत मराठा सरदार विश्वासराव शिर्के यांजबरोबर अलकनें खुशाल विवाह करावा असा मजकूर असून दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपण स्वतः विश्वासरावाला भेटायला जाणार असेंही दुर्जनसिंहानें लिहिलें होतें.

चिठी वाचून अलकला फार आनंद झाला. तिनें लगेच दयाळबरोबर ती तारेकडे पाठविली. तारेनें ती विश्वासरावाच्या हातांत दिली. ती वाचून तो मोठ्यानें हंसला. तें ऐकून तारा म्हणाली, " दादा, हरवलेली वस्तु सांपडली रे ! "

" अस्सं ! तुझी 'स्वारी' आली वाटतं ? "

" हें रे काय दादा ? ते कधीं हरवले होते वाटतं ? "

" अरेच्चा ! खरंच कीं ! ते नाहीं—त्यांचं हृदय हरवलं होतं; तें आमच्या ताराताईला सांपडलं आणि आमच्या ताराताईचं हृदय—"

" दादा, पुरे हं चेष्टा ! ओळख पाहूं ही वस्तु ! "

" दौंडी पिटूं कां ? "

" तुला सरळ बोलायचंय कीं नाहीं ? "

" बरं, राहिलं माझं. तूंच बोल पाहूं. हं कसली वस्तु ? "

" अरे, तुझं तें पूर्वींचं गोड हास्य ! अलकबरोबर तुझं लग्न ठरल्यापासून, दादा तूं पूर्वींसारखा आनंदी झालास ! "

तारेबरोबर हास्यविनोद करणारा विश्वासराव एकदम गंभीर झाला. एकाद्या पवित्र वस्तूविषयीं बोलतांना वापरावा तशा नम्र, मृदु स्वरांत तो म्हणाला, " तारे, जी अमूल्य वस्तु मला कायमची हरपली असं समजून खेद करीत होतों ती ईश्वरानें उदार मनानें मला दिली; मग मीं पूर्ववत् आनंदी झालों तर काय नवल ! ईश्वरानं हें माझ्यावर एवढं मोठं ऋण केलं आहे कीं, कृतज्ञ अंतःकरणानं मी जन्मभर जरी त्याचे आभार मानले तरी ते अंशतःसुद्धां फिटणार नाहींत ! "

आपला दादा एवढा भावनामय असेल अशी तारेला कल्पना नसल्यामुळें चकित होऊन ती म्हणाली, " दादा, अलकवर तुझं इतकं विशाल प्रेम आहे ! "

" म्हणजे ? तारे, यांत तुला आश्चर्य तें काय वाटलं ? 'तुझ्या स्वारी'चं नाहीं वाटतं तुझ्यावर एवढं प्रेम ? " आपल्या स्वभावानुसार चेष्टेनें डोळे मिच-कावीत विश्वासराव म्हणाला.

" तर, तर ! जसा कांहीं प्रेमाचा सारा मक्ता तुमच्याकडेच दिला आहे. माझ्यावर अतोनात प्रेम आहे हो; पण त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं तेही जातीनें मराठा नि मीही मराठाच. तुझं तसं नाहीं. अलक रजपूत. म्हणून आश्चर्य वाटल हो ! "

दांताखालीं खालचा ओठ दाबीत विश्वासराव म्हणाला, " तारे, तूं माझी फार लाडकी बहीण म्हणूनच मी हे शब्द ऐकून घेतले. तारे, मुराररावांविषयीं मला कांहीं एक माहिती नसतां, तुझ्या पत्रावर सर्वस्वीं भार ठेवून, तुला सुख होण्या-साठीं मीं तुझ्या लग्नाला परवानगी दिली. ती देणं न देणं सर्वस्वीं माझ्या हातीं होतं. आणि मीं परवानगी दिली नसती तरी तें सध्यांच्या काळाला अनुरूपच झालं असतं. सध्यां दख्खनचे मराठे आणि ग्वालेरचे मराठे यांत किती बेबनाव आणि वैमनस्य आहे हें तुला ठाऊक आहेच. असें असतां मी एक शब्दही विरुद्ध काढला नाहीं, आणि तूं-अलकचे सद्गुण पूर्णपणें जाणणारी तूं-अस बोलतेस ? "

" दादा-दादा, नको रे असं बोलूस. मी बघ कांहीच पोच न बाळगतां बोललें. दादा, तूं माझ्यावर किती प्रेम करतोस तें नाहीं का मला ठाऊक ? दादा, मला क्षमा करशील ना ? " बोलतां बोलतां तारेचे डोळे भरून आले.

क्षणभरच कां होईना, पण आपण तिला टाकून बोललों याबद्दल वाईट वाटून विश्वासराव म्हणाला, " हं ताईसाहेब, पुसा ते डोळे. आजच पुण्याला जाऊं या म्हणून माझ्या पाठीं लागली होतीस ना ! बरं तर, उद्यां संध्याकाळीं जाऊं या 'तुझ्या स्वारी'कडे. कर हं सारी तयारी ! "

आपल्याशींच हंसत हंसत तारा आंत गेली.

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं दुर्जनसिंह विश्वासरावाकडे आला. तो आपला आनंद दर्शविण्यासाठीं एकसारखा हंसत होता. विश्वासरावाचें मन जर अलककडे एवढें गुंतलेलें नसतें तर दुर्जनसिंहाचें हें वागणें फारच कृत्रिम दिसतें हें त्याच्या सहज लक्षांत आलें असतें.

जाजमावर बसतां बसतां दुर्जनसिंह म्हणाला, " काय विश्वासराव, कोल्हापुरा-

ला मीं म्हटलं ना तुम्हांला, कीं आपण पुनः लौकरच भेटूं. बघा, झालंच त्याप्रमाणें ! चला, आतां कामाला लागूं या."

विश्वासराव त्याच्याकडे निरखून पहात म्हणाला, "हें काय ? तुमची प्रकृति ठीक नव्हती ? मीं तुम्हांला पाहिलें त्याला आठपंधरा दिवस झाले असतील; पण तुम्ही तेव्हांपेक्षां जसे कांहीं दहा वर्षांनी म्हातारे झाल्यासारखे दिसतां !"

"चाललंय झालं ! या वयाला प्रवास थोडाच झेंपणार ? त्या त्रासाचा परिणाम होतोच प्रकृतीवर !" निष्काळजीपणें दुर्जनसिंह हें बोलला, पण त्याची नजर एकसारखी खोलींतील सामानावरून चंचलपणें फिरत होती. समाधानाचा एक निःश्वास टाकून त्यानें आपले लुकलुकणारे डोळे 'वि. शि.' असें नांव लिहिलेल्या एका संदुकीवर स्थिर केले. खरें म्हटलें तर या संदुकींत विशेष असें कांहींच नव्हतें. ती बरीच जुनी व कांहींशी मोडकी दिसत होती, पण तिच्यांत कांहीं तरी आकर्षण होतें खास. कारण दुर्जनसिंहानें कितीही प्रयत्न केला तरी त्याची नजर पुनःपुन्हा त्या मोडक्या संदुकीकडे जात होती.

"दोस्त, तुमचं बरंच सामान आहे. एवढं सर्व कांहीं प्रवासांत तुमच्याबरोबर जात नसेल नाहीं ?" त्यानें विश्वासरावाला विचारलें.

"छे: एवढं सगळं कुठं फिरवणार बरोबर ? आता तुम्ही ज्या संदुकीकडे पाहतां आहां ना, ती मात्र नेहमीं माझ्याबरोबर असतेच !"

"हं, मला वाटलंच तें !" पुनः एकवार त्या संदुकीवर नजर टाकून दुर्जनसिंह पुढें म्हणाला, "पण तें राहूं द्या आपण कामाला लागूं या. अलककुमारीबरोबर तुम्ही लग्न करणार !—तिचा पालक या नात्यानं माझ्यावर फार मोठी जबाबदारी आहे. खर म्हटलं तर माझ्या मनांत तिला अस्सल रजपूत नवरा पहावयाचा होता; पण मी ह्या लग्नाला माझी परवानगी देतों. कारण एक तर मी तुम्हांला ओळखतों आणि तुमची योग्यता जाणतों; आणि दुसरं ! म्हणजे अलकचं तुमच्यावर म्हणे प्रेम जडलं आहे !"

"मी तिला पूर्ण सुखी करीन. तुम्ही कांहीं काळजी करूं नका —मला जास्ती दिवस रजा नसल्यामुळं आणखी दहा दिवसांनींच लग्नाचा विधि करावा !"

"हं, फार उतावळेपणा बरा नाहीं. पण लौकरच लग्न आटोपावं; कारण तें माझ्याही सोयीचंच होईल. पण तुम्हांला रजा किती दिवस आहे ?"

" खरी आहे तीन आठवडे; पण माझी प्रकृति कांहीं महिन्यांपूर्वी बरीच नादुरुस्त होती, त्यामुळं मला वरिष्ठांनीं पाहिजे असल्यास आणखी पंधरा दिवस रजा वाढविण्याची परवानगी दिली आहे ! "

" वा: ! हें फारच ठीक झाल. कारण लग्नसमारंभ सिरोहीला करावयाचा-थांबा, कांहीं बोलूं नका मध्यें. तुम्ही सरदार असाल; पण अलककुमारी म्हणजे एक छोट्या प्रमाणावर राणीच आहे म्हटल तरी चालेल. तिकडे तिच्या हक्काचा फार मोठा जमीनजुमला आहे. तो सर्व मी तुमच्या स्वाधीन करीन पण तिकडले लोक अलकवर नाराज होतील.—तिकडे जर लग्नसमारंभ झाला नाहीं तर त्यांची निराशा होईल. तेव्हां तुम्ही तिकडे या आणि तिकडेच तुमच्या सुखाचा भोगवटा मी तुम्हांला देईन ! " दुर्जनसिंहाची नजर फिरून त्या संदुकीकडे आणि तीवरील 'वि. शि.' या अक्षरांकडे गेलीच विश्वासरावाच्या अजून विचार डळमळतोच आहे असें पाहून दुर्जनसिंह लगेच म्हणाला, " समारंभ झाल्याबरोबर दुसऱ्याच दिवशीं तुम्ही परत यावयाला निघा अलकला माझा निरोप सांगा कीं, म्हणावं तिच्या उच्च चौहान कुळांतील ती शेवटलीच आहे, तेव्हा तिच्या योग्यतेनुरूप तिचा विवाह तिच्या मायभूमींतच व्हावा अशी माझी म्हाताऱ्याची इच्छा आहे. ती बहुतकरून नाकबूल करणार नाहीं "

" ठीक आहे मला कबूल आहे आणि अलकही हा बेत पसंत करीलच किती दिवस मोडतील प्रवासात ! "

" बारा दिवस लागतील. अलक, मी व दयाळ उद्यां पहाटे निघूं, तुम्ही व तुमची भगिनी परवां संध्याकाळीं निघा. मी सर्व तयारी करीन. पल्ल्यापल्ल्यावर मुक्काम करायचा आणि आरामांत यायचं ! तुम्ही माझे पाहुणे हं ! विसरूं नका.—अगदीं माझे-सर्वस्वीं माझे-खास पाहुणे तुम्ही ! " एकावर एक दात दाबून दुर्जनसिंह हे शेवटले शब्द पुटपुटला.

" हो-हो, जरूर; मी आणि माझी बहीण तुमचे पाहुणे ! "

" हां, तुमची बहीण ! मीं तिच्याविषयीं ऐकलेल आहे; पण तिला पाहिलेलं नाहीं. माझी तिची ओळख करून द्या कीं, त्याही फार सुंदर आहेत ना ? तुम्ही मोठे भाग्यवान् आहांत बुवा ! सुंदर भगिनी आणि सुंदर पत्नी ! " तारेला भेटण्यासाठीं बाहेर जातां जातां त्या संदुकीकडे एक शेवटचा-लोभी आपल्या द्रव्यनिधीकडे टाकतो तसा आशातुर-दृष्टिक्षेप दुर्जनसिंहानें टाकला.

दुर्जनसिंहाला मनुष्यस्वभावाची आणि त्यांतल्या त्यांत स्त्रीस्वभावाची चांगलीच ओळख असणार. कारण तारेची ओळख होतांच त्यानें तिला मुराररावाच्या सुस्वभावाविषयींच्या व शौर्यहुशारी इत्यादिकांच्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या.

"आपण त्यांना पत्र वगैरे पाठवीत असाल ना ?" हंसत हंसत दुर्जनसिंहानें तिला प्रश्न केला.

"छेः, एकही लिहिलें नाहीं अजून. पण आज मुद्दाम पाठवणार आहे हलकारा. दादाच्या लग्नाविषयीं त्यांना कांहींच कळलेलं नाहीं, तें कळविणार त्यांत."

किंचित् विचार करून दुर्जनसिंह यावर म्हणाला, "मग असें करा ना, मलाच त्यांचा पत्ता द्या. मी त्यांना प्रवासाची सविस्तर माहिती कळवून तुमच्याबरोबरच सिरोहीला येण्याचें निमंत्रण करतो."

मुरारराव आपल्याबरोबर येणार, दादाची व त्यांची मैत्री होण्याला सुरेख संधि मिळणार, या कल्पनेनें आनंदून जाऊन तारा म्हणाली, "खरंच आपण कराल असं ? हो, बाई हेंच ठीक होईल. मी नाहीं तर मग कांहींच कळवीत, आपण सारं कसं व्यवस्थित कळवाल, मला नाहीं तसं जमायचं !" तारेनें लगेच मुराररावाचा पत्ता त्याला सांगितला.

पण दुर्जनसिंहाच्या व्यवस्थितपणाला तारेची दृष्ट लागली असणार. कारण त्यानें मुराररावाला कांहीं एक कळविलें नाहीं व विश्वास—अलकच्या विवाहा-संबंधीं मुरारराव पूर्ण अज्ञानात राहिला.

विश्वासरावाकडून या मुलाखतीविषयीं कळताच अलकला सिरोहीला लग्न होणार म्हणून आनंद झाला. पण नंतर दुर्जनसिंह जेव्हां तिला भेटायला आला तेव्हां त्याला ती म्हणाली, "काकाजी, तुम्हाला कांहीं सांगायचं आहे ! मला न आवडण्यासारखं त्यांना तुम्हीं कांहींही सांगितलं नाहींत हा तुमचा मोठे-पणा.—माझ्या मातृभूमींतच माझा विवाह व्हावा हें त्यांनाही पसंत आहे, पण त्याला माझी एक अट आहे."

"कसली अट ? अगदीं थाटामाटानें समारंभ झाला पाहिजे हीच ना ? बघ तर खरी ! अगदीं जुन्या रजपूत रीतीनें सारं होणार. तुझा आणि ताराबाईचा पोषाख अगदीं पूर्वीचा अस्सल रजपूत धर्तीचा बनवणार. असा टोलेजंग समारंभ होणार म्हणतेस कीं वाः !"

" भाईविषयीं माझ्याकडे कुणीं एक अवाक्षरही काढतां कामा नये हीच माझी अट. माझ्या साऱ्या आश्रितांना, साऱ्या नौकरांना तुम्ही स्वतः सांगा कीं, भाईला मी विसरलें नाहीं. आणखी तें सूडाचें गाणं जर कुणा माझ्यासमोर म्हटल तर—तर काकाजी मला काय वाटेल ! माझ्या हृदयाच्या कशा चिंधड्या होतील, त्याची तुम्हांला कल्पना आहे ना ! "

" ठीक. या दोन्ही गोष्टींबद्दल मी काळजी घेईन."

" आतां मला बरं वाटलं. काकाजी, मीं माझं जातगोत सोडून मराठा होण्याच्या आधीं पुन्हा एकदां सिरोहीला जावं, पहाडाची ती रम्य शोभा पहावी, बाळपणींच्या मैत्रिणींशीं पुन्हा एकवार बोलावं असं मला फार वाटत होतं. आणि काकाजी, ती माझी उत्कट इच्छा केवळ तुमच्यामुळं पुरी होणार ! "

अलकचा आपल्यावरील विश्वास आणि त्यामुळें वाटत असलेला आनंद पाहून आपल्या कृत्याचा दुर्जनसिंहाला क्षणभर—एकच क्षण—पस्तावा झाला. पण दुसऱ्या दिवशीं पहांटे तो, दयाळ व अलक जाणार असल्यामुळे अलकनें अत्यंत प्रेमानें लाजत लाजत जेव्हां विश्वासरावाचा निरोप घेतला व तारेच्या खांद्यावर असलेल्या अलकच्या नाजुक हाताला जेव्हां विश्वासरावानें हळूच स्पर्श केला तेव्हां दुर्जनसिंहाच्या मनातील क्षणिक पश्चात्तापाची जागा द्वेषानें व रागानें पटकाविली. व हें कोणाला दिसू नये म्हणून तो चट्दिशीं तिकडून गेला.

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं पहांटे दुर्जनसिंह, अलक व दयाळ सिरोहीला रवाना झालीं व त्याच्या दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं विश्वासराव आणि तारा निघालीं. मुरारराव वेळेवर न आल्याबद्दल तारा रागांत होती. एवढा लांबचा प्रवास आपल्याला सोसवणार नाहीं, म्हणून आत्याबाई-थोरल्या व धाकट्याही व हिराविषयींची जबाबदारी आपल्या अंगावर घेऊन तिला सिरोहीला न्यावयाला तारा तयार न झाल्यामुळें त्यांच्यापैकीं कोणीच गेलें नाहीं.

विश्वासराव व तारा गेल्याच्या दुसऱ्या दिवसाची गोष्ट. संध्याकाळ बरीच झाली होती. अशा वेळीं मुरारराव घाईघाईनें सातारच्यास आत्याबाईच्या वाड्यांत आले. आत्याबाई घरींच होत्या. त्या मुराररावाला पहातांच म्हणाल्या, " हें हो काय असं तुमचं ! काल नाहीं ते आलांत ! तारा भारी रागावली तुमच्यावर ! "

तारेचें नांव ऐकतांच मुराररावाचा शीण बराचसा हरला. आत्याबाई आपल्या

ला आचरट म्हणणार नाहींत अशा बेतानें हंसत मुरारराव म्हणाले, "इकडे बोलवा तिला, म्हणजे आतां घालवतों मी तिचा राग !"

"वा:, आतां तिचा राग घालवायचा म्हणजे आणखी निदान दहाबारा दिवस तरी धीर धरला पाहिजे. कारण तारा व विश्वास कालच साताऱ्याहून निघालीं."

"पुण्याला गेलीं ना ? मग मला कशीं वाटेंत भेटलीं नाहींत ?"

"छे:, सिरोहीला !"

इतक्या वर्षांत मुराररावाला एवढा विलक्षण धक्का कधींच बसलेला नव्हता.

"काय सिरोहीला ? आणि तें कशासाठीं ?" त्यानें मोठ्यानें ओरडून विचारलें.

"काय ग बाई तरी प्रश्न ! अहो विश्वासनं त्या अलकबरोबर लग्न ना ठरवलंय ! लग्न सिरोहीला तिच्या वाड्यांत व्हायचंय म्हणून हीं दोघं काल गेलीं;–नि अलक, ते दुर्जनसिंह आणि तो म्हातारा दयाळ परवा गेली, पण मुरारराव, तुम्हांला एवढ आश्चर्य का वाटलं ?"

"का म्हणजे ? आत्याबाई, मला कसली सिद्धि वगैरे मिळाली आहे असं तर नाहीं ना तुम्हांला वाटत ? मी होतों पुण्यास, मग मला साताऱ्याची बातमी कशी लागणार ?"

"कां लागूं नये ? दुर्जनसिंहांनीं स्वतः तारेकडून तुमचा पत्ता मागून घेतला, ताराच तुम्हांला कळवणार होती; पण ते म्हणाले, कीं मुरारराव आपले मित्र आहेत, तेव्हां मीच कळवीन."

"काल संध्याकाळीं गेलीं ! म्हणजे आतां एक दिवस तर मोडलाच आणि आतां सारी व्यवस्था करून निघायचं म्हणजे उद्यां पहाटेशिवाय शक्य नाहीं." एवढे बोलून आत्याबाईचा निरोपही न घेतां मुरारराव तिकडून निघाले. चालण्याच्या गतीबरोबर त्यांच्या मेंदूची गति वाढूं लागली. त्यांना समजलेल्या बातमीचें खरें स्वरूप आतां त्यांच्या डोक्यांत येऊं लागलें. हरहर ! आपल्या लाडक्या भाईला ज्यानें मारलें त्यालाच अलक अजाणतेपणीं वरणार तर ! ज्याच्या गळ्यावर सुरी ठेवण्यासाठीं तिनें एवढी धडपड केली, त्याच्याच गळ्यांत ती आतां आपला बाहुपाश घालणार, आणि ज्याचा प्राण घेण्याची तिनें प्रतिज्ञा केली होती त्याच्याच स्वाधीन आपल्या प्राणाची ठेव करणार ! हा काय योगायोग, कीं ऋणानुबंध ! किती विचित्र विधिघटना ही ! मुराररावाला आतां दुर्जनसिंहाची सारी कारवाई कळली. त्याच्या त्या दुष्ट कृत्यांत आपण काहीं तरी

अडथळा आणूं अशी भीति वाटल्यामुळें त्यानें तारेच्या डोळ्यांत धूळ फेंकली, व तिनें आपल्याला कांहीं कळवूं नये अशी व्यवस्था केली.

पुणें मुक्कामीं दुर्जनसिंहाबरोबर मुरारवाच्या झालेल्या एका मुलाखतींतील दुर्जनसिंहाचे शब्द त्याच्या कानांत जणुं घुमूं लागले. "कांहीं तरी हुलकावणी दाखवून, कोणत्या तरी आमिषानं, विजयाच्या खुन्याला जर सिरोहीला भुलवून नेलं आणि तिकडं अलकनं त्याचं डोकं उडवलं तर अलकचे जातभाई तिला डोक्यावर घेऊन नाचवतील!" हे शब्द आठवतांच मुरारवाच्या डोक्यांत अगदीं चक्क प्रकाश पडला.

"अलकवर असलेल्या विश्वासरावाच्या प्रेमाची दोरी खेंचून दुर्जनसिंहानें विश्वासरावाला सिरोहीला पळवलें! छान! आतां सिरोहींत विश्वासच्या खुनाचा जाब देणार कोणाला आणि घेणार कोण? रजपुतांचें राज्य तें! अलकचें जर खरो-खरीच विश्वासवर प्रेम असेल तर दुर्जनसिंह खात्रीनेंच त्याला पाण्यांत पहात असणार! बरें! जर अलकचें विश्वासवर प्रेम नसेल तर—तर काय, त्याचा खून करायला तिला कांहींच क्षिति वाटणार नाहीं. कारण सूड ही एक पवित्र चीज अशी ठाम समजूत असलेल्या वातावरणांत ती वाढलेली, तेव्हां अलकचें विश्वासरावावर प्रेम असो वा नसो, हें लग्न होतां कामा नये! तारेच्या मदतीनं तें मोडलंच पाहिजे.—तारा! अरे देवा! विश्वासरावाचा खून करण्यासाठींच जर दुर्जनसिंहानें त्याला सिरोहीला नेलं आहे तर मग आपल्या लाडक्या तारेची काय स्थिति होणार? तारा शूर व तेजस्वी तरुणी आहे ह्याचा मुरारवाला चांगलाच अनुभव आलेला होता. तेव्हां ती कांहीं आपल्या डोळ्यां-समोर आपल्या लाडक्या दादाचा खून पडूं देणार नाहीं. प्रसंगच आला तर तसं पहाण्यापेक्षां ती आधीं आपला प्राण देईल! पण तिनें तो देण्याची वाटही न पाहतां जर तिचाही खून झाला तर!" मुरारवाचा टाळा सुकला व जीभ कोरडी पडली. तारेचा तो लाडका, रुसका चेहरा पुन्हा कधीं दिसेल तरी कीं नाहीं अशी भयंकर शंका मनांत आल्यामुळें मुरारवाला कांहीं सुचेना. तावडतोब एका हलकाऱ्याबरोबर तारेच्या नांवें सिरोहीच्या रस्त्यावर त्यांनीं खालील निरोप पाठविला,

"काय वाटेल तें करून मी तिकडे येईपर्यंत तुझ्या दादाचें लग्न होऊं देऊं नको. साताऱ्याला मीं वेळेवर न येण्याचें कारण, म्हणजे दुर्जनसिंहानें मला ह्या लग्नाची वार्ताही लागूं दिली नाहीं. अगदींच नाइलाज झाला तर

विश्वासरावाला ह्या कागद दाखीव आणि तसेंच कांहीं कारण असल्याशिवाय मी लग्नविधि पुढें ढकलण्याला सांगणार नाहीं अशी त्यांची खात्री कर."

आपल्या सहीचा हा निरोप पोंचतांच तारा कांहीं तरी धडपड करील असें वाटून मुराररावाचें मन कांहींसें स्वस्थ झालें.

दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहांटे चितोडला विजयाचा मित्र किसनसिंह राठोड ह्याच्याकडे मुरारराव रवाना झाला.

## प्रकरण एकोणिसावें

# "मूडाचें माहेरघर"

"अहाहा ! किती रम्य प्रांत हा तुमचा ! आणि हा अबूचा पहाड ना ? किती वेळां नांव ऐकलं होतं ! पण आज बघून जें कांहीं वाटतं तें सांगताच येत नाहीं. ह्या पहाडाशीं निगडित किती तरी आठवणी असतील नाहीं ? हाच देखावा कित्येकांच्या मनांत गोड आठवणी उत्पन्न करीत असेल, तर कित्येकांना रडवीत असेल ! अबूचा पहाड ! नांवच कसं कुतूहलजनक आहे !" तारेला त्या रम्य देखाव्यावरून आपले डोळे काढवेनात; आणि खरोखरीच सिरोही प्रांतांतील हा देखावा तसाच मनोहर होता. राजपुताना व गुजराथ ह्यांच्या सरहद्दीवरील तो प्रांत असल्यामुळें दोहोंकडील सृष्टिसौंदर्यावर त्याचा सारखाच हक्क होता. गुजराथकडील निसर्गसुंदरी मुग्ध प्रमदेप्रमाणे दिसत होती तर राजपुतान्याकडील चंचल युवती-प्रमाणें भासत होती गुजराथी सृष्टिसौंदर्य म्हणजे नदीचा संथ प्रवाह तर रजपूत सृष्टिसौंदर्य म्हणजे खळखळणारा ओढा ! गुजराथची सृष्टिसुंदरी जणुं आपल्या शांत, पण मधुर कृतीकडे पहाणाराचें लक्ष वेधीत होती; तर रजपूत सुंदरी आपल्या तालबद्ध नृत्याकडे तें लगेच खेंचून आणीत होती ! तारेला त्या दोन्ही सौंदर्यांत असा फरक भासला. गुजराथी वातावरण शांत आणि प्रौढ; तर रजपूत वातावरण चपल आणि बालिश ! तरी पण दोन्हींही तिला सारखींच अपूर्व व क्षणाक्षणीं नावीन्य धारण करणारीं वाटलीं. तारा सृष्टिसौंदर्याची फार चाहती व मर्मज्ञ होती. त्यामुळें तो रमणीय देखावा पाहून तिचा प्रवासाचा शीण तेव्हांच हरपला.

शेवटीं अलकनें तिला हलवीत म्हटलें, "ताराताई, काय नादिष्टपणा हा ! घोड्यावरून उतरल्यापासून इकडेच उभी आहेस ! वाड्यांत नाहीं का यायचं ?"

दुर्जनसिंह ह्यावर हंसून म्हणाला, "खरंच, अलक तूं ह्या दोघांना वाड्यांत घेऊन जा. माझं थोडं काम आहे तेवढं आटोपून मी येतोंच."

अलकबरोबर तीं भावंडें आंत जातांच दुर्जनसिंह जरा अंतरावर उभ्या असलेल्या एका इसमाजवळ गेला व त्याला हळूच म्हणाला, "काय रे, माझ्या अदमासाप्रमाणें कांहीं झालें का निष्पन्न ? ताराबाई शिर्के किंवा विश्वासराव शिर्के ह्यांच्या नांवावर वाटेंत कांहीं थैली वगैरे आली काय ?"

" ही एवढी एक ताराबाईच्या नांवावर आली आहे."

" कुठून आला होता तो हलकारा ? "

" साताऱ्याहून आला होता. मुरारराव माने ह्यांनीं आपल्याला पाठविलं म्हणून म्हणाला तो. त्या वेळीं सरदारसाहेब आणि ताराबाई विश्रांति घेत होतीं. त्यामुळें त्यांना कांहीं एक न कळतां मला त्याच्याजवळून ही पत्राची थैली सहज घेतां आली."

" शाबास, कामगिरी छान बजावलीस ! "

परंतु खरं पाहिलं असतां, त्या नोकरापेक्षां दुर्जनसिंहानेंच फार छान कामगिरी बजावली होती.

वाटेंत ठिकठिकाणीं मुक्कामाच्या जागीं नव्या दमाचे घोडे तयार ठेवलेले होते. त्यामुळे विशेष त्रास न होतां विश्वासराव व तारा सिरोहीला पोहोंचलीं व त्यांना दुर्जनसिंहाचे फारच उपकार वाटले. काय वाटेल तें करून मुरारराव तारेला निरोप पाठविणार अशी निघतांनाच दुर्जनसिंहाला अटकळ होती व म्हणूनच त्यानें त्याचीही अशी बेमालूम व्यवस्था केली होती.

मुराररावानें तारेला पाठविलेला संदेश वाचून दुर्जनसिंह थक्कच झाला " इतक्या दक्षतेनें आपण साऱ्या चौकशा केल्या व माग लावला आणि मुराररावालाही तोच शोध लागला. असो. आतां काय त्याचं ! आपण तर त्याला सोळा आणे चकवलं. आतां तो इकडे आलाच तरी ह्या विवाहांत त्याला कांहीं ढवळाढवळ करतां येणार नाहीं. वरातीमागून घोडंच होणार तें ! चला, एकदांचे गंगेंत घोडे न्हाले ! "

विश्वासराव व तारा सिरोहीला पोहोंचल्यानंतर थोड्या वेळानें दयाळसिंहानें त्यांचें सामान आल्याची वर्दी दिली. दुर्जनसिंहानें त्याला तशी सूचना दिली होती कीं काय कोण जाणे ! पण दयाळ त्या विवक्षित जुन्यापुराण्या संदुकीची—बाह्यतः कारणाशिवाय–काळजी घेत होता.

तारेला अलकची मातृभूमि अतिशयच आवडली; पण तिचें निवासस्थान मात्र तिला अगदींच आवडलें नाहीं. अशा स्वतंत्र वातावरणाला न शोभण्यासारखें म्हणजे हुबेहूब एखाद्या कैदखान्यासारखें त्याचें बाह्यस्वरूप तिला वाटलें, आणि तिनें तसें उघड बोलूनही दाखविलें. तेव्हां दुर्जनसिंह म्हणाला, " ह्याचा मूळ मालक एक मोठा रजपूत सरदार होता. कांहीं कौटुंबिक कलहामुळें दुसऱ्या एका सरदारानें ह्या सरदाराचा सूड घेण्याची प्रतिज्ञा केली होती; आणि म्हणून ह्या वाड्याच्या–

कैदखान्याच्या म्हणा हवें तर—मालकानें सतत पंधरा वर्षे ह्या वाड्यांत आपल्याला कोंडून घेतलं. पंधरा वर्षांनंतर तो एक दिवस बाहेर पडला आणि घटकाभरांतच याचें शव इकडे परत आणलं. कडवे रजपूत आपली प्रतिज्ञा अशी पाळतात !" एवढें बोलून त्यानें अलककडे पाहिलें; पण ती खालीं मान घालून बसली होती.

पहिला आनंद कांहींसा ओसरल्यावर तारेला मुराररावाची आठवण येऊं लागली. ती म्हणाली, " काकाजी, तुम्हीं निरोप पाठविला असून ते वेळेवर कसे आले नाहींत ? आतां आले तरी काय उपयोग ? फार उशिरां पोंचतील !"

" खरंच फार उशिरां पोंचतील ते ! काय उपयोग ? " दुर्जनसिंह उत्तरला.

" अहो ताईसाहेब, कां विनाकारण हळहळतां ? मुरारराव असतील त्यांच्या लग्नाच्या गडबडींत आणि तूं उगीचच इकडे वाट बघतेस ! खरंच काकाजी, इकडला समारंभ आटोपतांच तुम्हीही आमच्याबरोबर पुण्याला आलं पाहिजे. आमच्या ताराताईचं आणखी सवा दीड महिन्यानं लग्न आहे. आतां जसा मी तुमचा पाहुणा; तसे तेव्हा तुम्ही माझे पाहुणे बरं का ? तुमची रजपूत विवाहपद्धति आम्ही पाहणार—आमची मराठी विवाहपद्धति तुम्ही पहा. ताराताई, एवढं मात्र तुला कबूल केलंच पाहिजे, कीं ह्या इकडल्या विवाहातील वधू पुण्यास पुढं होणाऱ्या विवाहांतल्या वधूपेक्षा जास्ती सुंदर आहे ! काय खरं ना मी म्हणतों तें ? " हा शेवटला प्रश्न विश्वासरावानें अलकला उद्देशून केला, आणि तो करतांना त्यानें अशा कांहीं प्रेमळ व गर्वभरित नजरेनें तिच्याकडे पाहिलें, कीं आपला सारा विषण्णपणा, व दुर्जनसिंहाच्या टोमण्यांनीं उत्पन्न झालेली अस्वस्थता विसरून अलकनें नाजूक रीतीनें एक गोड मुरका मारला, आणि हें पाहून दुर्जनसिंहाच्या कपाळाला आंठ्या पडल्या. विश्वासराव तारेशीं कांहीं बोलण्यांत गढला आहे असें पाहून तो अलकच्या जवळ जाऊन म्हणाला, " अलक, कांहीं काळजी करूं नकोस. विजयाचा खुनी जिवंत आहे हें तूं विसरलीस असा, किंवा अशा अर्थाचा आरोप तुझ्यावर, प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनं करून तुला कोणीही हिणवणार नाहीं अशी मीं चोख व्यवस्था केली आहे. अगदीं निश्चिंत रहा." आणि हें ऐकून अलकनें समाधान वाटून एक सुस्कारा टाकला.

तारा अलकच्या वाड्यांत राहणार असून दुर्जनसिंह विश्वासरावाला आपल्या जरा अंतरावर असलेल्या राहत्या वाड्यांत घेऊन जाणार होता; म्हणून त्यानें दयाळला जवळ बोलावून हळूच म्हटलें, " दयाळ, सरदारसाहेबांचं सर्व सामान

माझ्या वाड्यात पोंचतं करायला लाव. मात्र ती मोडकी संदूक ह्याच वाड्यांतील पाठच्या खोलींत ठेव व बाहेरून कुलूप लाव.'' नंतर तो मोठ्यानें विश्वासरावाला म्हणाला, "हं, चला आतां माझ्या वाड्यांत. उद्यां सकाळीं आमच्या रिवाजाप्रमाणं मोठ्या थाटानं तुम्हीं इकडे वधूगृहीं यावयाचं. मात्र तों-पर्यंत तुम्हीं व अलकनें एकमेकांच्या दृष्टीला पडतां कामा नये. बरं तर अलक, जाऊं आम्ही ! जातों हं.''

अलक व तारा आतां वाड्याच्या मुख्य दरवाजानें आंत शिरल्या. अलकच्या आश्रित मंडळींनीं व नौकरमाणसांनीं आदरपूर्वक त्याचे स्वागत केलें खरें; पण तारेला त्यात आस्था कशी ती वाटली नाहीं इतक्या दिवसांनीं आपल्या मातृभूमीला परत आलेल्या आपल्या तरुण, सुंदर धनिणीबद्दल त्यांनीं तारेच्या मते ह्याहून जास्ती प्रेम दाखवायला हवें होतें. सर्व माणसांनीं स्त्री पुरुष सरसकट नखशिखान्त लाल रंगाचे कपडे घातले होते हें, व अलकनें तें पहातांच आपले थरथर कांपणारे ओंठ दाबून धरले हेंही तारेच्या लक्षांत आले; पण तिने ह्या दोन्ही गोष्टींना विशेष महत्त्व दिलें नाहीं. मुराररावानें आपल्या पहिल्या भेटीच्या वेळीं पाहिलेली ती अलकची चित्रित प्रतिमा मधल्या दालनांत होती. ती पाहतांच तारा आनंदानें ओरडली, "अगबाई, तुझेंच कीं ग हें चित्र ! उद्यां विवाहाच्या वेळीं असलाच पोषाख करणार ना तूं ! काय ! 'मार्गप्रतीक्षा' ! किती सार्थ नांव तरी ! माझ्या दादाची मार्गप्रतीक्षा !''

"नाहीं-नाहीं. ताराताई, माझ्या लाडक्या भाईची मार्गप्रतीक्षा ! हाय, हें चित्र इकडं आहे हें मी विसरलेच होतें. ताई, नको-नको पाहूस तिकड ! मला तें सहन होत नाहीं !'' आणि अलकनें ताबडतोब त्या चित्रावर पडदा ओढला व अगदीं केविलवाण्या नजरेनें तारेकडे पहात ती म्हणाली, "तुमच्या पुण्याला गेल्यावर, त्याची आठवण थोडीशी तरी अंधुक झाली म्हणजे एखादे दिवशीं माझ्या भाईची करुण कहाणी मी तुला सांगेन. आतां मात्र मला कांहीं विचारूं नकोस. ताई, दमली असशील ना तूं ! चल, तुला मी तुझी खोली दाखवितें, मलाही विश्रांतीची जरूर भासते आहे. नाहींतर उद्यां अगदीं म्हाताऱ्यासारखी दिसेन मी !''

तारेला तिच्या खोलींत पोंचवून अलक आपल्या खोलींत गेली. तिची बाळ-पणांतली दाई व तिचा आश्रित शंभुसिंह याची बायको गौरी आपण येणार हें ठाऊक असूनसुद्धां आपल्याला भेटायला आली नाहीं हा तिला मोठा अपमान वाटला. तिनें

दयाळसिंहाला बोलावून आणून त्याचा जाब विचारला व तिला ताबडतोब पाठवून देण्याचा हुकूम केला. तेव्हां मृदु निर्भर्त्सनेच्या स्वरांत दयाळ म्हणाला, " माझा कांहीं इलाज नाहीं. गौरी येत नाहीं म्हणते. एका मराठयानें विजयाचा खून केला असून त्याच्याच जातभाईबरोबर तूं लग्न करणार हें तिला कळलं आणि दुर्जनसिंहजीचा तर कडक हुकूम आहे कीं, ह्याविषयीं तुझ्याशीं कांहीं बोलायचं नाहीं; म्हणून ती पहाडांत निघून गेली आहे. दुसऱ्या एखाद्या बाईला पाठवूं काय ! "

" अं ह ज्यांनीं माझ्याशीं कृतघ्नपणा केला, त्याची मला गरज नाहीं. मला गौरीचीही जरूरी नाहीं आणि दुसऱ्या एखाद्या बाईची तर मुळींच नाहीं." अलका रागाच्या आवेशांत येवढे बोलली खरी, पण दयाळ निघून जातांच तिचा तो आवेश ओसरला. मनःक्षोभ अनावर होऊन तिच्या डोळ्यांतून अश्रु गळूं लागले. " अरेरे ! लहानपणापासून मला अंगाखांद्यावर खेळविणारी, मोठया प्रेमानं माझा हरएक हट्ट पुरविणारी गौरी, माझ्या लग्नदिवशीं मला आशीर्वाद देणार नाहीं ? माझी प्रतिज्ञा मीं विसरले म्हणून ती माझ्यापासून दूर पहाडांत पळून गेली ! माझे सारे जातभाई माझा असाच धिक्कार करणार काय ? मी, चौहानकुमारी, माझी प्रतिज्ञा मी विसरलें म्हणून ते मला शाप देत असतील. श्रेष्ठ कुळातली चौहानकुमारी कसली ही ! ही अस्सल रजपूतसुद्धां नव्हे असं ते मला हिणवतील ! " विचाराविचारानें अलकच्या डोक्याच्या जणु चिंधडया उडूं लागल्या सर्व रात्र तिनें अशाच रीतीने, मध्येंच हसून, मध्येंच रडून, अशी काढली.

## प्रकरण विसावें

# " आज मी कडवी रजपूतानी आहें "

दुसऱ्या दिवशीं पहांटे अलकनें तारेला झोपेंतून उठवलें. जागी होतांच तारा अलककडे पाहून चकितच झाली कारण आपलें स्नान वगैरे आटोपून अलकनें प्राचीन रजपूत पद्धतीचा सुंदर पोषाक केला होता. ती नाजुक ओढणी अलकच्या शरीरकांतीला शोभवीत होती, कीं अलकचा नाजुक देह त्या ओढणीची शोभा वाढवीत होता, असा तारेला प्रश्न पडला अलकच्या काळ्याभोर केसांची रुंद वेणी पाठीवर रुळत होती. रात्रीं झोप चांगली न लागल्यानें तिची चर्या कांहींशी फिकट दिसली, तरी ती पूर्ण आनंदी व संतुष्ट दिसत होती तिचे काळे डोळे आज फारच काळे म्हणजे तिच्या नसल्याच काळ्या केशपाशाशीं स्पर्धा करणारे दिसत होते. तारेला असें झालें कीं, आज अलकच्या त्या सुंदर कुरळ्या केसांकडे पाहू, कीं तिच्या त्या सुंदर पोषाखांत शोभणाऱ्या नाजुक शरीरयष्टीकडे पाहू, कीं पायांतील लंगराच्या तालावर नाचत नाचत चालणाऱ्या, आळिता न लावतांही लालबुंद दिसणाऱ्या तिच्या त्या गोऱ्या, नाजुक पावलांकडे पाहूं ! तारेला आपण व आपला पोषाख मनापासून आवडला हें ओळखून अलक चेष्टेनें म्हणाली, " काय ताराबाई, आवडला नाहीं वाटतं माझा पोषाक ! "

डोळे विस्फारित करून तारा म्हणाली, " आवडला नाहीं ! अलक, किती ग सुंदर हा पोषाख ! अग, मी दादाचा विचार करीत होतें हो दादाला कितई भारीच आवडेल हा, आणि, हें बघ अलक, तुझ्या ह्या पोषाखाहून आणि ह्या स्वर्गीय सौंदर्याहून दादाचें नांव काढताच मारलेला मुरका तर भारी भारीच गोड होता ! "

आणि खरोखरच विश्वासरावचें नांव निघतांच अलक लाजली. आपला लज्जा-नम्र चेहरा लपवीत अलक म्हणाली, " हं, आतां ऊठ गडे; तुलाही माझ्याचसारखा पोषाख करायचा आहे. संवय नसल्यानें तुला वेळ लागेल जरा ! "

" खरंच कीं ग. पण तूं कांहीं म्हण, मला तो इतकासा शोभायचा नाहीं. अलक, तुझा बांधाच असा आहे कीं, तुला कांहींही शोभेल. अलक, माझी वहिनी झाल्यावर माझ्यासारखं चोळीलुगडं ल्यावं लागेल तुला; आणि तुला तेंसुद्धां सुरेख शोभेल !

" अगदीं आवडीनें करीन मी तसा पेहेराव. पण लौकर आटोप; आतां मी बाहेर जातें. काकाजी आतां येतील. ते आज कन्यादान करणार आहेत."

दुर्जनसिंह एकटाच अलकला भेटावयास आला. त्याच्या मागून अलकचे बरेचसे जातिबंधु व भगिनी तिच्या वाड्यांत आले. त्या सर्वांच्या वतीनें एक रजपूत तरुण अलकशीं बोलत होता. हा तरुण विजयाचा संवगडी होता व अलकचा जन्माचा संवगडी होण्याची त्याची आकांक्षा होती. ती आकांक्षा आतां निष्फळ होणार असें कळतांच तो अगदीं बेफाम झाला होता. बोलतांना पहिल्यांदा त्याचा स्वर किंचित् नम्र होता; पण नंतर नंतर तो चढू लागला. प्रारंभीं आपणां सर्वांना सोडून न जाण्याबद्दल तो अलकची विनति करीत होता. तें ऐकून दुर्जनसिंहानें तिरस्कारानें आपले डोळे बारीक केले, पण नंतर जेव्हां तो तरुण अलकला दोषी ठरवून तिच्या अपराधाचें माप तिच्या पदरांत घालूं लागला, तेव्हां दुर्जनसिंहाचा चेहरा विजयानंदानें खुलला बरोबर ह्याच वेळीं तारा त्या दालनांत आली. हें सारें संभाषण सिरोही प्रांतांतील प्रचलित रजपूत भाषेंत चालल्यामुळे तारेला त्यांतील एक अक्षरही कळलें नाहीं पण त्याच्या भाषणाचा एकंदर श्रोतृवर्गावर झालेला परिणाम पाहून तारा चकित झाली. अलकची चर्या तर क्षणोक्षणीं बदलत होती मध्येंच राग, मध्येंच शरम, थोडासा द्वेष, भीति असे किती तरी विकार तिच्या चर्येवर येत जात होते. पण तिकडे लक्षही न देतां तो तरुण पुढें बोलतच होता. तारेनें आंत पाऊल टाकलें त्याच वेळीं त्यानें पुढे होऊन अलकच्या नजरेला नजर भिडवीत म्हटलें, " कुमारी, मीं असं ऐकलं कीं, तुम्हीं आपली पवित्र प्रतिज्ञा विसरलां; पण त्यावर माझा विश्वास बसत नाहीं ! आणि कसा बसेल ? कारण विजयाचा आत्मा जणु मला ओरडून सांगतो आहे कीं, हे खोटं आहे. माझ्या खुन्याचा जास्ती सुलभ रीतीनं सूड घेतां यावा म्हणूनच केवळ कुमारी एका मराठ्याबरोबर विवाह करीत आहे. तेव्हां कुमारी, सांगा, हें खरं आहे ना ! कबूल करा ! "

अलकची चर्या पांढरी फटफटीत पडली होती. ती काय उत्तर देणार ! घाबरी-घुबरी होऊन तारा दुर्जनसिंहाला म्हणाली,

" त्यानं काय सांगितलं हो अलकला ? काय बोलला तो ? "

" कांहीं विशेष नाहीं. आमची प्राचीन पद्धति आहे ती ! हे सर्व लोक आज अलकचा निरोप घेत आहेत ! "

" अस्सं ! पण मग अलकची चर्या अशी निस्तेज कां दिसते ?"

" म्हणजे असं पहा, मुलगी कितीही मोठी झाली तरी आपलं गणगोत सोडून सासरीं जातांना तिला वाईट हें वाटणारच. जरी अलकचा हा प्रीतिविवाह आहे तरी आपल्या मातृभूमीचा विरह तिला अंशत: तरी जाणवणारच !"

" असं म्हणतां होय ! मग बरोबर." तारेचे इतक्या लवकर समाधान झालेलें पाहून खूष होऊन दुर्जनसिंह पलीकडे गेला.

अलकच्या मनांत विलक्षण खळबळ उडून राहिली होती. दुर्जनसिंहानें तें ओळखलें व आपला विचारी प्रेमळपणा शाबीत करण्यासाठीं त्याने त्या सर्व मंडळींना लगेच रजा दिली. पण राहून राहून अलकच्या मनांत येई कीं, " मी सूड उगविण्यासाठीं हा विवाह जमवला असं हे समजतात !"

अशा रीतीनें सकाळचा वेळ गेला व दिवामुहूर्तावर विधिपूर्वक अलककुमारी विश्वासराव शिर्क्यांची पत्नी झाली. विश्वासराव आज फारच सुंदर दिसत होता. त्याचा तो मराठा धर्तीचा पांढराशुभ्र पोषाख सरसकट लाल पेहराव केलेल्या त्या रजपूतसमूहांत अगदीं उठून दिसत होता. जेव्हां जेव्हां त्याच्याकडे दृष्टि जाई तेव्हां तेव्हां अलकचें हृदय प्रेमानें आणि अभिमानानें उचंबळून येई.

म्हातारा दयाळसिंह एका कोपऱ्यात डोळ्यांतून पाणी काढीत बसला होता. तो दुर्जनसिंहाला हांक मारून म्हणाला, " ती आतां आपल्याला कायमची सोडून जाणार ! ती आतां रजपूत कसली ! मराठा म्हणायची आतां !"

" हं. इतकं श्रेष्ठ चौहान हें आडनाव तिनें टाकलं. तिला आतां बाईसाहेब म्हटलं पाहिजे, कारण ती आतां सरदारपत्नी झाली ना ! हें बघ दयाळ, सारी गडबड मोडल्यावर सूर्य मावळण्याच्या आंत तूं माझ्याकडे ये, तुला एक काम सांगणार आहें. आज रात्रीं नव्या दांपत्याची शय्या फुलांनीं तूं शृंगार हं !"

दयाळनें अनिच्छेनें मान हालविली.

दुर्जनसिंह एकसारखा कांहीं ना कांहीं कामांत होता.त्यामुळें सर्व विधि आटोपल्यावर विश्वासराव, अलक व तारा एकत्र बोलत बसलीं. रजपूत रिवाजाप्रमाणें विश्वासराव व अलक ह्यांनीं लाजलें पाहिजे होतें, पण अलकला रागावणारें वडील माणूस घरांत नसल्यामुळें व ती वयानेंही मोठी असल्यामुळे तिनें त्याप्रमाणें वर्तन केलें नाहीं. फार काय, पण आपण इतरांहून कांहीं वेगळं करीत आहों हें लक्षांतही न येतां

ती मोकळ्या मनानें विश्वासराव व तारा ह्यांच्याबरोबर नेहमींप्रमाणें गप्पा मारीत होती.

" दादा, ही रजपूत लग्नपद्धति फार प्रशांत आहे नाहीं ? "

" हो, कां ? पण तारे 'तुझ्या स्वारीला ' पसंत पडेल का ही ? "

" तुझी आपली सदान्कदा थट्टा ! मीं असं म्हटलं वाटतं ! बघ ग वहिनी हा कसं करतो तें ! "

तारेच्या 'वहिनी' ह्या संबोधनानें अलक लाजली व विषयांतर करण्याच्या उद्देशानें विश्वासरावाकडे एक चोरून कटाक्ष टाकीत म्हणाली, " काकाजी आतां आले होते. त्यांनीं आठवण केली मला, म्हणून विचारतें, एक विनंति आहे आपल्याकडे. मान्य होईल ना ? "

तारेची आपल्याकडे पाठ आहे ह्या संधीचा फायदा घेऊन विश्वासरावानें अगदीं नाजुकपणें अलकच्या डोक्यावरील ओढणीचा पदर खांद्यावर टाकला, व तिच्या केंसांच्या कुरळ्या बटा आपल्या बोटाभोंवतीं गुंडाळीत तो हलकेंच तिच्या कानांत पुटपुटला, " आज्ञा करावी राणीसरकार ! "

बरोबर त्याच क्षणीं दुर्जनसिंह आंत आला विश्वासरावाचे शब्द त्यानें ऐकले नाहींत. पण विश्वासरावाचा चोरटा प्रेमस्पर्श व त्या स्पर्शानें अलकची प्रेमलज्जा-रंजित मुद्रा हीं त्याच्या काकदृष्टींतून सुटलीं नाहींत. " माझ्यासमोर प्रेमसंवाद करितात नाहीं काय ? " असें दांतओंठ खाऊन पुटपुटत तो मोठ्यानें खांकरला. त्याबरोबर विश्वासरावानें आपला हात चट्दिशीं खालीं केला व अगदीं निर्विकार मुद्रा करून त्यानें प्रश्नार्थक भिवया चढवल्या. अलक समजली व आपले गोंधळलेले मनोविकार शक्य तितके सांवरून ती म्हणाली, " हें पहा, काम म्हणजे असं कीं, आतां घोड्यावरून काकाजींच्या वाड्यांत जायचं नि तिकडल्या साऱ्या नोकर-माणसांना बिदागी म्हणून ह्या थैलींतलीं नाणीं वांटायचीं ! "

" अच्छा ! उद्यां सकाळीं जाऊं."

" उद्यां ! आजच गेलं तर जास्ती योग्य होईल. आजच्या दिवसाच्या स्मृति-प्रीत्यर्थ द्यायचं ना ! मग आजच द्यावं. माझ्याऐवजीं आपण गेलांत म्हणजे आपण दोघें किती एकजीव आहोंत तें त्यांना कळेल !" हें शेवटलें वाक्य अलक इतकं हळू बोलली, कीं तें विश्वासरावालाच तेवढें ऐकूं आलें. व त्यांतील गोड अर्थानें त्याची कुरकूर लगेच मिटून त्यानें संमतिदर्शक मान हालविली.

"आपल्या आनंदाचा त्यांनाही थोडा वांटा मिळेल. आपण आतां निघालों म्हणजे सूर्यास्त झाल्यावर अर्ध्या घटकेच्या आंत परत याल." असें हंसत बोलून अलकनें नाण्यांची थैली विश्वासरावाच्या हातांत दिली; पण ती घेतांना विश्वासरावानें वाजवीपेक्षां जास्ती वेळ तिचा हात आपल्या हातांत धरला अशी दुर्जनसिंहाची खात्री झाली.

थोडयाच वेळांत विश्वासराव घोड्यावरून दुर्जनसिंहाच्या वाडयाकडे दौडत गेला. त्याला जातांना पाहून दुर्जनसिंह स्वतःशीं पुटपुटला, "पोरा, तूं लहान असलास तरी तुझं विष फार जालिम आहे! अगदीं माझ्या काळजाचाच चावा घेतला आहेस मग मी तुझी कीं गय करूं?" नंतर तो मोठयानें अलकला म्हणाला, "अलक, सकाळीं आपल्या तऱ्हेचे ते सर्व धार्मिक विधी व एकजात तो रजपूत पोषाख पाहून तुला काय वाटलं? तुझ्या बाळपणींच्या ह्या वातावरणांत आजचा दिवस गेला त्यामुळें तुला कसं वाटलं?"

"काय वाटलं, कसं वाटलं! आज मीही कडवी रजपूतानी आहें असं मनावर नीट ठसलं!" अलकचे तेजस्वी डोळे विशेषच चमकत होते.

जें सारें पाहून तारेला कौतुकमिश्र आनंद वाटला, जें सारें पुण्यास तारेच्या विवाहकालीं करूं असें विश्वासरावानें थट्टेनें म्हटलें, त्याच साऱ्या विधींचा व परिस्थितीचा अलकवर, विश्वासरावाच्या रजपूत पत्नीवर, कांहीं तरी परिणाम झाला! आणि तें पाहून दुर्जनसिंहाला कृतकृत्य झालें. एवढी खटपट केल्यासारखें इच्छित फळ मिळालें! इतके दिवस विश्वासरावाच्या प्रेमानें दिपलेले अलकचे डोळे आज उघडलेले दुर्जनसिंहाला दिसले, एवढेंच नव्हे तर त्यात पूर्वीचे दोन उत्कृष्ट गुण, स्वकुलप्रीति आणि स्वदेशाभिमान त्याला मूर्तिमंत दिसले. आपला आनंद लपविण्यासाठीं गंभीर मुद्रा करून त्यानें एकवार आपल्या दाढीवरून हात फिरविला. अलकनें म्हटल्याप्रमाणें ती खरोखरीच आज कडवी रजपूतानी आहे! वाः, तवा तर खूप तापला आहे, आतां घाईनं आपली पोळी भाजून घेतली पाहिजे!

# प्रकरण एकविसावें

## " पुढें व मागें "

अशा तऱ्हेचे आनंददायी विचार करीत दुर्जनसिंह दयाळला शोधीत अलकच्या खोलींत गेला. त्या खोलींत दयाळ विश्वासरावाचें थोडेंसें सामान एका बाजूला लावून ठेवीत होता. त्यांत दुर्जनसिंहाच्या नेत्रांना आकर्षणारी, 'वि शि.' असें नांव असलेली ती संदूक होती, आणि तें पाहून दुर्जनसिंहानें खुषींत येऊन मान डोलविली. दयाळ दुसऱ्या कांहीं कामांत गुंतलेला पाहून दुर्जनसिंहानें ती मोडकी संदूक उचलायला हात घातला संदूक मोडकळीला आली असल्यानें तिचें आकण सैल होतें म्हणा कीं दुर्जनसिंहानें ती निष्काळजीपणें उचलली म्हणून म्हणा, पण संदूक सताड उघडली गेली व आंतील जिनसा खालीं पडल्या. त्या सावरण्याच्या प्रयत्नांत संदूकही जमिनीवर आपटली.

मोठयानें चुकचुकून दुर्जनसिंह म्हणाला, " अरेरे, अगदींच गैदी आहे मी दयाळ. बाकी, वस्तुपरत्वें असं व्हायचंच म्हण ! तुझ्या मालकाच्या वस्तू आहेत ह्या, सरदार विश्वासरावाच्या. जरा गोळा करायला हात लाव बघूं ! "

वस्तू उचलतांना दयाळला एक लखोटा सांपडला व जिज्ञासेनें तो लखोटा तो उलटासुलटा करूं लागला. एवढयात दुर्जनसिंहाचें तिकडे लक्ष गेलें व त्यानें दयाळच्या हातून तो जवळजवळ हिसकून घेतला.

दयाळ आश्चर्यानें ओरडला, " ह्याचा अर्थ काय ? "

" जरा उभा रहा. मला आधीं हा कागद तरी वाचूं दे. " एवढें बोलून लखोट्यांतील मराठी लिपींत लिहिलेला तो कागद दुर्जनसिंह वाचूं लागला.

" जय एकलिंगजी ! हें खरें असेल काय ! "

" काय खरं ? सांगा, लौकर बोला."

" जरा थांब, मला विचार करूं दे. "

" तुम्हाला कांहींही माहिती मिळाली तरी मला ती ताबडतोब कळविण्याचं तुम्हीं वचन दिलेलं आहे ! "

" अरे पण, जरा थांब म्हणतों ना ! "

" थांबूं ? आणखी थांबूं ? मुळींच नाहीं. चला, लवकर बोला ! "

" दयाळ, एवढी घाई काय कामाची? माझा शब्द मी कधींच मागें घेणार नाहीं. दयाळ, मीं तुला वचन दिलं होतं कीं, जेव्हां मला—"

" माझ्या लाडक्या बच्चाच्या खुन्याचं नांव कळेल तेव्हां तें मला लगेच सांगावयाचें. आणि तुम्हांला तें नांव ठाऊक आहे हें तुमच्या तोंडावरून मी समजलों आहें. "

" दयाळ, नको ! आज तुला तें सांगितलं म्हणजे परिणामीं तें किती भयंकर होईल ! छे छे आतां नको ! "

" अंहं. आतां—ह्या क्षणीं—मला तें समजलं पाहिजे. नाहींतर मी इकडे आतां तुमचाच मुडदा पाडीन. " म्हातारा रागाच्या आवेशानें थरथर कांपत होता.

" मग ऐक तर ! " असें म्हणून हलक्या स्वरांत दुर्जनसिंहानें त्या कागदावरील मजकुराचा मथितार्थ आपल्या भाषेंत त्याला सांगितला. नंतर त्या मोडक्या संदुकींतील आणखी कांहीं विश्वासरावाचे जिन्नस व त्याच खोलींत एका पेटाऱ्यांत असलेल्या दयाळच्या ओळखीच्या व अलकच्या मालकीच्या निवडक एक दोन वस्तू त्यानें दयाळच्या पुढे धरल्या. वृद्ध दयाळच्या मस्तकावरील शिरा आतां ताडताड उडूं लागल्या. त्याचे गुंजेसारखे लाल डोळे गरगर फिरत होते. त्याला तसाच उत्तेजित विकारांच्या भक्ष्यस्थानीं सोडून, बाहेर अलक व तारा बोलत बसल्या होत्या तिकडे दुर्जनसिंह गेला.

सारें रक्त शोषून घेतल्यासारखा त्याचा चेहरा पांढरा फटफटीत दिसत होता. अलकला उद्देशून तो म्हणाला, " बाईसाहेब, आपली शय्या तयार आहे. काळोख पडूं लागला आहे. नुकताच सूर्यास्त झाला आहे तेव्हा आणखी घटकाभरांत आपले पति येतील. तेव्हां आंत चला." दुर्जनसिंहाचा तो विकृत चेहरा पाहून चकित झालेली अलक दुर्जनसिंहाच्या ह्या बहुवचनानें फारच चकित झाली.

" काकाजी, आज ही कुठली बोलण्याची रीत काढलीत ? "

" आपण आतां सरदारपत्नी आहात. मग पूर्वीसारखं एकेरी बोलणं कसं शोभेल ? "

" काकाजी, असं कां बरं बोलतां ? मी तुम्हांला लेंकीसारखी. मला पूर्वीप्रमाणंच हांक मारा."

" ठीक आहे. आज तुझ्या मर्जीप्रमाणंच होऊं द्या. अलक, तूं व ताराबाई आंत चला."

अलक व तारा लगेच उठल्या. तारा अलकला तिच्या खोलीच्या दारापर्यंत पोंचवायला गेली; पण रजपूत पद्धतीप्रमाणें आतां त्या खोलींत तारेला किंवा इतर कुणाला जाण्याची परवानगी नव्हती; म्हणून तारा दारापर्यंत गेली. दाराला रेशमी पडदा टांगला होता व त्याच्यावरून जाईच्या फुलांचे एकेरी हार सोडले होते. अलकनें पडदा किंचित् बाजूला सारतांच फुलांचा सुवासिक घमघमाट बाहेर आला. खोलींत फुलांचा नुसता सडा घातला होता. पलंगाभोंवतीं जुईच्या फुलांची नाजुक जाळी गुंफली होती. सबंध सिरोही प्रांतांत त्या वेळीं उमललेलीं इरेक जातीचीं सुवासिक फुलें दुर्जनसिंहानें आणविलीं होतीं. फुलांच्या वासानें अलकचें मन प्रसन्न झालें खरें, पण कां कोण जाणे तिचें अंतःकरण भरून आलें. तारेचा हात धरून सद्गदित कंठानें ती म्हणाली, " ताराताई, आतांपर्यंत आनंदी असलेल्या माझ्या मनाला इकडे येतांच कां अशी हुरहूर लागली आहे कोण जाणे ! ताई, भविष्यकाळच्या एखाद्या वाईट प्रसंगाची ही छाया तर नव्हे ना ? काय असेल तें असो, पण तुझ्या दादांना मी पूर्ण सुखी करीन असा मला आशीर्वाद दे. हंसूं नकोस गडे. वयानें व मानानें मीं तुझ्यापेक्षां मोठी असलें तरी आज बघ मला कुणाच्या तरी मनापासून दिलेल्या आशीर्वादाची अपेक्षा वाटते आहे. तेव्हां मी सुखी होईन व त्याना सुखी करीन असं म्हण."

अलक चेष्टा करीत आहे असें तारेला प्रारंभीं वाटलें. परंतु तिच्या गंभीर मुद्रेवरून तिचा तो समज दूर झाला व प्रेमळपणें ती म्हणाली, " अलक, दादासारखा पति नि तुझ्यासारखी पत्नी असा जोडा जमल्यावर तुम्ही कां सुखी होणार नाहीं. ! वहिनी, होशील बरं, तूं पूर्ण सुखी होशील नि माझ्या दादालाही सुखी करशील. झालं ? आतां हंस बघूं ; पण खरंच अलक, तुम्ही रजपूत लोकच असे हळव्या मनाचे काय ग ! अगदीं क्षुल्लक कारणानें किंवा आतांसारखं अकारणसुद्धां तुमचं मन प्रक्षुब्ध होतं ना ! "

" जाऊं दे तें. ताराताई, एक दिवस माझ्या जन्माची कहाणी मी तुला सांगेन. मग तुला सारं कळेल. बरं आतां उशीर झाला. जाऊं मी ? "

अलक पडदा सारून आंत गेल्यावर तारा दूर उभ्या असलेल्या दुर्जनसिंहाकडे वळली. त्याबरोबर ओंठाचा एकच कोंपरा वर चढवीत तो म्हणाला, " ताराबाई, एकंदरींत आम्ही लोकच जरा विचित्र, नाहीं ? "

अलकचे व आपलें संभाषण ह्यांनीं ऐकलें हें लक्षांत घेऊन तारा म्हणाली, "हो, विचित्रच नाहीं तर काय !"

"तुम्हीं एकट्या अलकवरून सरसकट रजपूत लोकच विचित्र असं विधान बांधलंत ! पण ताराताई, अलक आज वधू आहे हे तुम्ही विसरतां. बरं, तुम्ही थकलेल्या दिसतां. चला, पिछाडीच्या बाजूला तुमची खोली आहे ती तुम्हांला दाखवतों मी."

तारेला तिच्या खोलीबाहेर सोडून दुर्जनसिंह गेला. खोलींत शिरतांना तारेनें सहजच मागें वळून पाहिलें तर दुर्जनसिंह अलकच्या खोलीकडे टक लावून पहात होता. कावूंत आलेल्या आपल्या भक्ष्याकडे पाहणाऱ्या वाघाप्रमाणे चमकणारे त्याचे ते बारीक डोळे पाहून तारेच्या अंगावर कांटा उभा राहिला.

  

विश्वासरावाचें अलकबरोबर लग्न लागलें त्याच वेळीं मुरारराव चितोडच्या रस्ता कापीत होता. संध्याकाळच्या सुमाराला तो तिकडे पोहोंचला व पोहोंचतांच पहिल्या प्रथम त्यानें किसनसिंह राठोड ह्याचा पत्ता काढला. किसनसिंह घरींच होता. किसनसिंहाने आधीं त्याला ओळखले नाहीं, पण मुराररावानें आपलें नांव सांगतांच चकित होऊन किसनसिंह म्हणाला, "वीर मुरारराव तुम्ही ! ओहो, इतके कसे बारीक आणि निस्तेज दिसतां !"

आणि खरोखरीच शरिराला इतक्या दूरच्या प्रवासाचा त्रास व मनाला विश्वासराव व विशेषतः तारा ह्यांच्या जीविताच्या सुरक्षिततेबद्दल काळजी ह्यामुळें मुरारराव अगदींच उतरलेला दिसत होता. मुराररावानें ह्या प्रवासाचें कारण सविस्तरपणे सांगतांच किसनसिंह विस्मित झाला.

"मुरारराव, असं आहे म्हणतां ? मग चला, मी तुमच्याबरोबर सिरोहीला येतों आणि बरोबर सात आठ हत्यारबंद शिपाईही घेतों. माझ्या हाताखालीं इकडे बरीच मोठी तुकडी आहे."

"बरोबर, हेंच मी सांगणार होतों. द्वंद्वयुद्धाच्या वेळीं तुम्ही हजर होतां. विजयाच्या बरोबर तुम्ही तिकडे त्या वेळीं असल्यामुळं युद्ध नियमाला धरूनच झालं हें तुम्ही अलकला नीट सांगाल; पण तुमचीं माणसं तयार होईपर्यंत तुम्हांला वेळ लागेल. तेव्हां मांड बदलून मी पुढं जातों. पाठोपाठ तुम्ही या."

आणि मुरारराव किसनसिंहासाठीं न थांबतां तसाच सिरोहीच्या रस्त्याला लागला. दुर्जनसिंहाच्या वाड्यांतून विश्वासराव परत येण्याच्या आधीं अर्धीच घटका मुरारराव अलकच्या निवासस्थानांत पिछाडीच्या बाजूला जाऊन पोहोंचला. किसनसिंह व त्याचीं माणसें येऊन पोहोंचेपर्यंत कांहीं गडबड करण्यांत अर्थ नाहीं हें ठाऊक असल्यामुळें मुरारराव झाडांच्या गर्द सांवलींत उभा राहिला. गांवांत शिरतांच अलक-विश्वासचें लग्न सकाळींच झाल्याची बातमी लागल्यामुळें मुराररावाचें मन निराश झालें होतें. एवढी जिवाची आटापिटी केली तरी उशीर झालाच ! राहून राहून मुराररावाला दुर्जनसिंहाचे ते शब्द आठवत होते.

'कांहीं तरी हुलकावणी दाखवून त्याला सिरोहीला भुलवून आणलं पाहिजे.'

अगदीं हताश होऊन मुराररावानें कपाळावरून हात फिरविला. मघांपासून शांत असलेल्या पिछाडीच्या तळमजल्यावरील खोलींत कोणाची तरी चाहूल लागल्यामुळें मुराररावानें आतां वर पाहिलें. दबकत दबकत तो खिडकीजवळ गेला व त्यानें संभाळून आंत डोकाविलें बाजूच्या खिडकींत मुराररावाकडे अर्धवट पुढा करून तारा उभी होती. तिच्या तोंडावर चांदणें पडल्यामुळें तिचे गोंडस गाल फारच पांढरट दिसत होते. तिच्या अंगावर अजूनपर्यंत रजपूत वेषच होता. मुराररावाला तारा त्या पोषाखांत फारच सुंदर भासली. अनिमिष लोचनांनीं तो तिच्याकडे पहातच राहिला. कदाचित् पुन्हा कधींच आपल्याला ती दिसणार नाहीं अशी चमत्कारिक भीति जेव्हां मुराररावाच्या मनांत डोकावूं लागली, तेव्हां तारेवर असलेल्या आपल्या प्रेमाची यथार्थ कल्पना त्याला आली. आपल्या डोळ्याचें आज सार्थक झालें असें वाटून मुरारराव किंचित् पुढें झाला व प्रेमकंपित आवाजांत त्यानें तिला हांक मारली.

तारा केवळ्यांदा तरी दचकली, पण तें भीतीचें दचकणें नव्हतें. तिनें आपल्या प्रियकराचा आवाज तेव्हांच ओळखला. धांवतच ती पिछाडीच्या खिडकीकडे आली व खिडकींत बसून ती बाहेर डोकावूं लागली मुराररावानें अलग रीतीनें तिला उचलून जमिनीवर आपल्या शेजारीं उभी केली. पहिल्यांदा तारेचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. परंतु मुराररावाच्या अंगावरील प्रवासाची धूळ, त्याचे मळलेले कपडे, सुकलेला चेहरा वगैरे पाहून तिची खात्री तर झालीच; पण तिला थोडी काळजीही वाटली.

" हें काय ? आपली प्रकृति बरी नव्हती ? "

" तारे, मी सांगतों तें लक्षपूर्वक ऐक. मध्यें कांहीं न बोलतां माझ्या प्रश्नांचीं चट्कन् उत्तरं दे. वेळ फार मोलाचा आहे. आणि तारे, त्यावर तुझ्या दादाचा जीव अवलंबून आहे." धीर देण्यासाठीं तिच्या खांद्यावर आपला हात ठेवून मुरारराव पुढें म्हणाला, " मीं संदेश पाठविल्याप्रमाणं तुझ्या दादाचा विवाह पुढं ढकलण्याचा तूं प्रयत्न केलास.काय ! "

" संदेश ? मला कधीं पाठवला ? "

" म्हणजे ? तुम्ही नेहमींच्या राजरस्त्यानंच आलांत ना ? "

" होय. कां बरं ?

" हं. त्या लुच्च्या दुर्जनसिंहाचंच हें काम तर ! काय करूं ? तें कांहीं नाहीं तारे, पळ आतां आणि तुझ्या दादाला इकडे बोलावून आण. मला त्याची भेट घेतलीच पाहिजे ! "

" छे–छे, हें काय भलतंच ? "

" ठीक, मीच तिकडे जातों तर ! कुठली खोली त्यांची ? " एका उडीसरशीं मुराररावानें खिडकी गांठली, व त्यानें तारेलाही वर घेतलें. आपल्या हातानें त्याला विरोध करीत तारा म्हणाली, " काय वेड तर नाहीं लागलं ? आजची पहिली रात्र ना ? दादा जन्मभर आपल्यावर राग धरील हो ! "

" वेडी आहेस तूं तारे अग, ही वेळच अशी चमत्कारिक आहे, म्हणून मी हें साहस करणार ना ? तारे, अशी भिऊं नकोस. इकडे, माझ्याकडे बघ, आणि मी सांगतों तें ऐक." प्रेमानें तिला जवळ घेऊन मुराररावानें सर्व हकीकत सांगितली. हें लग्न थांबविण्यासाठीं आपण एवढे सायास केले ते विनाकारण नव्हे ह्याबद्दल त्यानें तिची खात्री केली. तें सारें ऐकून तारेची स्थिति फारच अनुकंपनीय झाली.

" देवा, त्या दोघांची काय स्थिति होणार ? अलक ! दादाला मारण्याची तिची प्रतिज्ञा ? छेः छेः, हें मात्र शक्यच नाहीं, दुर्जनसिंह कावेबाज असेल. पण अलक तशी नाहीं. ती प्रेमाची मूर्ति आहे. तिला ह्यांतलं कांहीं ठाऊक नसणार ! "

" अजूनपर्यंत माहिती नसेल कदाचित्. पण त्या दुर्जनसिंहाला मी चांगला ओळखतों. तो इतका नीच मनाचा आहे कीं, तो अलककुमारीला सगळं सांगेल— एवढंच नव्हे तर आजच सांगेल ! तुला ठाऊक नाहीं तारे, अलकवर त्याचं प्रेम

होतं आणि ती त्याच्या हातांतून आतां कायमची गेली—अरे देवा! ऐकलंस? बघ तारे, त्यानं आत्तां बघ, ह्या क्षणीं—तिला सांगितलं."

मुराररावानें दार उघडलें व तो धांवतच बाहेर निघाला. द्वंद्वयुद्धाच्या दिवशीं त्यानें अलकच्या तोंडची करुण किंकाळी ऐकली होती. तसलीच किंकाळी आतां ऐकूं आली. परंतु त्या किंकाळींत दुःख व निराशा होती तर ह्या किंकाळींत त्या-शिवाय भीतीही मूर्तिमंत होती!

## प्रकरण बाविसावें

# पहिली रात्र

तारेच्या प्रेमळ भाषणानें अलकचें बरेंच समाधान झालें. ती शयनगृहांत शिरली, तेव्हां तिचें हृदय आनंदानें उडत होतें आणि लज्जेनें धडधडत होतें. खोलीच्या दोन कोंपऱ्यांत मोठाल्या समया तेवत होत्या. खोलीला बागेच्या बाजूला एक खिडकी होती व तींतून आनंददायी चंद्रप्रकाश आंत येत होता. अलक ज्या दरवाजानें आंत शिरली त्याखेरीज बाहेरच्या ओसरीवरून परस्पर आंत यावयाला, दुसरा एक दरवाजा होता व त्यालाही जाड रेशमी पडदा लावला होता.

एका कोंपऱ्यांत थाळ्यामध्यें गेंदेबाज हार व वासाचे गजरे होते आणि जवळच पंचारती ठेवली होती. विश्वासराव येण्याची वेळ जवळ आल्यामुळें अलकनें सळईनें समईतील वाती सारल्या. नंतर जमिनीवर पसरलेल्या जाजमावर ती बसली. तिच्या नाजुक शरिराला फार त्रास झाला होता.

" देवा, पत्नीचं कर्तव्य यथायोग्य बजावण्याची मला शक्ति दे " अशी तिनें मनोभावानें प्रार्थना केली. ओसरीकडील दरवाजाकडे अलकचें वारंवार लक्ष जात होतें. कारण विश्वासराव तिकडून आंत येणार होते. उत्सुकतेनें तिकडे पाहतां पाहतां अलक लज्जित होत होती.

खिडकींतून गाण्याचा मंद स्वर वाऱ्याच्या झुळुकीबरोबर ऐकूं येत होता. बागेंत बसून दयाळसिंह अलकचें पूर्वीचें आवडतें पण आतांचें नावडतें 'खून' हें गाणें गात होता. आनंदांत मग्न असल्यानें कांहीं वेळ अलकचें तिकडे लक्ष गेलें नाहीं; पण नंतर स्वर जरा चढल्यामुळें अलकच्या कानांत ते शब्द शिरले, आणि गाण्याचा भावार्थ मनांत येऊन तिचे डोळे भरून आले.

'अरेरे, आपला लाडका विजय जर आज असता तर आपला सुखाचा पेला काठोकाठ भरला असता' असें मनांत येऊन अलक दचकली.

प्रतिज्ञा ! सूडाची प्रतिज्ञा ! चटृदिशीं ती खिडकीकडे गेली व सद्गदित आवाजांत म्हणाली, " दयाळ, दयाळ, पुरे कर हें गाणें. कुणीं ऐकलं तर माझ्या लज्जेचा

पारावार राहणार नाहीं ! दयाळ, आजच्या रात्रीं हें गाणं गाऊन मला शरमिंदी करायला तूं कसा धजलास ? ”

भसाड्या, रागीट आवाजांत दयाळ शेवटले कडवें घोळून घोळून म्हणत होता.

“ दयाळ, आतां इकडून निघून जा. जा म्हणतें ना ! ”

“ जाऊं म्हणतेस ? मी जाऊं ? हुं. तो आतां इकडे येईल आणि मी जाऊं ?” अलककडे पाहून तुच्छतेनें हंसत दयाळनें चौथऱ्यावर पाय देऊन खिडकींत चढण्याची तयारी केली.

“ दयाळ, तूं काय निशा तर नाहीं ना केलीस ? ” अलकचें वक्षःस्थल खालीं-वर होत होतें.

“ निशा ? छ्याः ! पण जेव्हां सारी हकीकत कळेल तेव्हां तुझं डोकं मात्र निशाबाजासारखं धुंद होईल. आजच्या दिवशीं मीं म्हाताऱ्यानें दिलेला शाप तुला बाधलाच पाहिजे !' '

अलक रागानें बेफाम झाली होती. “ दयाळ, ह्या तुझ्या गमजा बस्स कर माझे पति इतक्यांत येतील. तुझी ही बेजबाबदार बडबड जर त्यांनीं ऐकली तर तुझीं खांडोळीं व्हावयाला कितीसा उशीर लागणार ! ”

“ अलक, खांडोळीं उडविण्याचा आज रात्रीं माझा हक्क आहे, समजलीस !”

“ तुझा ? ”

“ हो, माझा. विजयाच्या शवाला साक्षी ठेवून आपण दोघांनीं सूडाची प्रतिज्ञ केली होती. तूं विसरलीस पण मी कधींच विसरणार नाहीं. तूं त्याला वांचवणार तर मी त्याला मारणार.”

दयाळचे गुंजेसारखे लालबुंद, गरगर फिरणारे ते डोळे पाहून, म्हाताऱ्याचें डोकें फिरलें, असें अलकला वाटलें.

ओसरीवर कोणाचे तरी पाय वाजलेले ऐकून विश्वासराव आले, अशा कल्पनेनें अलक दाराकडे तोंड करून म्हणाली, “ आंत यावं लवकर. ह्याला म्हातारचळ लागला आहे ! ”

परंतु विश्वासरावाऐवजीं दुर्जनसिंह सावकाशपणें आंत आला व आपला चेहरा अगदीं निर्विकार ठेवीत नम्रपणें म्हणाला, “ बाईसाहेब, कांहीं जास्तीकमी झालं काय ? ”

उर्मटपणें आपल्याकडे पाहणाऱ्या दयाळकडे अलकनें उत्तरादाखल बोट दाखविलें.

दयाळाला पहातांच आश्चर्यानें दचकल्याचें ढोंग करून दुर्जनसिंह उद्गारला, "तूं आणि इकडे! छे छे फार वाईट गोष्ट केलीस ही. अलकच्या मनःस्वास्थ्याचा कांहीं तरी विचार तूं करायला हवा होतास. आज रात्रीं तूं ह्या बाजूला फिरकूं सुद्धां नकोस म्हणून मीं तुला बजावलं होतं ना? हरहर! किती अघोर कृत्य हें! आणि त्यांतून आजची त्यांची पहिली रात्र!"

"तो जिवंत असेपर्यंत मी इकडून हालणार नाहीं." नकारार्थीं दोन्ही हातांचे पंजे हालवीत दयाळ किंचाळला.

दुर्जनसिंहाचे शब्द ऐकून अलकचें हृदय कसल्या तरी अज्ञात भीतीनें धडधडूं लागलें. दयाळला एक वेळ म्हातारचळ लागला असेल; पण दुर्जनसिंह तर शांत व धीरगंभीर दिसत होता. अलकचा सारा आनंद मावळला. तिचे रक्तहीन झालेले ओंठ कांपूं लागले.

"आमची पहिली रात्र!—अघोर कृत्य!—ह्या दोहोंचा काय संबंध!"

"त्याचा संबंध असा कीं," प्रत्येक शब्द जोर देऊन सावकाशपणें उच्चारीत दुर्जनसिंह म्हणाला, "कांहीं वेळापूर्वी ह्या कडव्या रजपूताला—विजयावर पोटच्या पोराप्रमाण प्रेम करणाऱ्या ह्या प्रेमळ म्हाताऱ्याला—अगदीं अचानक रीतीनं कुमाराच्या खुन्याचं नांव कळलं; परंतु त्याच खुनी इसमाची तूं पत्नी झालीस म्हणून तुझ्यासाठीं—केवळ तुझ्यासाठीं—ती गोष्ट माझ्या हृदयांत मी गुप्त ठेवणार होतों. हूंऽ! दैवाचा खेळ आहे झालं!"

"मी त्यांची—पत्नी—झालें—म्हणून—आजन्म—गुप्त ठेवणार—होतां! म्हणजे! असली गुप्त गोष्ट फक्त एकच असूं शकेल." कोरड्या पडलेल्या ओंठावरून जीभ फिरवीत अलकनें तुटक तुटक शब्दांत प्रश्न केला.

"आणि त्याच गुप्त गोष्टीविषयीं मी बोलत होतों. त्या दिवशीं साताऱ्यास मी तुला तें सांगणार होतों, तर तूं मला मनाई केलीस. विजयाचा खून करणाऱ्या त्या मराठ्याचं नांव न सांगण्याबद्दल तूं मला पुनः पुन्हा बजावलंस; आणि जेव्हां त्याच्यावरच आपलं प्रेम असल्याचा तूं कबुलीजबाब दिलास तेव्हां माझं धैर्यच खचलं."

" धैर्यच खचलं ! " धांपा टाकीत किंचित् थांबून अलक घोगऱ्या स्वरांत पुढें म्हणाली, " अरे देवा ! तुम्ही म्हणतां तरी काय ? अं ? माझ्यावर दया करा नि एकदां स्पष्ट काय तें सांगा. होय, सांगा ! पूर्वी सांगितलं नाहींत, कळविलं नाहींत तें आतां कळवा ! "

" अलक— "

" अं हं इकडे तिकडे कांही न करतां झट्कन् सारं सांगा."

" ठीक आहे. ऐक तर. तुम्हां दोघां भावंडांना अंगाखांद्यावर खेळविलेल्या ह्या म्हाताऱ्या दयाळसिंहाला कांहीं वेळापूर्वी कळून आलं, कीं तुझ्या लाडक्या भाईचा खुनी म्हणजेच तुझा प्रिय पति विश्वासराव शिर्के ! "

अलकचा सूड उगविल्याचें पुरें समाधान दुर्जनसिंहाला आतां खास मिळालें असणार.

ही बातमी ऐकल्यावर अलकला जर घेरी आली असती तर तिच्या दुःखाची तीव्रता अंशतः तरी कमी झाली असती. देवाचा तो तिच्यावर उपकारच झाला असता; पण अशानें दुर्जनसिंहाचें आसुरी समाधान थोडेंफार कमी झालें असतें ना ! तें कांहीं असो, अलकला घेरी आली नाहीं ही गोष्ट खरी. मात्र शरविद्ध हरिणीप्रमाणें ती कासावीस झाली. भिंतीच्या आधारानें उभी राहून ती आंवढे गिळीत होती. अति भीतीनें तिचे डोळे विस्फारित झाले होते, दम लागल्याप्रमाणें धांपा टाकीत ती म्हणाली, " नाहीं, नाहीं. असं कधींच होणार नाहीं ! देव दयाळु आहे. ! विश्वासराव शिर्के, माझे प्रिय पति आणि—! छेः छेः, नको तो विचार. तें शक्यच नाहीं. मी त्यावर कधींच विश्वास ठेवणार नाहीं ! "

" विश्वास ठेवणार नाहीं ? " मान हालवीत दयाळ वेडावणीच्या स्वरांत पुटपुटला, " पोरी, पवित्र सत्य आहे तें ! तो ईश्वराच्या घरचा न्याय आहे, समजलीस ! "

अलकच्या जिवाची विलक्षण तळमळ होत होती. महत् प्रयासानें तिनें बाह्यतः शांतता धारण केली. तिची चर्या निस्तेज व फटफटीत दिसत होती. थरथर कांपणारे हात स्थिर करण्यासाठीं तिनें ते पाठीमागें एकांत एक अडकविले. एक करुण निःश्वास सोडून ती म्हणाली, " हं बोला, काय सांगायचं तें ते येण्याच्या आधीं सांगा. तुम्ही आतां केलेला आरोप मला शाबीत करून दाखवा. मी अगदीं

वेडी होऊन माझी शुद्धिबुद्धि जाण्याच्या अगोदर मला पुरावा दाखवा आणि विचार करण्याची संधि द्या. हं सांगा, दाखवा तुमचे पुराव्याचे दुवे ! ”

इलक्या स्वरांत दुर्जनसिंहानें तिला सर्व सांगितलें, एवढेच नव्हे तर तिची खात्री केली. इच्छा नसतांही अलकची त्यानें संशयनिवृत्ति केली.

समतोल, शांत आवाजांत दुर्जनसिंह बोलतच होता, “ तूं पुरावा मागणार असें मला वाटलेंच होतें. म्हणूनच मीं सर्व जय्यत तयार ठेवलें होतें. हं. हा पहा एक कागद. ही खालीं मराठा सेनापतीची सही. ह्यावर असें लिहिलेलें तुला आढळेल कीं, द्वंद्वयुद्ध झालें त्या विवक्षित प्रातःकाळीं चितोडहून कूच केलेल्या मराठा तुकडींत विश्वासराव शिर्के हा शिलेदार होता. चल, वाच. किती यातायात करून मीं हा मिळविला ! हं धर ! ”

थरथर कांपणाऱ्या हातांत तो कागद धरून अलकनें आपली निस्तेज व भयभीत दृष्टि त्यावरून फिरविली.

“ होय, त्या वेळीं ते चितोड मुक्कामीं होते; पण त्यावरून त्यांनींच भाईला मारलं असं कांहीं सिद्ध होत नाहीं ” केंविलवाण्या स्वरांत अलक बोलत होती.

“ अच्छा, तेवढ्यानें सिद्ध होत नाहीं, तर हा घे आणखी भरपूर पुरावा. मर्दा माझ्या हातून विश्वासरावाची ही मोडकी संदूक खालीं पडली व तींतून बाहेर पडलेल्या ह्या महत्त्वाच्या जिनसा ” मध्यभागीं चेपलेली एक मोहर तिच्या डोळ्यांसमोर धरून दुर्जनसिंह मिटलेल्या दंतपंक्तींतून पुटपुटला, “ तुझ्या प्रिय पतीचा अमूल्य प्राण हिनेंच वांचविला बरं ! ”

“ आणि विजयानं मारलेल्या बाणाची खूण ही तिच्यावर अजून आहे; पण ही खूण दुसऱ्या कुठल्या तरी युद्धांतली कशावरून नसेल ? तुम्ही म्हणतां तिकडेच— त्यांच्या संदुकींतच—तुम्हांला ही सांपडली नसेलही. असली भयंकर बातमी मी सहजासहजीं खरी मानीन असं तुम्हांला वाटलं तरी कसं ?

“ ह्या माझ्या हातांनीं त्या हरामखोराच्या संदुकींतून मीं ती काढली. काय ! त्या दीड दमडीच्या मराठ्याची बाजू घेऊन तूं आम्हांला खोटं पाडायला बघतेस ! आणि तूं अस्सल चौहानकुमारी ! ” घोगऱ्या आवाजांत दयाळ उद्गारला.

अलक ह्यावर काय बोलणार ! दयाळ कधींच खोटें बोलणार नाहीं हें तिला पुरें ठाऊक होतें. दुर्जनसिंहाकडे वळून ती म्हणाली, “ हं, आणखी पुरावा ! ”

" हो—हो. लागेल तेवढा!" प्रारंभींची दुर्जनसिंहाची निर्विकार मुद्रा आतां विजयानंदानें खुलली होती. " हा बघ विश्वासरावाचा तिरकमठा. ह्याच्याच जोडीचा वर वेल असलेला—विजयाच्या हातांतला मोडका तिरकमठा तुझ्याकडे होता तो हा मीं आणला आहे. हाच मोडका तिरकमठा डाव्या हातांत घट्ट पकडून कुमार मृत्युवश झाला आणि तुझ्या प्रतिज्ञेची खूण म्हणून तो तूं सदैव आपल्याजवळ ठेवीत होतीस हें तुला ठाऊक आहेच. ह्या प्रेमाच्या फंदांत पडेपर्यंत तूं प्रत्यहीं ह्याचें दर्शन घेत होतीस. धर, हे दोन्ही आपल्या हातांत घे व एकमेकांशीं ताडून पहा."

" अरे देवा, अगदीं एकसारखेच आहेत हे!" व्याकुळ होऊन अलक ओरडली.

" थांब, ऐक. ज्या तिरकमठ्यान तुझ्या लाडक्या भाईचा प्राण घेतला, त्यावर कोरलेलं हें तुझ्या प्रियपतीचं नांव वाच. तूं स्वतःच वाच म्हणजे खात्री होईल."

आणि त्या नरपशूनें तिला तें वाचावयाला लाविलें.

एकदाच त्यावर डोळे फिरवून अलकनें आपले डोळे घट्ट मिटून घेतले. " माझ्या पतीचें नाव! विश्वासराव शिर्के! शिर्के? देवा-देवा! आतां तेंच माझंही नांव! माझं—"

" पुरें झालं का? कीं आणखी पाहिजे?" आपल्या साखरेसारख्या गोड आवाजांत दुर्जनसिंहानें विचारलें.

त्याबरोबर आवेशानें अलक मोठ्यानें ओरडून म्हणाली, " पुरें झालं? म्हणजे? माझी खात्री व्हावी म्हणून मी झटतें आहें असं वाटलं होय तुम्हांला? सांगा, सारा पुरावा मला द्या! सगळं पाहीपर्यंत मी धीर सोडणार नाहीं!"

" अस्सं? ठीक आहे. हा घे पुराव्याच्या साखळीचा मुख्य दुवा." एक कागद हातांत घेऊन अलकच्या डोळ्यांसमोर तो हालवीत दुर्जनसिंह सावकाशपणें म्हणाला, " अगदीं मुद्द्याचा—पूर्ण खात्रीचा—हा दुवा आहे. दयाळ, माझ्या हातांतला हा कागद मीं त्या सदुर्कीतून काढला हें तूं पाहिलंस ना?"

" हो—हो, निःसंशय पाहिलं! आतां त्याची सुटका होणं शक्यच नाहीं. तिला तो कागद वाचायला द्या म्हणजे आणखी पळवाट निघणं अशक्य आहे अशी तिची खात्री होईल!" डोळे बारीक करून मान डोलवीत दयाळ पुटपुटला.

दुर्जनसिंहानें किंचित् जुना दिसणारा तो कागद वाचावयास सुरुवात केली—

'मुक्काम जयपूरः मराठा छावणी...

जखमी झाल्यामुळें मरणोन्मुख पडलेला मी—'

" जखमी झाल्यामुळें मरणोन्मुख पडलेला ! " अलक उद्गारली " होय, जयपुरांतलीच गोष्ट ती ! "

कसल्या तरी अज्ञात आठवणीनें तिचे डोळे चकाकत होते.

" आपण मरणार असंच त्यांना वाटलं; पण मनापासून सेवाशुश्रूषा करून मरणाच्या दारांतून मीं त्यांना ओढून काढलं. हो, सर्वजण असंच म्हणत होते. आणि त्या वेळीं मी सुखी होतें !--सुखी ? " सद्यःस्थितीची एकाएकीं जाणीव झाल्यामुळें निराशेनें शेवटल्या शब्दाचा पुनरुच्चार करून ती म्हणाली, " काकाजी, दया करा आणि विचार करायला मला फुरसदच देऊं नका ! तुम्ही बोलत रहा. हं तो कागद वाचा ! कुणी तरी जखमी झालं होतं आणि मरणोन्मुखही होतं, नाहीं का ? होय असंच. पण कोण बरं तें ? " दोन्ही हातांनीं डोकें गच्च दाबून करुण स्वरांत अलक बोलली, " सांगा हो. सगळं सांगा एकदां. मी पुरी वेडी झालें नाहीं तोंवर तो कागद वाचून दाखवा. वाचा म्हणतें ना ! हं वाचा ! "

'हं. 'जखमी झाल्यामुळें मरणोन्मुख पडलेला मी, ही जबानी लिहून ठेवीत आहें. कारण सिरोही येथें झालेल्या द्वंद्वयुद्धांत माझ्याबरोबर असलेला माझा मित्र रामराव यादव ह्यानें त्यापायीं कांहीं अडचणींत येऊं नये अशी माझी इच्छा आहे.—'

दुर्जनसिंहाला पुढें वाचूं न देतां अलककुमारीनें त्याच्या हातून तो कागद हिसकावून घेतला व त्यावरील हस्ताक्षर नीट पाहून ती किंचाळली, " त्यांचंच अक्षर ! बस्स ! झाली खात्री ! एकूण माझ्या भावाला माझ्या पतींनीं मारलं हेंच खरं तर ! देवा, आतां एकच इच्छा आहे. ते येण्याच्या आंत मला मरण दे ! "

" उंऽहु. तो आला म्हणजे मरणाच्याऐवजीं एक निराळंच कर्तव्य तुझ्यासाठीं तयार राहील. हें बघ काय आहे तें ! " अंगरख्याच्या आंत लपविलेली तीक्ष्ण धारेची एक चकचकीत कट्यार बाहेर काढीत दयाळ म्हणाला.

" हा एक दुसरा लेखी पुरावा आहे. पहावयाचा आहे काय ? मुराररावानें ताराबाईला पाठविलेला हा खलिता. हरप्रयत्नानें हा विवाह पुढें ढकलावा अशी त्यांत स्पष्ट आज्ञावजा विनंति आहे ! " शांतपणें दुर्जनसिंहानें आणखी एक दुवा काढला.

"आणि तुम्हीं तो खलिता मधल्यामधें दपटलांत? किती नीचपणा हा! आणि काकाजी, ज्यांचा मीं तिरस्कार करायला हवा, त्यांच्याबरोबर तुम्हीं माझा विवाह करून दिलांत? आणि हे तुम्ही माझे पालक! एवढेंच नव्हे, तर माझ्यावर आपलं एवढं प्रेम नि तेवढं प्रेम आहे अशा बढाया ना मारल्यात?"

"हां. एकदां मी तसं बोललों होतों खरा!"

"अरेरे, साताऱ्यांतील तो दिवस—ती वेळ—" हुंदके देत अलक म्हणाली, "मी त्यांच्यावर किती प्रेम करितें हें तेव्हां नाहीं का तुमच्या लक्षांत आलं? त्यांचं माझ्यावर कसं गाढ प्रेम आहे तें मीं नाहीं कां तुम्हांला सुचविलं? पण आतां काय त्याचं? आतां! हाय!"

"काऽय? माझ्याबरोबर विवाह केला असता तर ह्याहून बरं झालं असतं हें पटायला लागलं वाटतं?" आपल्या अरुंद ओंठाची तुच्छतादर्शक मुरळी करीत दुर्जनसिंहानें कुचेष्टेनें प्रश्न केला.

त्याची दुष्ट कारवाई व नीच मन आतां अलकला पूर्ण कळून आलीं आणि ह्याच माणसाविषयीं आपल्याला पूर्वीं आदर वाटत होता! रागानें व तिरस्कारानें तिच्या अंगावर शहारे आले. "हं! काकाजी, परिस्थिति कितीही बदलली तरी न पटणारी गोष्ट कशी पटेल? अगदीं जंगजंग पछाडलं तरी हंसीला क्षुद्र काकपक्षी कधीं तरी पसंत पडेल काय? छे,—छेः! तुम्ही सांगतां त्या स्थितीपेक्षां आहे ही स्थितीसुद्धां शतपट बरी आहे! अरे देवा! अहो, तुम्ही माणूस आहांत कीं पशु! कोण अकल्पनीय दुष्टपणा हा!"

"दुष्टपणा नाहीं बरं. ही साधी, सरळ देवघेव आहे! तुम्हांला आठवत नसेल, पण बाईसाहेब, ज्या वेळीं सारी हकीगत तुमच्या त्या वीरवराला सांगेन असं मीं म्हटलं, त्या वेळीं आपण किती तुच्छतेनं हंसला. मला एक क्षुद्र घुंगुरटं समजून लीलेनें चिरडून टाकील अशी मला धमकी घातलीत, नाहीं? ओहो! त्या वेळीं किती पण गर्व झाला होता तुम्हांला! परंतु बाईसाहेब, एकादं क्षुद्र घुंगुरटंसुद्धां दंश करूं शकतं हें तुम्ही विसरलांत!" दुर्जनसिंहानें आपलें तोंड आतां सैल सोडलें. त्याच्या मनांतलें काळेकुट्ट जहर बाहेर पडूं लागलें.

"अलक, मी तुला एवढा क्षुद्र वाटलों, नाहीं? पण उन्मत्त पोरी, तूं ह्या सापाच्या शेंपटीवर पाय दिलेला आहेस; मग तो उलटून तुला दंश केल्याशिवाय कसा राहील? अलक, मी हात पुढें करण्याचीच खोटी होती, कीं तूं लगेच माझी झाली असतीस.

आणि इतक्या थराला गोष्टी आल्यानंतर तूं नाक मुरडून माझा त्याग केलास! तुझ्या ह्या सुंदर ओढणीवर पडलेला कचरा जसा तूं टिचकीनें उडवितेस तसाच मला उडवून टाकलास असं तुला वाटलं! पण अलक, ही तूं फार म्हणजे फारच मोठी चूक केलीस. तूं आपल्या स्वतःला माझ्यापासून हिरावून घेतलंस, आतां मी तुला त्याच्यापासून हिरावून घेणार!"

"त्यांच्यापासून! माझ्या पतीपासून! माझे पति—पण मला ह्याउपर त्यांचें मुखावलोकनही वर्ज्य! काय करूं? त्यांचं एक नख जरी माझ्या दृष्टीला पडलं तरी माझ्या भाईला त्यांनीं मारलं हें साफ विसरून मी त्यांना क्षमा करीन!" तिच्या डोळ्यांतील अश्रू आटून गेले होते. मधून मधून एकादा कोरडा हुंदका मात्र येत होता. तिच्या सुंदर केशपाशावर शोभणारी फुलांची जाळी तिनें ओढून काढली.

देवा, मी कशाला हा शृंगार केला? ही जाळी जशी सहज ओढून काढतां आली, तशी त्यांची प्रेमळ स्मृति माझ्या ह्या हतभागी हृदयांतून काढतां येईल का? पण न काढून तरी काय उपाय! आणि आजची ही पहिली रात्र! कोण काळरात्र ही! देवा, कसला हा तुझ्या घरचा न्याय!" सर्वस्वीं हताश होऊन अलक खालीं बसली.

"चला माझं इकडलं कर्तव्य तर आटोपलं! आतां इतक्यांत तो येईल वाः! "काय पण बहारीची भेट होणार आहे ही!" असें स्वतःशींच पुटपुटून दुर्जनसिंह निघून जाण्यासाठीं आंतील दाराकडे वळला; परंतु तितक्यांत हातांत ती नागवी कट्यार घेऊन दयाळ अलककडे गेलेला पाहून तो दारांतच थबकला. दयाळनें अलकच्या खांद्याला एक हळूच हिसका देऊन म्हटलें, "चल-चल, ऊठ! अशी बसतेस काय! आपलं पवित्र कर्तव्य बजाव!" तिच्या निर्जीव हातांत ती कट्यार बळेंच देऊन तो पुढें म्हणाला, "त्यानं विजयाला मारलं! आणि तूं विजयाला त्याच्या—स्मृतीला विसरलीस? पण कांहीं हरकत नाहीं. त्या दोन्हींचा आज बचपा काढ. आपल्या प्रतिज्ञेचं स्मरण कर आणि त्याला मार. ऊठ."

दुःखातिरेकानें अलकचें मस्तक सुन्न झालें होतें. किंचित् काळ दयाळच्या बोलण्याचा अर्थ तिच्या डोक्यांतच शिरेना; पण कट्यारीच्या त्या चकचकीत पात्यावर नजर स्थिर होतांच ती भानावर आली.

"किती तीक्ष्ण धार आहे? हिनें त्यांना—माझ्या पतीला मारूं म्हणतोस?"

अलकची मुद्रा आतां अत्यंत भयभीत झाली. कारण विश्वासराव आपल्याला जन्माचे अंतरले ह्या दुःखकारक विचारांत त्यांनाच मारण्याची आपली प्रतिज्ञा होती हें ती आतापर्यंत विसरलीच होती.

" तूं अस्सल रजपूतानी आणि असला प्रश्न विचारतेस ? प्रतिज्ञेच्या विस्मृतीबरोबर तुला आपल्या शीलाचाही विसर पडला ? " तिरस्कारपूर्वक दयाळ ओरडला.

एकादी मजेची गोष्ट ऐकल्यासारखी अलक मोठ्यानें हंसली. " अरे, पण दयाळ, मी माझ्या हातानें जर हा जंबिया त्यांच्या छातींत खुपसला तर तो घाव त्यांना मृदूच नाहीं कां भासणार ? "

अति दुःखानें तिचें डोकें तात्पुरतें ठिकाणावर नव्हतें.

दुःखांतसुद्धां रमणीय दिसणाऱ्या त्या बालेकडे पहात उभा असलेला दुर्जनसिंह स्वतःशीं पुटपुटला, " त्या पोऱ्याची पाळी अजून यावयाची आहे. माझ्या हक्काची वस्तु माझ्यापासून लाववतांना मोठं, गोड वाटल नाहीं ? छेः बुवा ! त्यांची एनटी भेट जर मला पहायला सांपडेल तर काय मजा होईल ! हो, पण मीं म्हणतो, मला कां नाहीं पाहतां येणार ? बस्स्. आपण तर आपले डोळे तृप्त करणार ! "

बाहेर घोड्याच्या टापाचा आवाज ऐकूं येतांच विश्वासराव आले तेव्हां नीट छपून बसलें पाहिजे असा विचार करून दुर्जनसिंह तिकडून निघून गेला.

सांपळ्यांत सांपडलेल्या सिंहिणीप्रमाणे अलक त्या खोलींत फेऱ्या घालीत होती. तिच्या त्या केविलवाण्या स्थितीकडे पाहून आनंदित झालेला दयाळ म्हणाला, " शाबास अलक, आपल्या कर्तव्याची शेवटीं तुला जाणीव झाली तर ! आपली इभ्रत आतां तूं खास पाळणार ! विजयसिंहाच्या त्या शारीरिक यातना मनांत आण आणि कडव्या रजपूतांचा द्वेष प्रेमाइतकाच तीव्र असतो हें शाबीत कर ! "

" होय, आईला त्यांनीं मारलं, त्या वेळी त्यांना दयामाया वाटली नाहीं, मग मला तरी आतां कां वाटावी ? आज मी अस्सल चौहानकुमारी आहे, आणि माझ्या हृदयांत आज द्वेषाखेरीज इतर भावनेला जागाच नाहीं ! "

चितोडमधील पटागणांत उभी असतां तिचे डोळे द्वेषाच्या अपवित्र भावनेनें जसे तळपत होते तसे ते आतां तळपूं लागले.

" बेटा, आतां तूं आमची अलक शोभतेस खरी ! एवढीशी लहान होतीस, विजयाबरोबर दंगामस्ती करीत होतीस, तेव्हांसुद्धां अशीच तेजस्वी होतीस.

अलक, मग सांग बरं, मृत्युवश होत असतांसुद्धां तुलाच हांका मारणाऱ्या, आपल्या शेवटच्या श्वासानंसुद्धां तुझं स्वागत करणाऱ्या, तुझ्या भेटीसाठीं तळमळणाऱ्या विजयसिंहाला तूं विसरून जाणार ? तो मारला गेला आणि त्याच्या खुन्याला तूं जिवंत ठेवणार ? ”

“ नाहीं, कधींच नाहीं ! ” उच्च स्वरांत अलक ओरडली.

“ आणि बेटा, लक्षांत ठेव, त्याला काहीं संशय येऊं देऊं नकोस आणि अगदीं त्याच्या काळजावरच नेम धर ! ” अलकवरील दयाळचा राग बराच मंदावला.

अस्वस्थ चित्तानें येरझाऱ्या घालतांना मध्येंच ती थांबली आणि मंद स्वरांत म्हणली, “ घोड्याच्या टापा वाजताहेत बरं का. इतक्यांत ते आंत येतील, पण—अरे देवा ! ते माझे पति ना ? पण—त्यांच्या तोंडाकडे मी मुळीं पाहणारच नाहीं. ह्या ओसरीकडील दरवाजानं ते आंत येणार. ते पलीकडे आले, कीं आडूनच मी त्यांना मारीन.” तिनें जंबिया वर उचलला. “ दयाळ, ते आले बरं का ? तेच असणार ! ”

आलेला हुंदका प्रयासानें दाबून ती पुढें म्हणाली, “ पण दयाळ, त्यांचा तो सुंदर चेहरा माझ्या ह्या तहानेलेल्या दृष्टीला दिसला म्हणजे माझा हात त्यांना मारायला वहावेल तरी कसा ? छे-छे ! ते पड्याच्या पलीकडे आले, कीं मी हा जंबिया खुपसणार ! ” पड्याजवळ जंबिया उगारून ती उभी राहिली.

“ हां, बरोबर. नेम चुकतां कामा नये, गय होतां उपयोगी नाहीं. कारण असं बघ अलक, त्याचा प्राण जयपुरीं तूं वांचविला होतास ! तेव्हां त्याचा प्राण घेण्याचा तुला हक्कच आहे ! ”

तिनें विश्वासरावाला मारावें अशी दयाळची इच्छा; पण तिला उत्तेजन देण्यासाठीं त्यानें शब्द मात्र अगदीं अयोग्य योजले. कारण त्यामुळें अलकचा आतांपर्यंत सुन्न असलेला मेंदू पुन्हा विचार करण्याला समर्थ झाला.

“ जयपुरीं ? होय ग बाई, तिथंच ! मराठ्यांच्या छावणींत कित्ती आजारी होते ते ! पण मला पहातांच तापानें कोमेजलेले त्यांचे ते मोहक डोळे कसे पण प्रफुल्लित होत ! . होऽ ! ते माझेच आहेत ! रात्रंदिवस श्रम करून मीं त्यांना काळाच्या दाढेंतून ओढून आणलं ! जयपुरींच नाहीं का ? होय, तिकडेच ! मी त्यांच्यावर किती प्रेम करीत होतें ! होते कां ? मी आत्तांसुद्धां त्यांच्यावर प्रेम करतें ! कां नाहीं करणार ? माझे पति ना ते ? आणि इतक्यांत ते आंत

येणार ! मला भेटायला येणार ! मी आज नववधू—त्यांची विवाहित वधू—अग बाई, आणि मी त्यांना मारणार होतें ! देवा रे देवा ! मला क्षमा कर. माझं डोकं ठिकाणावर नव्हतं."

अलकनें जंबिया खालीं केला.

त्याबरोबर शंकित होऊन दयाळ तिच्याजवळ येऊन किंचाळला, " हं, तूं घेतलेल्या शपथेची आठवण कर ! "

" होय तर ! विवाहकालीं घेतलेल्या शपथांचीच मी आठवण करीत आहें ! आर्य पतीची पतिव्रता पत्नी आहें मी ! "

" अस्सं ? लहर फिरली वाटतं ? पण पोरी, माझ्या अमूल्य शपथेची मला चांगलीच आठवण आहे बरं ! " डोळे बारीक करून हेंटाळणीच्या स्वरांत एवढें बोलून अलकच्या हातांतील जंबिया घेण्यासाठीं दयाळ पुढें झाला.

त्याबरोबर पडद्याकडे पाठ करून अलक ताठ उभी राहिली. " हां. खबरदार पुढं येशील तर ! माझ्या प्रिय पतींना मारायला मला प्रवृत्त करणाऱ्या पातक्या, लांब उभा रहा ! "

" काय ? तूं त्याला मारणार नाहींस ? "

" कुणाला ? माझ्या पतींना ? " मृदु हास्य करीत अलक उद्गारली, " अरे वेड्या, एकनिष्ट भक्त कधीं देवावर घाव घालतो वाटतं ? "

" ठीक आहे. मग तुझ्या कर्तव्याची मी समाप्ति करतों. त्यांचीं पावलें वाजताहेत. चल, आण तो जंबिया इकडे."

पण अलकच्या डोळ्यांत आतां निश्चयाचें पाणी चमकत होतें. जंबिया धरलेला उजवा हात उगारून ती म्हणाली, " मागं हो, नाहीं तर मी तुलाच मारीन ! ते माझे पति आहेत ! तुझ्याविरुद्ध, साऱ्या जगाविरुद्ध, माझ्या प्रतिज्ञेवर आनंदानं उदक सोडून मी त्यांचंच रक्षण करीन ! " निराशेनें बेफाम झालेली अलककुमारी फारच सुंदर दिसत होती. चंद्रप्रकाश तोंडावर पडल्यानें ती मानवी तरुणी न दिसतां स्वर्गींची देवांगना भासत होती. निराशा व दृढनिश्चय तिच्या मुखकमलावर मूर्तिमंत उठून दिसत होते. विश्वासराव जिवंत राहोत कीं बळी पडोत, आपण आजपासून त्यांच्या प्रेमाला आंचवलों हें पूर्ण ठाऊक असल्यामुळें तिची चर्या निराश झाली होती. तिनें घेतलेला ऐटबाज पवित्रा तिला न कळत तिच्या नाजुक शरिराची शोभा वाढवीत होता.

दयाळ थबकला. त्याला मरणाची भीति वाटत नव्हती, तर कर्तव्यपूर्ति झाल्या-खेरीज मारण्याची त्याला भीति वाटत होती. अलक आतां आपल्यावर उलटली आहे, वेळ पडली तर खरोखरीच आपल्याला ती मारील हें त्याला उमजलें; पण तो धूर्त होता. धीर न सोडतां लुच्चेगिरीनें तो म्हणाला, "अलक, तुझं हें शौर्याविष्करण फुकट आहे. तूं त्याचं रक्षण करण्याचं कांहींच कारण नाहीं. तो पहा इकडे तुझ्यामागं उभा आहे!" अलकनें साहजिकच मान वळवून मागें पाहिलें.

एका क्षणाचाही विलंब न करितां दयाळने तिच्या हातावर झडप घातली व आपल्या पोलादासारख्या टणक बोटांनी तो जंबिया काढून घेतला. नंतर आपल्या मोकळ्या हातानें त्यानें तिला खेंचून जाजमाकडे नेली, व एका कोंपऱ्यांत तिला जबरीनें बसवून तो पडद्याजवळ, ती उभी होती त्या जागीं येऊन उभा राहिला. विश्वासरावाचें पाऊल पडद्याच्या पलीकडील बाजूला वाजलें. कीं घाव घालावयाचा अशा तयारीनें तो जंबिया सरसावून उभा राहिला. बाहेर पावलें वाजत होतींच. अलक दयाळच्या जवळ येऊन कांहीं बोलणार तोंच त्यानें डाव्या हातानें तिचा नाजूक गौर गळा दाबून धरला. तरीही हंसरा चेहरा करून अस्पष्ट स्वरांत ती म्हणाली, "दयाळ, असं रे काय करतोस? माझं कर्तव्य मला करूं दे. माझं पुण्य तू कां घेतोस? मी चौहानकुळांतली आहें हें विसरूं नकोस. दे बघूं तो जंबिया मला!"

ह्यावर दयाळ तुच्छतेनें हंसून म्हणाला, "विश्वासघातकी पोर कुठली! ह्यः! शहाणा मनुष्य एकदांच फसत असतो. पुरे कर हें सोंग आणि नीट डोळे उघडून तुझ्या पतीचा मी कसा मुडदा पाडतों तें बघ!"

"दयाळ, दया कर. त्यांना मारूं नकोस लहानपणीं माझे अगदीं बारीक-सारीक हट्टसुद्धां तूं कोडकौतुकानं पुरवीत होतास ना? त्याचप्रमाणं तुझ्या लाडक्या अलकला आज एवढी पतिप्राणाची भिक्षा घाल. दयाळ, लग्नाच्याच दिवशीं—मला सौभाग्यदान मिळालं त्याच दिवशीं—मला विधवा करूं नकोस!" आतां पावलें अगदींच जवळ वाजलीं व त्याबरोबर आपल्या शक्तीबाहेर जोर करून अलकनें दयाळच्या हाताचा आपल्या गळ्यावरील फांस कांहींसा सैल केला व शक्य तितक्या मोठ्यानें ती ओरडली, "नाथ, आंत शिरूं नका. माझ्यासाठीं—आपल्या लाडक्या अलकसाठीं—मागं सरा, आणि दुसऱ्या दारानं आंत या."

परंतु आपल्या पत्नीनें अत्यंत आवेगानें उच्चारलेले असले शब्द ऐकून कुठला

पति मागें सरेल ! उलट ती संकटांत आहे असें वाटून तो जास्तीच लगट करून आंत शिरेल ! आणि झालेंही तसेंच. बंद दरवाजा बाहेरच्या बाजूला उघडला गेला. पडद्यामागें कुणाची तरी ओझरती आकृति दिसते तोंच, पडदा दूर सरण्याच्या अगोदर, दयाळनें आपली सारी शक्ति एकवटून, पडद्या पलीकडील अलकच्या प्रिय व्यक्तीच्या हृदयांत लागोपाठ दोन वेळां जंबिया खुपसला! पडदा फाडून जंबिया परत आला, तो बरोबर रक्ताच्या चिळकांड्या घेऊनच आला. एकवारच एक अस्पष्ट दुःखाचा ध्वनि बाहेरून ऐकूं आला. नंतर धपकन् आवाज होऊन पडद्यापलीकडील ती व्यक्ति खालीं जमिनीवर आपटली व पूर्ववत् शांतता झाली.

दयाळ खिडकीवाटें पसार झाला. रक्तानें लाल झालेला तो जंबिया अद्यापि त्याच्या हातांतच होता. अलक एखाद्या वेडीसारखी त्याच्या पाठीमागें धावली, "दयाळ, माझ्या पतींना मारलेंस, आतां त्यांच्यावर प्राणाहून अधिक प्रेम करणाऱ्या त्यांच्या पत्नीलाही मारून टाक ! मला वैधव्याचें दुःख भोगायला ठेवूं नकोस !"

पण दयाळ केव्हांच पसार झाला होता. अलक आतां दाराकडे वळली. परंतु तो रक्ताचा सडा–तिच्या प्रियपतीच्या अमूल्य रक्ताचा तो सडा–पाहतांच ती थबकली. "सूडाचं रक्त इतकं लाल असतं, नाहीं ?" असें पुटपुटून तिनें भीषण हास्य केलें आणि दुसऱ्याच क्षणीं मोठ्यानें एक हृदयद्रावक किंकाळी फोडून ती जमिनीवर मूर्च्छित होऊन पडली.

## प्रकरण तेविसावें

# पडद्यामागील व्यक्ति

ती हृदयद्रावक किंकाळी मुराररावानें व तारेनें ऐकली. अलक मूर्च्छित होऊन खालीं पडली, तोंच तीं दोघें आंत शिरलीं. तारा धांवतच अलककडे गेली, व खालीं बसून अत्यंत प्रेमानें तिनें अलकचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें. कारण कांहीं झालें तरी अलकचें आपल्या दादावर फारच प्रेम आहे अशी तारेची खात्री होती.

मुरारराव आंत शिरतांच चमकला. आजुबाजूला न्याहाळून पाहून त्यानें वस्तुस्थितीबद्दल बरीचशी यथार्थ कल्पना केली. नंतर आंतील दारानें बाहेर जाऊन त्यानें नोकरमाणसांना हांका मारल्या, पण कोणीच ओ देईना. आणि होतें कोण घरांत ! दुर्जनसिंहानें साऱ्या नोकरमाणसांना आनंदाप्रीत्यर्थ म्हणून संध्याकाळींच सुटी देऊन गांवांत पाठवून दिलें होतें.

मुराररावानें तारेच्या मदतीनें अलकला उचलून पलंगावर झोंपविलें. तिच्याकडे स्नेहानें पहात तारेनें विचारलें, " हिची अशी स्थिति झाली तेव्हां दादाची काय अवस्था झालेली असेल ?

" ही इतक्यांत शुद्धीवर येईल. अशी घाबरूं नकोस, जरा थांब. ती स्वतःच सर्व सांगेल. "

" पण ही जिवंत तरी आहे ना ? "

" अग, असं काय करतेस ? तिला कसला तरी धक्का बसला आहे व त्यामुळें तिला मूर्च्छा आली आहे दुसरं कांहीं नाहीं. वैद्यकशास्त्राची मला बरीच माहिती आहे, हें तुला ठाऊक आहे ना ? "

" होय."

" बरं तर, मग आतां मी धंदेवाईक वैद्य आहें असें समज आणि तेवढी तांब्यापंचपात्री इकडे घे." अलकला शुद्धीवर आणण्यांत मुरारराव पूर्णपणें गुंतला.

तारे, एखादा कांदा ठेंचून आणशील काय ? "

" हो, आणतें; पण दादाचं काय ? "

" पळत जा, आणि कांदा आण बघूं. "

" पण दादा—"

" हें बघ, आधीं कांदा आणि मग दादा. जा पळ बरं."

परिस्थितीचें गांभीर्य कमी होऊन तारेच्या मनाला हलकें वाटावें म्हणून मुरारराव उसन्या उल्हासानें विनोद करीत बोलला. तारा गेल्यावर तो अलकचें लक्षपूर्वक निरीक्षण करूं लागला. तिचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता व तिच्या नाजुक ओष्ठद्वयाच्या सभोंवार दुःखाच्या रेषा उमटल्या होत्या. मधून मधून तिचे ओंठ किंचित् हालून तिच्या जिवंतपणाची खात्री पटवीत होते. पहातां पहातां मुरार-रावाला तिच्या शुभ्र ओढणीवर एक लाल डाग आढळला. विशेष बारकाईनें पहातां तसाच आणखी एक डाग आढळला. नंतर तो जमिनीवर तपास करीत पुटपुटला, " रक्त तर खास! हिच्या मानेवर वण आहेत पण जखम कांहीं दिसत नाहीं. मग हें ताजं रक्त कोणाचं? अरेच्या! हें तर पडद्याच्या खालून ठिबकतंय्."

दचकून मुरारराव उठला व पडदा उचलून शोध लावणार तोंच तारा आंत आली व त्याबरोबर तो मागें सरला. ती खोलींत असतांना तपासणी करण्याची त्याला भीति वाटली. न जाणों, कांहीं भलतेंच झालें असलें तर तारेला अलकसारखाच धक्का बसायचा. म्हणून विचाराअंतीं त्यानें अलकलाच शक्य तों लौकर शुद्धीवर आणण्याकडे सारें लक्ष लाविलें.

आतां थोडक्याच वेळांत ती शुद्धीवर येईल असें वाटतांच मुरारराव तारेकडे वळून म्हणाला, " तारे, लाडके, तूं माझं ऐकशील का? शुद्धीवर येतांक्षणींच हिनं तुला पहावं अशी माझी इच्छा नाहीं. तेव्हां तूं आतां आपल्या खोलींत जा. कळविण्यासारखं कांहीं झालं तर मी लगेच येऊन तुला कळवीन हं. काय? जातेस ना मग?"

" म्हणजे! आपल्याला भीति वाटते कीं काय?"

तिनें एकदम घाबरून जाऊं नये म्हणून मुराररावानें तिचा हात आपल्या हातांत घेऊन प्रेमळपणें म्हटलें, " तुला पाहून तिच्या मनावर अनिष्ट परिणाम होईल अशी मला भीति वाटते!"

" अंहं. मला धक्का बसेल म्हणून आपण भितां! माझ्या दादाच्या जीविता-बद्दल आपण साशंक आहां; पण असली संशयात्मक स्थितीच जास्ती दुःख-दायक नाहीं काय? ओसरीकडील दरवाजाकडे मीं जाऊं नये म्हणून आपण पडद्याच्या व माझ्यामध्यें एकसारखे उभे रहातां ते का? मी इकडे नसतांना

आपल्याला जास्ती कमी कांहीं तरी कळलं आहे; पण आपण मला सांगायला मागं घेतां, होय ना ?" इकडे तारेच्या तोंडून एक दाबलेला दुःखोद्गार बाहेर पडला. कारण अलक आतां शुद्धीवर येऊन अर्धवट उठून बसली. 'वधू आणि विधवा' असें पुटपुटत तिनें हाताचीं बोटें काड्कन् मोडलीं. मुरारराावानें तिचा हात धरून ठेवला नसता तर तारा लगेच अलकजवळ धांवत गेली असती.

अलक आतां पलंगावरून खालीं उतरली. तिचे पाय लटलटत होते. पलंगाला धरून तिनें दोन पावलें टाकलीं व मुरारराावाकडे लक्ष जाऊन आश्चर्यकारक, शांत स्वरांत तिनें विचारलें, "तुम्ही इकडे ! हं-हं, आम्हांला वांचवायला आलांत वाटतं ? पण किती हा उशीर केलात ? आणि त्यांचं शरीर कुठं आहे ?"

मुरारराव थक्कच झाला ! काय बोलावे तेंच त्याला सुचेना. पण तारेला प्रसंगानें धीट बनविलें. चट्कन् अलकजवळ जाऊन ती म्हणाली, "कुणाचं शरीर ग ? अरे देवा ! अलक, दादाचं तर शरीर नव्हे ना ?"

"हो. तुझ्या दादांचं आणि माझ्या पतीचं !" पुन्हा अलक दुःखानें व निराशेनें कांहींतरीच बरळूं लागली. "माझे पति ! आणि ह्या माझ्या डोळ्यांसमोर त्यांचा खून झाला ! अगऽबाई, त्यांचीं पावलं वाजताहेत ! होय, त्यांचींच तीं ! त्यांचा पदरव एकसारखा माझ्या कानांत घुमतो आहे. बरोबरच आहे; येणार ना होते ते माझ्याजवळ ! मग, येणारच ते ! एकसारखे येणार ! हो, पुन्हा म्हणतें मी, येणार ते ! काय हो, तुम्हांला नाहीं का ऐकूं येत ?"

"हें आहे तरी काय ? खरोखरीच ह्या आंतील दाराकडे पावलें वाजताहेत !" मुरारराव उद्गारला.

"दादाच्याच पावलांचा आवाज हा ! हो गडे, दादाच येतो आहे !"

"होय, पण हीं मृताचीं पावलें आहेत !" अलक उत्तरली.

"नाहीं ग नाहीं. चांगलीं बरीं जिवंत माणसाचींच आहेत हो !" घाईघाईनें तारा आंतील दाराकडे जाते, तोंच दाराचा पडदा बाजूला सारून हंसरा, आनंदी विश्वासराव आपल्या नूतन पत्नीला भेटण्यासाठीं उत्सुकतेनें आंत आला. पण तारेला तेथें पाहून चकित मुद्रेनें तो म्हणाला, "तारे, तूं आणि इकडे ? आं ! अलक ! काय होतंय तुला ?"

अलकची स्थिति आतां फारच केंविलवाणी झाली होती. दारुण भीतीनें तिचे डोळे वटारले गेले होते. विश्वासरावाच्या तोंडाकडे तिनें पाहिलें मात्र, आणि ती

मोठ्यांदा ओरडली, " अरे देवा, आपल्या मृत्यूबद्दल मला जाब विचारायला हें त्यांचं भूत आलं आहे ! "

विश्वासराव पुढें होऊन प्रेमळपणें म्हणाला, " अलक लाडके ! असं काय बरं करतेस ? मी विश्वास तुझा पति आहें."

परंतु अलक मागें मागें सरकत होती.

त्याला दूर जाण्याची हातानें खूण करून ती म्हणाली, " अंहं, आपण माझे पति नव्हे. आपण त्यांचं भूत ! माझ्या पतीचं शरीर त्या पडद्यामागें आहे ! " तिचे डोळे आतां प्रेमानें मृदु झाले, " देवा, मलाही ह्यांच्यासारखं भूत कर ना ! हे पहा, मृत्यु पावल्यामुळें भाईच्या रक्तानं कलंकित झालेले आपले हात आतां पवित्र झाले आहेत. मी आपणावर भारी प्रेम करतें आणि भाईला आपण मारलंत तरी भाईच्या प्रेमाशीं बेइमान न होतां मला आतां आपणावर प्रेम करितां येईल ! " तिचे डोळे विश्वासरावाच्या तोंडावर खिळले होते.

" म्हणजे ! माझी पत्नी वेडी झाली कीं काय ? " विश्वासराव हतबुद्धच झाला.

" नाहीं, अद्यापि ती वेडी झाली नाही; पण हें असंच चाललं तर मात्र ती वेडी होईल." विश्वासरावाच्या जवळ येऊन मुरारराव म्हणाले.

" अं ? तुम्ही कोण ? " विश्वासरावाचें आतां पहिल्यांदाच मुराररावाकडे लक्ष गेलें.

" मी तुम्हांला व तुम्ही मला परस्पर अनोळखी निघालों हे देवाचेच उपकार ! मी मुरारराव माने ! " विश्वासराव आंत आल्यापासून मुरारराव त्याच्याकडे लक्ष-पूर्वक व जिज्ञासेनें पहात होता. आता त्यानें समाधानाचा एक निःश्वास सोडला.

" म्हणजे आमच्या तारेचे प्रियकर ? "

" होय. कांहीं वेळापूर्वी मी सिरोहीस आलों. हा विवाह थांबवावा म्हणून मीं कितीतरी धडपड केली; पण तें सर्व मी मग सांगेन तुम्हांला. मघा तुमच्या बहिणीनें व मीं एक किंकाळी ऐकली म्हणून आम्ही इकडे धांवून आलों. तुमची पत्नी मूर्च्छित होऊन खालीं पडत होती. तुमचा खून झाला असा त्यांचा समज झाला आहे !

" माझा खून ? हट् ! पण मी जिवंत आहें हें तिच्या डोळ्यांना नाहीं का दिसत ? "

" होय. डोळ्यांना दिसतं, समजतं, पण मनाला उमजत नाहीं ना ! हें पहा, मला वैद्यकशास्त्राची बरीच माहिती आहे."

" मग ! "

" तेव्हां आजच्या रात्रीपुरता मी तुम्हां दोघांचा चिकित्सक होतों."

" खरंच ! ठीक आहे. मुरारराव, काय वाटेल ते करा; पण माझ्या लाडक्या अलकचं मन ताळ्यावर आणा. जन्मभर मी तुमचे उपकार स्मरेन ! " आणि हें बोलत असतां त्या शूर तरुणाच्या डोळ्यांत अश्रु आले.

" माझ्या सांगण्याप्रमाणं अगदीं अक्षरशः वागाल ! "

" जरूर वागेन ! " शिस्तीची संवय असलेल्या विश्वासरावानें ताबडतोब उत्तर दिलें.

" ठीक आहे. मी शक्य तेवढा प्रयत्न करतों. आतां तुम्ही आपल्या पत्नीकडे जा. बळजबरी न करितां, प्रेमाने, गोडीनें तिला जवळ घेण्याचा प्रयत्न करा. तिच्या चर्येकडे नीट लक्ष ठेवा, व ती तुमच्याजवळ काय, कसें बोलते तेंही लक्षपूर्वक ऐका."

हें बोलणे चाललें असतां, विश्वासरावाच्या सुरक्षिततेबद्दल तारा प्रेमळपणें अलकची खात्री करीत होती; पण तिकडे लक्ष न देतां अलक हळूहळू त्या पडद्याजवळ गेली; परंतु पलीकडे काय आहे ते पाहण्याचें धैर्य न झाल्यानें ती थरथर कांपत परत आली.

हें सारें मुराररावाच्या तीक्ष्ण नजरेंतून सुटलें नाहीं.

मुराररावाच्या सांगण्याप्रमाणे विश्वासरावानें अलकच्या जवळ जाऊन तिला हलकेच हांक मारली.

त्याबरोबर दचकून अलक मागें सरकली. आणि दूर उभी राहून प्रेमपूर्ण नजरेनें त्याच्याकडे पहात म्हणाली, " आपल्याप्रमाणं मींही ह्या देहाचा त्याग केला म्हणजे मग आपण दोघं स्वर्गांत प्रेमानं राहूं हं. पण आत्तां—छे बाई, आपण भूत आहांत. आपलं शरीर, ते बघा, त्या पडद्याच्या मागं आहे !

ती हें बोलत असतां विश्वासराव तिच्याजवळ आला. त्यामुळें त्याचें लक्ष तिच्या नाजुक गळ्यावर उठलेल्या दयाळच्या बोटांच्या खुणांकडे गेलें. त्याबरोबर रागानें तो ओरडला, " ह्याचा अर्थ काय ! कोणीतरी हरामखोरानें माझ्या

ह्या देवीचा खून करण्याचा प्रयत्न केला आहे. तिचं शरीर शाबूत राहिलं; पण तिच्या बुद्धीचा मात्र खास खून झाला ! ”

अलकचा इतका वेळ फटफटीत असलेला चेहरा आतां रागानें लाल झाला. “ होय, होय. त्याच दुष्टानं ह्या खुणा पाडल्या; आणि तरीदेखील समाधान न होतां मेल्यानं आपला खून केला. नष्ट ! हरामखोर कुठला ! ”

मुराररावानें आतां चटदिशीं विश्वासरावाला बाजूला नेलें, व कर्तव्यकठोर स्वरांत तो म्हणाला, “ माझ्या सांगण्याप्रमाणं वागण्याचं कबूल केलंत तें असंच वाटतं वागणं ! तुम्हीं स्वतः जर शांतवृत्ति ठेवली नाहींत तर तिचं मन शांत होणं कधींतरी शक्य आहे का ? ”

एखाद्या वेड्यासारखे हातवारे करून अलक स्वतःशींच पुटपुटत होती. तिचें समाधान करावयाला मुराररावानें तारेला सांगितलें.

अलकची ती करुण अवस्था पाहून विश्वासराव म्हणाला, “ शांत वृत्ति ठेवूं ? मुरारराव, हें सांगायला ठीक आहे, पण कृतींत आणणं कठीण आहे. बस्स ! आतां सूडाशिवाय कांहीं नाहीं. माझ्या प्रिय पत्नीच्या मतिभ्रंशाला कारणीभूत होणारा कोण तो हरामखोर ? तुम्हांला त्याचं नांव ठाऊक आहे ? ”

“ सध्यां तो विचार नको. तुमच्या पत्नीच्या मनःस्थितीकडे अगोदर लक्ष पुरविलं पाहिजे ती जेवढी जास्त वेळ ह्या स्थितींत राहील, तेवढं तिचं डोकं ताळ्यावर येणं जास्त कठीण होईल. काळ हा सगळ्या शारीरिक, मानसिक जखमा भरून काढतो, हें खरं आहे, पण वैद्यकशास्त्राचा अनुभव असल्यामुळं मी तुम्हांला सांगतों कीं, त्यांच्या बुद्धीला जो भ्रम झालेला आहे तो जर आज—आत्तांच्या आत्तां—दूर केला नाहीं, तर तो दूर होणं महा दुरापास्त आहे. हा अनुभव खात्रीचा असल्यामुळें मी आतां एक प्रयोग करून पाहणार आहें. जर तो यशस्वी झाला नाहीं तर त्यांत धोका आहे. तेव्हां बोला, तो करावयाला तुमची परवानगी आहे ? ”

“ काय करणार तुम्ही ? कशासाठीं परवानगी ? ” आनंदाच्या अत्युच्च शिखरावरून दुःखाच्या खोल दरींत पडल्यामुळें विश्वासरावाचें धैर्य खचलें होतें.

“ असे खचून जाऊं नका. मी सांगतों तें लक्षपूर्वक ऐका. तुम्ही येण्याच्या आधीं तुमची पत्नी शोकानं वेडी झाली होती; पण त्यांची बुद्धि शाबूत होती. तुमचा खून झाला अशी त्यांची समजूत झाली; त्यामुळं तुम्हांला पाहिल्यापासून

त्या तुम्हांला भूत समजतात. तुमचं शरीर त्या पडद्याच्या मागं आहे असं त्या घोकतात."

" बरं पुढं ? "

" पुढं काय ? त्या पडद्याच्या मागें असलेलं शरीर तिला दाखवा ! "

" म्हणजे ! त्या पडद्याच्या मागं शरीर आहे अशी तुमची खात्री आहे ? "

" नाही. मला तशी आशा आहे ! "

" तुम्हांला तशी आशा आहे ? म्हणजे ! " आश्चर्यात्मक भीतीने विश्वासरावानें मुराररावाच्याच शब्दाचा प्रश्नार्थक पुनरुच्चार केला.

" म्हणजे असं कीं, तुमच्या पत्नीच्या मेंदूची शाबुती व तुम्हां दोघांच्या सुखाची शाश्वति ह्या एका गोष्टीवर अवलंबून आहे. मी तो पडदा बाजूला सरकवला, आणि त्याच्या पाठीमागं कोणी नसलं तर अलककुमारी पुरी वेडी होईल, म्हणजे सध्यां आहे तशीच राहील. तुमचा खून झाला आहे ह्या भ्रामक कल्पनेचा तिच्या मनावर एवढा जबरदस्त पगडा बसला आहे कीं, तुम्हांला प्रत्यक्ष पाहूनसुद्धां तिची ती कल्पना दूर होत नाहीं. देवाच्या दयेनं त्या पडद्याच्या पाठीमागें शरीर निघालं म्हणजे तें पहातांक्षणींच ते तुमचं नाहीं अशी खात्री होऊन त्यांची ती भ्रामक कल्पना दूर होईल ! "

" एकूण कोणाचा तरी खून झालेला आहे अशी तुमची अटकळ आहे तर ? "

" अर्थात्च ! " न डगमगतां मुरारराबानें उत्तर दिलें.

" अस्सं ! पण कोणाचा ? "

" तें मला ठाऊक नाहीं, पण माझं मन मला अशी ग्वाही देतं कीं, ईश्वरानं ह्या वेळीं न्यायाचा कांटा समतोल केला आहे. सत्याचा जय झाला आहे ! तेव्हां विश्वासराव, सांगा, आहे का तुमची परवानगी ? त्यांत धोका आहे हें मी सांगतोंच आहें ! "

" चला, करा काय तें ! ईश्वरावर व तुमच्यावर विश्वास ठेवून मी परवानगी देतों ! "

" ठीक, तयारींत रहा. तुमचं काम हें कीं, मीं खूण करतांच तुम्हीं हा पडदा बाजूला सारावयाचा ! बस्स ! "

मुरारराव आतां अलककडे वळला. अलक व तारा खोलीच्या मध्यभागीं उभ्या होत्या व ह्या दोघी आणि तो घातक पडदा ह्यांमध्यें विश्वासराव होता.

प्रत्येक शब्द काळजीपूर्वक योजीत मुरारराव अलकला म्हणाला, "बाईसाहेब, तुमच्या पतीचं शरीर ह्या पडद्याच्या मागें आहे असं तुमचं म्हणणं आहे ना ?"

"म्हणणं नव्हे हो; माझी तशी खात्री आहे ! जवळ येणाऱ्या त्यांच्या पावलांचा आवाज मीं ऐकला. पडद्याला दोन वेळां भोंकं पाडून गेलेला तो दुष्ट जांबिया त्या प्रेमळ हृदयांत खुपसलेला मीं पाहिला. त्यांच्या तोंडून अस्पष्ट उमटलेला यातनादर्शक ध्वनि मीं ऐकला. त्यांचं निष्प्राण शरीर धप्दिशीं खालीं पडलं तो आवाजही मीं ऐकला. फार काय सांगूं, त्यांचा खून झाला अशी जर माझी खात्री नसती तर मीं त्यांना, ( विश्वासरावाकडे बोट दाखवून ), माझे पति नसतं का म्हटलं ? अगबाई ! बघा-बघा हो, ते आपल्याच रक्तांत आपले पाय माखून घेताहेत ! अरे देवा !"

मुराररावानें वळून पाहिलें तों विश्वासरावाच्या पायाच्या आजूबाजूला खरोखरीच रक्त पसरलें होतें.

आपली अटकळ बरोबर आहे अशी खात्री होऊन मुरारराव पुन्हा तिला म्हणाला, "होय. इथपर्यंत तुमचं म्हणणं बरोबर आहे. तुम्हीं पदरव ऐकलात, पण तो तुमच्या पतीचा नव्हता. पडद्यापाठीमागें तुम्हीं कोणाची तरी. आकृति ओझरती पाहिलीत; पण ती तुमच्या पतीची नव्हती. तुम्हीं अस्पष्ट आवाज ऐकलात, पण तो तुमच्या पतीच्या तोंडचा नव्हता, आणि तिकडे पडलेलं निष्प्राण शरीरही विश्वासरावांचं नाहीं, तर—" इकडे मुराररावानें खूण केली विश्वासरावानें पडदा बाजूला सारला.

'अस असेल का ! देवा, हें खरं होईल का ?' असें पुटपुटणारी अलक, पडदा सरतांच पुढें धांवली आणि आनंदानें ओरडली, "अहाहा ! माझे पति जिवंत आहेत तर ! केवढी ही देवाची कृपा ! मीं त्यांना मारतांना पहावं म्हणून आला होता त्याचंच हें शरीर !"

कारण छातीमध्यें हृदयाजवळ दोन खोल जखमा झालेलें दुर्जनसिंहाचें मृत शरीर पडद्याच्या मागें पडलेलें होतें.

"अगबाई ! काकाजी !" तारा भीतीनें ओरडली.

"अरेरे ! माझा मित्र !" असें दुःखानें पुटपुटून विश्वासराव दुर्जनसिंहाचें शरीर उचलण्यासाठीं वांकला; पण मुराररावानें पडदा बंद करून म्हटलें, "त्याचा कांहीं उपयोग नाहीं. हा नरपशु अर्ध्या घटकेपूर्वीच मत झालेला आहे. माझ्या

तर्काप्रमाणें सत्याचा जयच झाला आणि विश्वासराव, तुमच्यासाठीं खणलेल्या खाड्यांत तुमचा शत्रु पडला !

" माझा शत्रु ! काय बोलतां हें ? मृताच्या पवित्र स्मृतीवर असे शिंतोडे उडवूं नका. माझ्या सुखसर्वस्वाची ठेव–माझी पत्नी–त्यांनींच माझ्या स्वाधीन केली ! "

" होय ना ! मग तुमच्या पत्नीलाच विचारा, म्हणजे त्यानें तुम्हांवर केवढा उपकाराचा डोंगर करून ठेवला आहे तें नीट कळेल ! " शुष्क स्वरांत मुरारराव उत्तरला.

परंतु अलककडे एकवार प्रेमानें पाहून विश्वासराव म्हणाला, " तिला विचारायचं तरी काय कारण आहे ? पहा, त्यांच्यासाठींच–तिच्या पितृतुल्य पालकासाठींच— ती रडते आहे ! "

" त्याच्यासाठीं ? त्या नीचासाठीं ? मुळींच नाहीं ! " आपल्यामध्यें व आपल्या प्रिय पतीमध्यें ह्यापुढें पूर्ववत् प्रेम रहाणें शक्य नाहीं हें पूर्णपणें लक्षांत आल्यामुळें अलकचें मुखकमल निराशेनें सुकलें होतें. तरीही आपल्या डोळ्यांत दुर्जनसिंहासाठीं आसवें उभीं आहेत असा विश्वासरावाचा समज झाला असें वाटतांच तिला रागाचा झटका आला. " त्याच्यासाठीं, आणि मी रडणार ? मी रडतें ती आपलं प्रेमविधीनं जोडलं गेलं त्याच दिवशीं तें दैवगतीनं तोडलंही जात आहे म्हणून. मुरारराव, माझ्या बुद्धीला भ्रम झाला होता ती स्थिति बरी होती हो. मी अजिबात वेडी झालें असतें तरी ह्याहून सुखी असतें ! "

" हें काय बरं अलक ? हा पूर्वींहून जास्त वेडेपणा नव्हे का ? आपलं प्रेम तोडलं गेलं, म्हणजे काय ? आपण आज जन्माचीं बद्ध झालों. तूं माझी लाडकी पत्नी, आणि असं काय बोलावं ? "

त्यांनीं प्रेमानें अलकच्या कंबरेभोंवतीं हात घातला; पण एकाएकीं चमत्कारिक अंगविक्षेप करून अलक त्यांच्या हातांतून आपल्याला सोडवीत ओरडली, " मी आपली पत्नी खरी; पण आपण माझ्या भावाला मारलंत ! प्रेमाचे बंद तोडायला याहून तीक्ष्ण धारेचं शस्त्र कशाला पाहिजे ? सारं संपलं. एक घाव नि दोन तुकडे झाले ! "

## प्रकरण चोविसावें

# हकीम मुरारराव

अलकच्या ह्या भाषणानें तारा व मुरारराव ह्या दोघांपेक्षां विश्वासरावाला अधिक आश्चर्य वाटलें. त्या दोघांना थोडीबहुत कल्पना होती; पण निरभ्र आकाशांत एकाएकीं वीज चमकावी त्याप्रमाणें विश्वासरावाला हें अचानक भासलें.

युद्धामध्यें लवमात्रही न डगमगणारा तो शूर वीर, पण त्याला आतां कांहींच सुचेना. तो मुराररावाजवळ येऊन म्हणाला, " तुम्हीं एका भ्रामक कल्पनेंतून तिला सोडविलीत. आतांची ही त्याहूनही भ्रामक विचारसरणी आहे. तेव्हां यांतूनही तिला सोडवून तुम्ही मला दारुण निराशेच्या वज्राघातापासून वांचविणार नाहीं काय ? "

" एका भ्रामक कल्पनेंतून मी त्यांना सोडविलं; पण आतांच्या ह्या सत्य कल्पनेपासून त्यांना तुम्हीं आपल्या बुद्धिकौशल्यानं सोडविलं पाहिजे ! "

" काय, सत्यकल्पना ! वाः ! ठीक ! मला तिनं आपल्या भावाचा खुनी समजणं ही सत्यकल्पना ! "

" होय. दुर्जनसिंहानें दाखविलेल्या पुराव्याच्या आधारावर ती सत्यकल्पनाच असणार ! "

" पुराव्याचा आधार ! हंः ! भलतंच कांहीं तरी ! "

" फार कशाला ! तुम्ही अलककुमारीलाच विचारा म्हणजे कळेल. परंतु एक गोष्ट लक्षांत ठेवा. आपल्या डोळ्यांसमोर तुमचा खून झाला असा समज झाल्यामुळं त्यांनीं किती मानसिक क्लेश भोगले आहेत हें मनांत आणून अगदीं संभाळून बोला. त्या सध्यां किती फिकट दिसताहेत तें पाहिलंत ना ? बाकी तुम्हांला हें सांगायला नकोच. तुमच्या प्रेमाच्या डोळ्यांना हें दिसणारच." निराशा व प्रेम ह्यांच्या संयोगानें अधिकच सुंदर दिसणाऱ्या अलककुमारीकडे ओझरती नजर टाकून मुरारराव पुढें म्हणाला, " हें पहा, त्या कांहीं बोलल्या, कशाही वागल्या तरी त्यांचं तुमच्यावर निरतिशय प्रेम आहे हें मुळींच न विसरतां त्यांच्याशीं नेहमींच्या प्रेमळपणानं वागा ! "

कृतज्ञतेनें मुराररावाचा हात एकवार दाबून विश्वासराव अलकच्याजवळ येऊ

लागला; पण तें पहातांच त्याला पुढें येण्याला हातानें विरोध करीत अलक म्हणाली, " अहं. दुरूनच बोला. कृपा करून मला पुन्हा मोहांत घालूं नका. तुमच्या हाताचा ओझरता स्पर्श जरी झाला तरी मी सारं विसरून जाईन; पण माझ्या भावाला तुम्हीं मारलंत हें मी कशी बरं विसरूं ? "

" मीं तुझ्या भावाला मारलं ? कोणच्या प्रकारानं मीं त्याला मारलं तें सांगशील काय ? " मोठया प्रयत्नानें शांतवृत्ति राखीत विश्वासरावानें प्रश्न केला.

" आपण त्याला द्वंद्वयुद्धांत मारलंत ! तो मृत्यु पावेल अशी आपली कल्पना नव्हती. तो नुसता जखमी झाला असं आपण समजलांत आणि चितोड सोडून आपल्या तुकडीनं कूच करायला प्रारंभ केला होता, तिला गांठायला धांवत गेलांत. तिकडूनच पुढं मग जयपुरला गेलांत ? "

" हं–हं. तें चितोडमधील द्वंद्वयुद्ध होय ! " विश्वासरावाच्या डोळ्यांत अर्धवट स्मृतीचा प्रकाश चमकूं लागला.

" काय ! आपल्याला आठवतं ? आपण कबूल करितां ? तर मग ही आपली शेवटचीच भेट ! अरेरे ! काय झालं हें ? मी आपल्यावर माझ्या प्राणाहून अधिक प्रेम करितें; पण आतां काय त्याचं ? आतां आपण जिवंत असूनही मी विधवा ! इथून आपली वाट वेगळी फुटली ! "

विश्वासराव चट्दिशीं तिच्या जवळ आला व तिच्या खांद्यावर हात टाकून म्हणाला, " वेडी ग वेडी ! एवढ्याचसाठीं हा शेवटल्या भेटीचा शोक ना ? वाः ! अलक, मी तो इसम नव्हे ! "

" तो इसम नव्हे ? तो–इसम–नव्हे ? मुद्देसूद पुरावा दाखवून आपल्याला मारण्यासाठीं मीं हातीं जंबिया घेण्याइतकं त्या मेल्यानं माझं मन वळविलं होतं की ! "

" का–य ! मला मारण्यासाठीं ? तुझ्या पतीला मारण्यासाठीं ? " अलकच्या खांद्यावरचा त्याचा हात खालीं पडला आणि त्या क्षणापासून अलकला पुन्हा स्पर्श करण्याचा त्यानें एकदांही प्रयत्न केला नाहीं हें लक्षांत येऊन मुरारराव विस्मित झाला.

निःशक्तपणामुळें उभें रहाण्याचीसुद्धां ताकद नसतां अलकनें आतां धांवत जाऊन संदुकीवर ठेवलेल्या त्या साऱ्या वस्तु आणल्या व त्या विश्वासरावाला दाखवून बावचळलेल्या आवाजांत ती म्हणाली, " हं, ही पहा ती शकुनी मोहोर !

हिनेंच आपला प्राण वांचविला. भाईनं मारलेल्या बाणामुळं ही पहा मध्यें कशी चेंपली आहे. हा तिरकमठा. ह्यावर आपलं नांव आहे. ह्यानेंच भाईचा प्राण घेतला. आपण हें नाकबूल करतां ! आणि शेवटीं ही पहा आपल्या हस्ताक्षरांतली जबानी ! काय, हें सारं खोटं ? बोला, लौकर बोला, पण मला फसवूं मात्र नका ! ”

“ ही तिरकमठयाची जोडी माझीच आहे.” विश्वासराव विमनस्कपणें बोलत होता त्याचें चित्त द्वन्द्वयुद्धाखेरीज दुसऱ्या कसल्या तरी विषयांत गुंतल्यासारखा त्याचा स्वर भासत होता.

“ चितोड मुक्कामीं असतां, ज्या इसमानें तुझ्या भावाला मारलें त्यानेंच ही माझ्याकडून उसनी घेतली होती. ही मोहोर त्याचीच आणि ही जबानी, तो अत्यवस्थ असतां, त्याला शक्ति नसल्यानें त्याच्याकरितां मीं लिहिलेली, ही पण त्याचीच—माझा प्रिय मृत मित्र विश्राम कदम शितोळे ह्याचीच ! आम्ही जयपूरला गेलों आणि तिकडे उडालेल्या चकमकींत तो गमावला. मृत्युसमयीं मी त्याच्याजवळ होतों, तेव्हां त्यानेंच ह्या आपल्या वस्तु माझ्या ताब्यांत दिल्या. त्याचें खरें आडनांव कदम; पण तो दत्तक दिला होता आणि तें आडनांव शितोळे. वि. शि. अशीं आद्याक्षरें असलेली ही संदूकही त्याचीच ! सर्व सामान त्यांत भरून ती त्यानें आपल्या आईकडे पोंचती करण्यासाठी माझ्याजवळ दिली होती; पण मला अजून फावलें नाहीं आणि तूं ह्या पुराव्यावर विश्वास ठेऊन—”

“ मींच काय ? इतरांनींसुद्धां विश्वास ठेवला. माझ्यावरच कां आपण राग करतां ? हे मुराररावसुद्धां तशाच समजुतीवर आपला विवाह होऊं नये म्हणून झटत होते. मुरारराव, द्वन्द्वयुद्धाच्या वेळीं तुम्ही तेथें हजर होता. तर सांगा पाहूं, माझ्या पतींनीं नाहींना भाईला मारलं ? ”

“ नाहीं, ईश्वराची लीला अगाध आहे ! ह्यांनीं नाहीं मारलें; माझीसुद्धां तशीच कल्पना होती. विश्वासराव, मीसुद्धां ह्यांच्यासारखेंच समजत होतों व म्हणूनच हें लग्न मोडण्यासाठीं धडपडत होतों; पण त्या वस्ताद दुर्जनसिंहानें मला अवसरच दिला नाहीं ! ”

अलकनें त्या साऱ्या वस्तु जमिनीवर फेकून दिल्या. आनंदानें तिचें मुखकमल फुललें होतें. दुःखाच्या क्षणीं व्याकुळ व निःशक्त झालेली अलक आनंदाच्या

काळीं, मानसिक स्वास्थ्यापुढें शारीरिक अस्वास्थ्य विसरून गेली. "ह्या पुराव्याच्या जोरावर मी आपल्याला मारीन असें त्याला वाटलें. अहाहा ! देवानें केवढी बरं दया केली ! आतां मी पूर्ण सुखी होईन !" असें बोलून ती प्रेमानें विश्वासरावाच्या जवळ गेली; पण विश्वासरावानें तिला दूर लोटलें व धिक्कारयुक्त स्वरांत तो म्हणाला, "मुरारराव, आमचं लग्न मोडण्यासाठीं तुम्हीं याहून जास्ती प्रयत्न करायला हवा होता, म्हणजे तुम्ही यशस्वी झालां असता !"

वीज कडकडून अंगावर पडावी त्याप्रमाणें थरथर कापत अलक व्याकुळ होऊन मागें मागें सरकली.

"हाय !—" हें असें होणार म्हणून मला स्वप्नच पडलें होतें ! जर हे खरे-खुरे दोषी असते तर मी त्यांची पत्नी होणें माझ्या मनाला रुचलें नसतें, आणि जर हे निर्दोषी असले, तर ते मला कधींच क्षमा करणार नाहींत ! मिळून कांहीं झालें तरी माझ्या कपाळीं वनवासच ! ह्यांची सदसद्विवेकबुद्धि विलक्षण जागृत आहे, ह्याचा जयपुरीं एकदां मला अनुभव आला होता."

"दादा, असं रे काय करतोस ? तुझ्यावर तिचं किती बरं प्रेम आहे !" तारा कळवळून म्हणाली.

"विश्वासराव, ह्या घटकाभरांत तुमच्या पत्नीच्या मनाला झालेल्या यातना पुरेशा झाल्या नाहींत असं वाटलं होय तुम्हांला ?" कठोर स्वरांत मुरारराव बोलले.

"माझी पत्नी ? हुंः ! असल्या पुराव्यावर आपल्या पतीला खुनी समजणारी ही माझी पत्नी ! अलक, मघां तूं मला हेंच विशेषण बहाल केलंस, नाहीं ?" विश्वासरावाचा स्वर अत्यंत शुष्क आणि कठोर येत होता. अलकच्या त्या निष्प्रभ चर्येकडे पहात तो पुढें म्हणाला, "दुसऱ्यांच्या शब्दावर विश्वास ठेवून मी कधीं तरी तुला खुनी समजेन काय ? पण नितान्त प्रेमानें, मधुर विश्वासानें तुझ्याकडे धावत येणाऱ्या मला—तुझ्या पतीला—हातीं जंबिया घेऊन मारायला तूं उद्युक्त झाली होतीस, हे तुझे शब्द तरी मी कसे खोटे मानूं ? अलक, ऐकण्यांत माझी चुकी झाली असं तरी सांग ! तूं असत्य बोललीस असं तरी म्हण ! तूं कांहींच्याबाहींच बरळलीस असं तरी बोल ग ! अलक, कांहीं कर, कांहींही बोल, पण आजच्या ह्या पहिल्या रात्रीं तूं मला मारलं असतंस हा असह्य विचार मला विसरायला लाव."

प्रारंभीं कठोर येणारा विश्वासरावाचा स्वर शेवटीं शेवटीं अत्यंत केविलवाणा झाला; अलकला रागावण्यासाठीं–जाब विचारण्यासाठीं प्रारंभ केलेल्या त्या भाषणाचा शेवट स्नेहमय विनवणींत झाला. पण अलक कांहींच नाकबूल करीत नाहीं असें पाहून निराशेनें विश्वासराव खिडकीकडे गेला, व चौकटीवर डोकें टेंकून अलककडे पाठ करून उभा राहिला.

" मला त्या वेळीं वेड लागलं होतं, आणि देवा, आतांही पुन्हा तसंच होणार कीं काय ! " अलक आतां रडकुंडीला आली होती. आपल्या तोंडाकडे पाहिलें असतां सारें विसरून क्षमा करायला होईल ह्या भीतीनें विश्वासरावांनीं आपल्याकडे पाठ केली आहे हें मनांत येऊन अलकला थोडासा धीर आला. आपल्या व त्यांच्याही सौख्यासाठीं एकदांच काय तो सोक्षमोक्ष करावा असें तिला वाटलें. विश्वासरावाच्या हाताला स्पर्श करावा म्हणून तिनें आपला उजवा हात पुढें केला, पण कदाचित ते झिडकारून टाकतील ह्या भीतीनें तिनें तो लगेच मागें घेतला; व विश्वासरावाच्या मागें कांहीं अंतरावर उभी राहून ती अनैसर्गिक शांत स्वरांत म्हणाली, " नाथ, जयपुरीं असतां आपण एकदां एका गुन्हेगाराची जबानी ऐकली होती, तशी आतां आपल्या पत्नीची ऐकावी ! "

तिच्याकडे न पहातां शुष्क स्वरांत विश्वासरावानें विचारलें, " अस्सं ! एकूण तुला न्याय पाहिजे आहे तर ! "

" न्याय नको. महाराज, मला आपल्या दयेची भिक्षा घाला ! " अलकनें विनविलें.

" ठीक आहे, बोल. माझ्या आयुष्याची माती व्हावी अशी माझी इच्छा नाहीं. माझं तुझ्यावर किती प्रेम आहे हें तुला ठाऊक आहे ना ! तेव्हां माझं सुखदुःख सर्वस्वीं त्यावर अवलंबून आहे म्हणून सर्व सांग ! "

" होय, होय. सर्व सांगतें. कांहीं मागें ठेवत नाहीं. माझ्या प्रियतम पतीचें प्रेम परत मिळविण्याची मला तेवढीच एक संधि आहे. एक दिवस आपल्याला सारं सांगून टाकायचं हें मीं केव्हांच ठरविलं होतं; पण माझ्या वेड्या मनाला आपलं असं वाटे कीं, थोडे दिवस आपला सहवास लाभूं दे, माझं अंतःकरण पश्चात्तापानें दग्ध झालेलं आपल्या प्रेमानं पुनीत झालं आहे असं आपल्याला नीट कळूं दे नि मगच सांगावं ! पण आतां कुठं आहे त्या सहवासाची आशा ! बाकी सर्व झालं असतं तर आपण मला क्षमा केली असती; पण आतां—छेः ! आतां कुठची

ती आशा ! आपली पत्नी व्हायला आपण मला नालायक ठरवाल ! देवा, स्वारीच्या मनांत दया उपजूं दे रे ! नाथ, आपलं अंतःकरण थोर आहे, आपल्यावर माझं किती प्रेम आहे तें मनांत आणा आणि—आणि नाथ......" इतका वेळ आंवरून धरलेला बांध आतां फुटला. अलकच्या गालांवरून अश्रूंचे ओघळ वाहूं लागले.

मुराररावाजवळ जाऊन तारा म्हणाली, " हें काय बरं ? चाललं आहे तें ठीक नाहीं. माझ्याच्यानें तें ऐकवत नाहीं. आपण थांबवाना तेवढं. "

" छेः, छेः ! " गंभीर स्वरांत मुरारराव उत्तरले. " त्याचं लोपलेलं सौख्य परत मिळण्याची ही एवढीच एक संधि आहे. तारे, आतांच जर दिलसफाई झाली तरच पुन्हा दिलजमाई होईल. तुझ्या दादानं जर तिला आज क्षमा केली नाहीं तर तो पुढें कधींही तिला क्षमा करणं शक्य नाहीं. ही वेळच अशी आहे !" नतर अलककडे वळून किंचित् हुकमतीच्या स्वरांत तो म्हणाला, " हं, आतां सारी हकीगत आपल्या पतीला सांगा पाहूं !"

" सारं सांगूं ? माझ्या प्रतिज्ञेविषयीं सांगूं ? जयपुरांतील रोग्यांच्या शुश्रूषेविषयीं सांगूं ? मुरारराव, स्वारी ज्या वेळीं मला दयेची देवी मानीत होते, त्या वेळीं मी क्रूर कालिका होतें हें सुद्धां सांगूं ? " अलकचा जीव कासावीस झाला.

" क्रूर कालिका ? छेः, छेः ! अगदींच अशक्य ! जयपुरीं तूं पृथ्वीवरील देवांगना होतीस; जिनं माझी इतक्या प्रेमानें शुश्रूषा केली, जिनं माझ्यासाठीं अहोरात्र एवढे अविश्रांत परिश्रम केले, ती दयेची देवी नव्हती हें तूं स्वतः सांगितलंस तरी मी खरं मानणार नाहीं. आहाहा ! जयपूरचा ती मनोरम बाग ! तिकडेच मी प्रेमाचा पहिला धडा शिकलों !" विश्वासरावानें प्रेमकोमल दृष्टीनें तिच्याकडे पाहिलें. ती दृष्टि अलकला अमृतसिंचनासारखी भासली खरी; परंतु त्यामुळें आश्वासन न येतां उलट तिला जास्तच भीति वाटली. कारण विश्वासरावाचें आपल्यावरचें प्रेम अजूनही किती निःसीम गाढ आहे हें तिला त्यामुळें पूर्ण कळलें; आणि एवढें अत्युच्च प्रेम आपल्या कबुलीजबाबापायीं नाहींसें होणार ना ? अलकला हें आतां असह्य झालें.

" मीं दयेची देवी ? देवा, देवा ! कोण ही विटंबना ! कुठल्या तोंडानें मी सारं सांगूं ? आणि मग मीं क्षमेची अपेक्षा तरी कशी करूं ? "

"काय ! ती हकीगत एवढी भयंकर आहे ?" विश्वासराव ओरडला; आणि एवढा शक्तिमान् तरुण एखाद्या अबलेप्रमाणें दुःखामुळें आपलीं बोटें कड्कड् मोडूं लागला.

"होय, आपल्याला ती भयंकर वाटेल. आपण मराठे आहांत. मी रजपूत आहें ! 'सूड' ही अत्यंत पवित्र भावना समजणाऱ्या ह्या आमच्या स्वतंत्र राजपुतान्यांत आपण लहानाचे मोठे झालां नाहीं. सूडाच्या भावनेनें दरवळलेल्या ह्या वातावरणांत आपण वागडलां नाहीं. प्रत्येक तिसऱ्या पिढींत सूड घेणाऱ्या व त्यामुळंच श्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या चौहान कुलांत आपण जन्मलां नाहीं. ह्या महत्त्वाच्या वस्तुस्थितीचा विचार करा ! आपणांवर मी करतें तितकंच-जवळ जवळ तितकंच-उत्कट प्रेम मी माझ्या भाईवर करीत होतें. अगदीं बाळपणीं मी पोरकी झालें; आणि माझ्या भाईशिवाय माझं निकट प्रेमाचं ह्या अफाट दुनियेंत कुणीच नव्हतं ! द्वंद्वयुद्ध अन्यायानं खेळलं गेलं, एवढंच नव्हे तर त्यांत माझ्या भाईचा निःसंशय खूनच झाला असा माझा समज झालेला. त्यामुळं मी अस्सल चौहान कुमारी हें आठवून, भाईच्या शवाला साक्षी ठेवून त्याच्या खुन्याचा सूड उगविण्याची मीं प्रतिज्ञा केली. त्याच प्रतिज्ञेसाठीं मी जयपूरलासुद्धां पोहोंचलें. तिथं जखमी मराठ्यांच्या छावणींत शिरकाव करून मी जखमी शिपायांची शुश्रूषा करूं लागलें. कारण ते जखमी शिपाई मराठा असल्यामुळं, तापांत भ्रम वगैरे झाला असतांना ते कांहीं बरळतील व त्यामुळं मला पाहिजे असलेल्या इसमाचा थोडाफार मागमूस लागेल अशी मला आशा वाटली !"

हा कबुलीजबाब ऐकून तारा एकदम मागें सरकली, सरकली आणि—

विश्वासराव विकट हास्य करून म्हणाला, "वाः ! आणि ह्याच सेवाव्रतासाठीं हिला दयेची देवी समजून माझ्या हृदयकमलानं मीं हिची पूजा बांधली ! अलक, इतक्या प्रेमानं, पूर्ण एकनिष्ठपणें बांधलेली पूजा निष्ठुरपणानं अशी छिन्नभिन्न करूं नकोस ! जिला प्रेमाची मूर्ति समजून मी माझी पत्नी केली ती इतक्या निर्दय अंतःकरणाची आहे-सेवा करण्याच्या मिषानं एका जखमी तरुणाला लीलेनं ठार करायला उद्युक्त होण्याइतकी ती हृदयशून्य आहे असं मला सांगूं नकोस !" विश्वासरावानें आपला डावा हात तिच्या हनुवटीखालीं घालून तिचें सुंदर मुखकमल वर केलें आणि तिच्या हताश झालेल्या डोळ्यांकडे अनिमिष नेत्रांनीं पाहून म्हटलें, "काय वाटेल तें होवो, तूं तसं सांगितलंस तरीही मी तें खरं मानणार नाहीं !"

" नाहीं हो ! मीं त्या उद्देशानं छावणींत शिरकाव केला नाहीं तुमता मागमूस लागावा म्हणून मी झटत होतें. तसं मी कधीं तरी करीन का ? मी एका विशिष्ट इसमाला शोधीत होतें; आणि इतरांची मी ममतेनं, दक्षतेनं शुश्रूषा करीत होतें. त्या जखमी शिपायांनाच विचारा. ते माझ्यावर किती तरी माया करीत, तीं काय उगीच ? मी कितीही थकलेली असलें तरी त्यांनीं 'पाणी' म्हटलं कीं मी तश्शी धांवून जात होतें. माझ्या मनाला कितीही त्रास झाला, अगदीं मला बघवलं नाहीं, तरी अत्यवस्थ रोग्यांच्या जवळून त्यांच्या मनाविरुद्ध मीं शेवटपर्यंत हालत नसें. आपण त्यांच्यापैकींच एक होतां; आपल्याला तो अनुभव आहेच. नाथ, मग आपणच सांगा, हरघडीला आईच्या मायेनें, पत्नीच्या प्रेमानें, भगिनी-च्या आपलेपणानें आणि मैत्रिणीच्या स्नेहानें आपली शुश्रूषा करणारे हे माझे हात त्या वेळीं द्वेषानें माखलेले होते कीं स्नेहानें अलंकृत होते ? "

" काय सांगूं ? ते स्वर्गीय देवीचे हात होते; दया आणि प्रेम हीं त्यांतून स्रवत होतीं. घोर पाप्यालासुद्धां पावन करण्याएवढी त्यांची योग्यता होती."

विश्वासरावाच्या डोळ्यांत अश्रु चमकूं लागले.

" आणि त्यामुळेंच शपथपूर्वक खून करण्याचा तुझा तो विचार ऐकून मला काय होत आहे तें सांगतां येत नाहीं; असं वाटतं कीं, एक मला तरी वेड लागलेलं असणार किंवा तुझं तरी डोकं ठिकाणावर नसणार ! "

" पण मला त्याबद्दल पश्चात्ताप झाला ! आपल्या प्रेमासाठीं माझ्या प्रतिज्ञेवर मीं तिलांजलि दिली; परंतु त्या नीचानं—" पडद्यापाठीमागील दुर्जनसिंहाच्या शवाकडे बोट करून, " त्यानं मला मुद्दामच ह्या माझ्या लाडक्या जन्मभूमींत आणलं. मीं प्रतिज्ञेचा त्याग केला म्हणून माझ्या साऱ्या जातभाईंनीं मला हिणवावं, शरमिंदी करावं, ही त्याची इच्छा ! माझ्या बाळपणींच्या स्नेह्यासोबत्यांनीं माझी निर्भर्त्सना केली म्हणजे मला लज्जेनं मेल्याहून मेल्यासारखं वाटावं हा त्याचा हेतु ! आणि आज रात्रीं, आमच्या रजपूत विधींचा, रजपूत वातावरणाचा, पोषाखाचा, बारीक-सारीक साऱ्या रजपूत गोष्टींचा परिणाम होऊन मीही अंतर्बाह्य कडवी रजपूत बनणार हें त्या मेल्याला पुरं ठाऊक होतं; आणि म्हणूनच माझ्या लाडक्या भाईला आपणच मारलं हें त्यानं मला आजच सप्रमाण सिद्ध करून दाखविलं; आणि धयाळनं जुलुमानं तो जंबिया माझ्या हातांत दिला ! कांहीं क्षण माझी विचार-

शक्तीच हरपली होती ! बस्स ! हीच सारी हकीगत ! मला क्षमा करा ! मी तेव्हां वेडी झालें होतें ! ”

दुःखानें व क्षोभानें धापा टाकीत अलक बोलावयाची थांबली; आणि सहानुभूतीच्या अपेक्षेनें तिनें त्या तिघांकडे नजर फेंकली.

त्या तिघांच्याही मनांत कांहीं अनुच्चरणीय विचार आल्यामुळें कांहीं न बोलतां, त्यांनीं फक्त एकमेकांकडे पाहिलें.

विश्वासराव कांहीं क्षण स्तब्ध राहिला.

नंतर अलकजवळ येऊन, पडद्याकडे व दुर्जनसिंहाच्या शवाकडे बोट करून, अर्धवट उत्सुकतेनें व अर्धवट अनिच्छेनें आपल्या कांपऱ्या आवाजांत त्यानें विचारलें, “ मग त्याला कोणीं मारलं ? ”

हा प्रश्न ऐकून अलक दचकली.

“ मीं नाहीं ! देवाशपथ मीं नाहीं ! दयाळनं मारलं ! ”

“ अहाहा, देवाचेच उपकार ! ” मोठया संकटांतून सुटल्याप्रमाणें विश्वासरावानें समाधानाचा श्वास टाकला.

पण तो पुरता बाहेर पडतो न पडतो तोंच अलक त्याच्या समोर येऊन उभी राहिली अनिर्वचनीय निर्भर्त्सनेनें तिचे काळे भोर डोळे चमकत होते.

“ पहा बरं एकदां माझ्याकडे; आपल्या त्या भयंकर प्रश्नानंतर माझ्या नजरेला नजर देण्याची हिंमत आहे का आपल्यांत ? मी आपली पत्नी–नव्हे आपली वधू–आपल्याला मारण्यासाठीं पडद्याआड लपून बसलें व निव्वळ चुकीनें दुर्जनसिंहाला मारलं, अशी आपल्याला शंका आली नाहीं का ? माझ्या पतींचं हें माझ्याबद्दलचं मत ! आपला पदरव ऐकला तेव्हां मला माझ्या सूडाच्या शपथेची नव्हे तर विवाहकालच्या आपल्या शपथांची आठवण झाली. दयाळनं माझ्या हातीं सोंपविलेला जंबिया मीं त्याच्यावरच उगारला. आपल्या अमूल्य प्राणांसाठीं त्याच्याबरोबर मी झगडत असतां माझ्या गळ्यावर पडलेले हे वण पहा ! ते आपला कसा धिक्कार करताहेत ! ” तिच्या स्वरांतील मंद निर्भर्त्सनेंत आतां तीव्र तिरस्काराची भर पडली होती.

अलकच्या नाजुक गळ्यावरील ते लाल व निळे वण पाहून विश्वासरावाचें मन ओशाळलें आणि कळवळलें. अबला असून आपल्यासाठीं तिनें एवढी झटापट केली हें पाहून त्याच्या मनांतील कृत्रिम औदासीन्याचा बांध पडला.

" माझ्यासाठीं ! अरेरे ! अलक, लाडके, मला क्षमा कर ! "

परंतु अलकचें तिकडे लक्षच नव्हतें. तिच्या कोमल आणि त्रस्त अंतःकरणाला ह्या जळजळीत निखारा लागला होता.

" आणि आपल्याला मीं मारलं असं आपल्याला वाटलं ! आतां मी विनवणी करणार नाहीं. मला आतां तेवढी शक्तीच नाहीं ! आपण निःशक्त होतां तेव्हां मीं आपली शुश्रूषा केली, आपणांवर हल्ला होणार हें कळलं तेव्हां मीं आपलं रक्षण केलं आणि आतां, रात्रीच्या साऱ्या यातनांनंतर, जें आपलं हृदय माझ्या विसाव्याचं स्थान व्हायला हवं, तें तिरस्कारानं माझ्यापासून दूर वळावं ना ! देवा, माझ्या पतींनीं माझा त्याग केला ! नाथ, मी आपणांवर किती बरं प्रेम करितें ! आपण एवढा निष्ठुरपणा केलात तरीही मी आपणांवर प्रेमच करितें ! आणि आपल्याला क्षमाही करतें ! "

एवढें बोलून, अत्यंत प्रेमानें, पाषाणाचें हृदयसुद्धां द्रवेल अशा नितांतमधुर दृष्टीनें, ज्याच्यासाठीं तिला एवढया यातना भोगाव्या लागल्या त्या आपल्या पतीकडे तिनें पाहिलें. झंझावातांत सांपडलेल्या केळीप्रमाणें तिचा देह कांपत होता. ती आतां खालीं पडणार तोंच विश्वासरावानें आपल्या हातांनीं तिला सांवरलें. त्याच्या वक्षःस्थलावर डोकें टेंकून अलकनें एकवार गोड हास्य केलें. समाधानाचा एक सुस्कारा सोडून 'माझे नाथ' असें ती पुटपुटली आणि दुसऱ्याच क्षणीं गाढ मूर्च्छित झाली.

## प्रकरण पंचविसावें

# हकीमसाहेबांची बिदागी

विश्वासरावाची स्थिति अगदीं वेड्यासारखी झाली. आपल्या लाडक्या अलकला तो आलिंगन देत होता, तिच्या केंसावरून, गालांवरून हात फिरवीत होता, तिच्या कानांत प्रेमानें पुटपुटत होता, पण व्यर्थ ! तिच्याकडून कांहींच प्रत्युत्तर येईना. तेव्हां तो घाबराघुबरा होऊन मुराररावाला म्हणाला, " अहो, इकडे या लौकर. ही जिवंत तरी आहे काय ? माझ्या निष्ठुरपणापायीं ही सुंदर कळी अकालीं सुकली तर नाहीं ना ? "

मुरारराव कांहीं बोलण्याच्या अगोदर तारा आपल्या भावाजवळ आली, व आपल्या नेहमींच्या सडेतोड वृत्तीला अनुसरून ती त्याला टोंचून म्हणाली, " ठीक झालं ! दादा, करावं तसं भरावं ! पुरुष म्हणजे असलेच निर्दय ! तीं तुला एवढं विनवीत होती, तेव्हां कांहीं तुझ्यानं क्षमा करवली नाहीं. आणि आतां आलंय अगदीं प्रेमाचं भरतं ! चल, दे तिला इकडे. ह्यांच्या मदतीनं मी तिला झोंपवतें पलंगावर. भावाच्या निर्दयपणानं बेशुद्ध झालेली माझी नाजुक अलक बहिणीच्या प्रेमळपणानं बघ कशी आता शुद्धिवर येईल ती ! "

" मी तिला सोडणार नाहीं ! " गंभीरपणें विश्वासराव म्हणाला.

" बरोबर आहे. ह्या वेळीं तिला तुमच्या बाहूंचा आश्रय पाहिजे आहे."

मुराररावांनीं दिलेलें हें अनुमोदन ऐकून तारा तिरस्कारानें हंसून म्हणाली, " वाः ! काय पण हकीम ! दादाच्या निर्दयपणानं तिनं मरून जावं हीच ना तुमची औषधयोजना ? किती रास्त चिकित्सा ही ! "

अलकच्या चेहऱ्याकडे लक्षपूर्वक पहात असलेला मुरारराव ह्यावर म्हणाला, " हेः, सुखानं कुठं माणूस मरतंय ? विश्वासराव, त्या मूर्च्छित होण्याच्या अगोदर तुमच्या बाहूंचा स्पर्श त्यांच्या शरीराला झाला. त्यांनीं सोडलेला सुस्कारा समाधानाचा होता, निराशेचा नव्हता. ह्या क्षुल्लक भासणाऱ्या दोन गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत. आतां तुमची पत्नी शुद्धीवर येण्याच्या आधीं मी कांहीं सांगतों तें ऐका. सारा गैरसमज दूर झाल्याखेरीज तुम्हांपैकीं एकही सुखी होणें

शक्य नाहीं हें ठाऊक असल्यामुळंच मीं हा प्रकार चालू दिला. वैद्याच्या नात्यानं मीं तो तहकूब करावयाला पाहिजे होता; पण तुमचा मित्र ह्या नात्यानं मीं तो चालू दिला. आतां तें संपलं. तेव्हां आतां मीं पुन्हा तुमचा वैद्यबुवा झालों! ”

“ तर मग आपल्या कौशल्यानं तिला शुद्धीवर आणा ! ” विश्वासराव हलक्या स्वरांत बोलला.

“ अंहं: इतक्यांत नाहीं ! ”

“ इतक्यांत नाहीं ! ” विस्मित होऊन तारा उद्गारली.

“ हो, तसंच ! विश्वासराव, तुमची पत्नी शुद्धीवर आली म्हणजे तिची नजर ह्या खोलीवर, फार काय ह्या वाड्यावरही पडतां कामा नये. सबंध आयुष्यांतसुद्धां क्वचितच भोगावं लागेल एवढं दुःख त्यांनीं ह्या एका रात्रींतच अनुभविलं आहे ! तरी पण त्या तरुण, निरोगी व सशक्त आहेत. आणि ह्या धक्क्यामुळं त्यांच्या मनाला बसलेला ताण तुम्ही आपल्या प्रेमानं दूर कराल असा मला भरंवसा आहे ! ”

“ माझ्या हातून होईल तें सारं मी तिच्यासाठीं करीन ! ”

“ तेवढं बस्स होईल ! परंतु ध्यानांत ठेवा, मीं परवानगी दिल्याशिवाय कोणत्याही सबबीवर तुम्हीं त्यांच्यापासून दूर जातां कामा नये. तुम्हीं दिसलां नाहींत कीं त्यांना ताबडतोब सारी आठवण होईल, काळजीही वाटेल, आणि कदाचित् जवळ जवळ येणारा तुमचा पदरव ऐकायला येतो असंही त्यांना पुन्हा वाटूं लागेल ! तेव्हां तुम्हीं सतत त्यांच्याजवळ राहिलं पाहिजे. आतां त्यांना तुम्हीं उचलून तारेच्या खोलींत न्या. त्या शुद्धीवर आल्या, कीं पहिल्या प्रथम त्यांना तुमचा चेहरा दिसला पाहिजे ! दुसरं असं कीं, आणखी पाव घटकेनं आपल्याला इकडून निघायचं ! ”

“ इकडून निघायचं ! आणि कुठं जायचं ! ”

“ पहिल्यांदां चितोडला; नंतर टप्प्याटप्प्यानं पुणं गांठायचं ! ”

“ पण अलक फार अशक्त झाली आहे. तिला एवढा प्रवास कसा झेंपेल ? ”

“ त्याला कांहीं इलाज नाहीं. कांहीं असलं तरी प्रवास करणं प्राप्तच आहे. उद्यां सकाळच्या आंत आपल्याला चितोडही सोडलंच पाहिजे ! हें रजपूत वातावरण सध्यांच्या त्यांच्या मनःस्थितीला फारच घातक आहे. त्या सूडाच्या प्रतिज्ञेची व तीपासून उद्भवलेल्या इतर दुःखजनक गोष्टींची आठवण होण्यापेक्षां त्यांना इतर कसलीही शारीरिक गैरसोय सोसावी लागली तरी पत्करलं ! तुम्हीं सर्व कांहीं

खुशाल माझ्यावर सोंपवा. मी जर तुमचा हकीम म्हणतां, तर मग मुकाट्यानं माझं ऐका!" अलकच्या चेहऱ्याचें लक्षपूर्वक निरीक्षण करीत मुरारराव म्हणाला.

"तुम्हांला जसं योग्य दिसेल तसं करा, माझं कांहीं म्हणणं नाहीं. मात्र माझ्यासाठीं हिला वांचवा एवढंच माझं सांगणं आहे. कांहीं करा; पण हिला वांचवा!" आपल्या हातांतील त्या सुंदर, मूर्च्छित बालेकडे पहात विश्वासराव कळवळून म्हणाला.

"ठीक आहे. मी एकूण एक व्यवस्था करितों. थोडक्याच वेळांत दारापुढं दोन घोड्यांचा रथ येईल. तुम्हीं जिवंत आहांत व त्यांच्यावर पूर्ण प्रेम करीत आहांत, एवढ्या दोन गोष्टी तुमच्या पत्नीला कळल्याच पाहिजेत एवढं मात्र विसरूं नका. बाकी सर्व मी आणि तुमची बहीण मिळून करूं. होय ना तारे?"

शेवटला प्रश्न तारेकडे पहात मुराररावानीं अगदीं मृदु स्वरांत विचारला.

विश्वासरावानें अलकला उचलून खोलीबाहेर नेली. तें पाहून मुरारराव तारेला म्हणाला, "माझ्या प्रीतिदेवतेवर जर असा प्रसंग आला असता तर निराशेनें माझी काय अवस्था झाली असती!"

त्याच्या चर्येवरील गंभीर भाव पाहून तारा घाबरली. "अगबाई, भिण्यासारखं कांहीं आहे होय!"

"तसंच केवळ नाहीं; परंतु अशा स्थितीमध्यें मेंदूला धक्का पोंचून उष्णता अतिरेकाला जाण्याची भीति असते. तथापि तसं कांहीं होणार नाहीं अशी मला उमेद आहे. पण तारे, ह्यांतलं कांहीं तुझ्या दादाला कळता कामा नये बरं!"

अत्यंत प्रेमादरानें त्यांच्याकडे पहात तारा म्हणाली, "खरंच, किती हुशार हकीम आहांत आपण! किती सफाईनं एवढं जबाबदारीचं काम करतां! दुसऱ्यावर योग्य हुकमत चालविण्याची आपल्या अंगांत उपजतच हुशारी आहे!"

तारेच्या ह्या प्रशंसेनें तत्काळ मुराररावाचा बराचसा श्रमपरिहार झाला.

थोडेंसें जुजबी सामान बरोबर घे, असें तिला सांगून मुरारराव बाहेर येतात तोंच घोड्याच्या टापा वाजल्या. त्याबरोबर तारेला हांक मारून मुरारराव म्हणाले, "तारे, ठरल्याप्रमाणं किसनसिंह आले आहेत. मी बाहेर त्यांच्याकडे जातों हं!"

मुराररावानें थोडक्या शब्दांत किसनसिंहाला सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून मुराररावाच्या इच्छेप्रमाणें त्यानें आपल्या दोन शिपायांना पहाडांत लपून बसलेल्या बबाळला पकडून आणण्याचा हुकूम केला.

नंतर मुरारराव म्हणाला, "किसनसिंह, आणखी एक काम आहे. गांवांत एक म्हातारा वैद्य राहतो त्याच्याजवळून मी सांगतों तें चाटण व मुळी आतांच जाऊन घेऊन या."

सांगितल्याप्रमाणें किसनसिंह चाटण व मुळी घेऊन आला. तेव्हां मुरारराव तारेजवळ जाऊन म्हणाला, "हें बघ, आपण हा रजपूत प्रदेश सोडून जाईपर्यंत अलककुमारी मूर्च्छितच राहिली तर बरं होईल. म्हणून वाटेंत ती शुद्धीवर आल्यावर जर ती आनंदी दिसली व आपला पति जिवंत असल्याबद्दल तिची खात्री आहे असं दिसलं तर हें चाटण तिला दे; व ती तशी दिसली नाहीं तर रथ ताबडतोब थांबवून माझी वाट पहा."

"म्हणजे ! आपण आमच्याबरोबर नाहीं येणार !" तारेनें प्रश्न केला.

"येणार, पण तुमच्या पाठोपाठ किसनसिंहाबरोबर घोड्यावरून येणार."

"असं काय तें ! आज किती दिवस आपल्याला विश्रांति म्हणून नाहीं. थोडी तरी मेली स्वतःच्या प्रकृतीची काळजी हवी. आपण रथांतूनच यावं गडे. माझ्या-साठीं, माझ्या शब्दासाठीं एवढं करावंच गडे !"

"पण वेडे, रथांत जागा तरी आहे का ! अलककुमारीला झोपवावयाची, तिचं डोकं आपल्या मांडीवर घेऊन तुझा दादा तिच्या बाजूला बसणार. समोर थोडीशी जागा असते तिकडे तूं आणि तुमचं थोडं सामान; शिवाय, एकट्या किसनसिंहाला घोड्यावरून यावयाला सांगणं किती वाईट दिसेल, सांग बरं ! माझ्या शब्दासाठीं तो आपले शिपाई घेऊन अगत्यानं इकडे आला, तेव्हां त्याला एकटा पाठवणं वाईट दिसतं, नाहीं का ! सांग पाहूं !"

"हो, ठाऊक आहे आम्हांला. स्वतःशिवाय साऱ्यांची काळजी वहाण्याचा मक्ताच दिलाय इकडे ! पण म्हटलं मीं आहें इकडली काळजी घ्यायला !"

"ओहोहोहो ! केवढा थोरला फणकारा हा ! पण बाईसाहेब, गळ्यांत माळ पडेपर्यंत मला थोडीशी स्वतंत्रता मिळेल का ? नंतर पुढें आहेच आपला बंदा सेवक ! झालं ! रागावलीस ! पाहूं, वर बघ; हां, अस्सं !"

तारेचा राग आला असला तरी अशा भाषणापुढें तो कसा बरें टिकावा !

सारी तयारी झाल्यावर विश्वासरावानें अद्यापि बेशुद्ध असलेल्या अलकला फुलासारखी अलग उचलून रथांत ठेवली. नंतर तारा व तो आंत बसलीं आणि

प्रवासाला सुरुवात झाली. त्यांच्यामागून थोड्या वेळानें मुरारराव व किसनसिंह घोडयांवरून निघाले.

बऱ्याच वेळां मुराररावाच्या चर्येचें निरीक्षण केल्यावर किसनसिंह म्हणाला, “ मुरारराव, तुम्हीं झोंप घेऊन साधारणपणें किती काळ झाला ?”

“ अं ! गेल्या दोन दिवसांत मला मुळींच झोंप मिळालेली नाहीं; पण एक-सारखी दौड करीत असल्यानं मला तसा कांहीं त्रास वाटत नाहीं !”

“ काय सांगतां ? तुम्हीं किती थकलां आहांत तें तुमचा चेहराच सांगतो आहे. मराठे लोक आपल्या मित्रासाठीं असा जीव टाकतात हें मला ठाऊक नव्हतं ! पण मुरारराव, माझा असा अंदाज आहे कीं, त्या मराठा तरुणीवर तुमचं प्रेम आहे. खरं का हें ?”

“ होय, खरं आहे. आणखी महिनाभरांत आमचा विवाह होणार आहे ! ”

“ वा ! सुखी आहांत राव ! मीसुद्धां एकदां—फक्त एकदांच प्रेमाच्या पाशांत सांपडलों होतों ! ” कांहीं दुःखमय आठवणीनें किसनसिंहाचा प्रामाणिक, शांत चेहरा अस्वस्थ झाला.

आणखी थोडा वेळ असाच गेल्यावर किसनसिंहानें दयाळच्या शोधासाठीं पाठविलेले ते स्वार त्यांना येऊन मिळाले.

किसनसिंहानें तीव्र स्वरांत त्यांतील एकाला प्रश्न केला, “ तुमचा कैदी कुठें आहे ! ”

लष्करी शिस्तीचा सलाम करून तो उत्तरला, “ त्याला आम्ही तिकडेच ठेवून आलों.”

“ निष्प्राण ?”

“ होय, शिलेदार ! ”

“ शक्य तों प्रयत्न करून त्याला जिवंत पकडावा असा माझा हुकूम होता ना ! ” शिलेदार किसनसिंह कठोर स्वरांत उद्गारला.

“ होय. परंतु तो आमच्या हातीं लागलाच नाहीं. आम्हाला दुरून पाहतांच त्यानें हातांतील जंबियानें आत्महत्या करून घेतली ! ”

“ अस्सं ! मग कांहीं इलाज नव्हता. ठीक, तुम्ही आमच्याबरोबरच चला आतां.” नंतर तो मुराररावाकडे वळून म्हणाला, “ मुरारराव, एका अर्थी हें बरेंच

झालं. सिरोही सोडून जावयाला आतां कांहींच अडथळा येणार नाहीं. शिवाय, पाठलागाचीही भीति नको."

" होय, खरं आहे. उजाडण्याच्या आंत आपण चितोडला पोहोंचूं. नंतर लगेच तसंच पुढं जाणं भाग आहे. किसनसिंह, आमच्या मंडळीच्या कानांवर दयाळविषयींची बातमी जाऊं देऊं नका, असं तुमच्या लोकांना तुम्हीं जरा बजावा हं. कारण आतांपर्यंत त्यांना बसलेले धक्के कांहीं थोडे नाहींत ! "

" छे, छे ! तुम्हीं त्या बाबतींत कांहीं काळजी करूं नका. तें माझ्याकडे लागलं ! "

बरोबर ह्याच वेळेला विश्वासराव पुढें वांकून हळूंच तारेला म्हणाला,

" ही शुद्धीवर येते आहे."

विश्वासराव हें बोलत असतांच अलकनें किंचित् चळवळ केली व डोळे उघडून ती पुटपुटली, " स्वारीचा आवाज ! आपण जिवंत आहांत ! एकूण माझं स्वप्न खरं झालं तर ! "

नंतर आजूबाजूला पाहून निःशक्त स्वरांत तिनें विचारलें, " आपण कुठं आहोंत आणि कुठं चाललों आहोंत ! "

एखाद्या लहान मुलीला कुरवाळावें तसें तिला कुरवाळीत विश्वासराव म्हणाला,

" अलक, तूं माझ्याबरोबर पुण्याला चालली आहेस हं."

" खरं ! इथून दूर जाणार ? आपल्याबरोबर ? मला किती आनंद झाला म्हणून सांगूं ! "

मुराररावाच्या सांगण्याप्रमाणें तारेनें तिला तें चाटण दिल्यावर थोडक्याच वेळांत अलक गाढ झोंपीं गेली; पण त्यापूर्वी तीन-चार वेळां तिनें आपला तळहात विश्वासरावाच्या हृदयावर ठेवला व हृदयाचें स्पंदन होत आहे हें कळल्यावर ती पुटपुटे, " अहा ! माझे नाथ खरोखरीच जिवंत आहेत ग बाई ! "

तिची ही केंविलवाणी कृति पाहून विश्वासरावाचे डोळे भरून येत.

मंडळी चितोडला पोहोंचली तरी अलक झोंपलेलीच होती. कारण तिला दिलेलें चाटण गुंगीचें होतें. चितोड मुक्कामीं घोडे बदलून प्रवासाला पुनः सुरुवात झाली.

सूर्य बराच वर आला तेव्हां किसनसिंहाच्या सल्ल्यानें वाटेत लागलेल्या एका साधारण मोठ्या गांवांत मुराररावानें मुक्काम केला. किसनसिंहानें त्यांच्या निवासस्थानाची व फराळाची वगैरे व्यवस्था केलीच होती. त्याप्रमाणें एका स्वतंत्र घरांत आमची प्रवासी मंडळी उतरली. विश्वासरावानें अलकला तशीच उचलून नेऊन

आंतील खोलींत व्यवस्थित झोंपविलें. योग्य वेळीं बाकीच्या मंडळींचा फराळ झाल्यावर विश्वासराव लगेच अलकच्या जवळ जाऊन बसला. किसनसिंह पुढील प्रवासाची तयारी करण्यासाठीं गांवांत गेला. माडीवर एक खोली होती तिकडे विश्रांति घेण्यासाठीं म्हणून मुरारराव गेला.

थोड्याच वेळांत ताराही वर आली. तिला पाहतांच मुरारराव म्हणाला, “ चला, राजपुताना तर सोडल्यांतच जमा ! आतां तुझी वहिनी जितक्या लौकर जागी होईल तितकं बरं.”

“ आपल्याला तेंच सांगायला मी आलें आहें. अलक चांगली जागी झाली असून दादाबरोबर बोलते आहे

“ असं ! भ्रमिष्टासारख कांहीं नाहीं ना बोलत ? ‘पावलांचा आवाज ऐकूं येतो’ असं किंवा अशासारखं ती कांहीं नाहीं ना बरळत ? ” चिंतायुक्त स्वरांत मुराररावानें वरील प्रश्न विचारले.

“ छेः ! तसं कांऽऽहीं नाहीं ! ”

“ वाः ! छान बातमी आणलीस, तारे ! ”

“ पण तिचे डोळे मात्र सतत दादाच्या तोंडावर खिळलेले आहेत. तो जिकडे जाईल तिकडे तिची दृष्टि जाते. तिची ती नजर इतकी केंविलवाणी दिसते कीं, मला रडूंच आंवरेना. मी आतां इकडे यायला निघालें तर मला म्हणते, ‘तारे, मला हे जवळ जवळ मुकलेच होते. माझ्या निर्दोषी प्रियपतीला मारायला ते मला सांगत होते. अगबाई ! काय तो प्रसंग !’ ऐकल ना, हेच तिचे शब्द ! ”

“ ठीक आहे. हें कांहीं भ्रमाचं लक्षण नाहीं बरं, आतां मी जरा झोंपूं ? उद्यां मोठ्या पहांटेला मुक्काम हालवायचा आजचा दिवस सर्वांनीं विश्रांति घ्यावी असा किसनसिंहाचा आग्रहच पडला ! ”

“ असं काय तें ? आपल्या रोग्याला पाहणार नाहीं का आपण आतां ? ”

“ ऊंहुं:, मला पाहिलें तर अलककुमारीला पुन्हा सगळी आठवण होईल; आणि सध्या तिनं तें विसरावं अशी माझी इच्छा आहे. थोडक्याच दिवसांत ती अगदीं पूर्वी सारखी होईल. खरंच तारे, सबंध दोन दिवस आणि दोन रात्री मला एक क्षणभर-सुद्धां झोंप मिळाली नाहीं. आतां अशी झोंप येत आहे म्हणतेस ! ” आणि कृतीने तिची खात्री पटविण्यासाठींच कीं काय, मुराररावानें एक मोठी थोरली जांभई दिली.

“ तें सारं खरं; पण तिला कांहीं औषध वगैरे नको का द्यायला ? ”

"हो-हो, देतों तर! छानसं औषध देतों तूं स्वतः तें तिला नेऊन दे म्हणजे आपली खाशी जोडी जमेल. मी हकीम आणि तूं परिचारिका!" असें म्हणून मुराररावानें गंभीर चेहरा करून आपली बंद मूठ तिच्या तळहातावर उघडली: तर काय? आंत कांहींच नव्हतें

चकित होऊन तारा म्हणाली, "हें काय गडे! हें कसलं नवीन तऱ्हेचं औषध!"

"मग काय देऊं तर! अग, तुला मला जेवढी औषधाची जरुरी आहे, तेवढीच तिलाही आतां आहे. आतां तिला पोटभर फराळ करूं दे. औषधबिवषध कुच नहिं. तिनं पोटभर खाल्लं म्हणजे मला येऊन वर्दी दे हो, परिचारिकेचं कामच असतं तें!"

अर्ध्या घटकेनें तारा पुन्हा वर आली व हंसत हंसत म्हणाली, "आपली चिकित्सा सोळा आणे रास्त होती बरं का हकीमसाहेब! खरंच, तिला भारी भूक लागली होती हो!"

पण तिच्या ह्या बोलण्याला उत्तर म्हणून मुराररावाचें नियमित घोरणें मात्र ऐकूं आलें. जवळ येऊन तारा त्याच्याकडे वांकून पाहूं लागली तर नुसत्या चटईवर, उशालासुद्धां कांहीं एक न घेतां मुरारराव गाढ झोंपीं गेले आहेत असें तिला दिसलें. कांहीं क्षण त्यांच्याकडे निरखून पाहिल्यावर तारा स्वतःशींच पुटपुटली, "काय दशा झाली आहे पण!"

गेल्या दोन तीन दिवसांत मुराररावानें कपडेसुद्धां बदलले नव्हते. फेटा काढून बाजूला ठेवल्यामुळें आधींच विस्कळित झालेले त्यांचे केंस जास्तीच अस्ताव्यस्त दिसत होते. त्यांत दाढीही कशीतरी वाढलेली; आणि अति श्रमानें त्यांचें तोंड उघडें पडलें होतें. ह्या साऱ्या गोष्टींनीं मुराररावाचा अवतार फारच विचित्र दिसत होता. तारा खालीं वांकली तेव्हां तिला त्याच्या चर्येवरील काळजीमुळें उमटलेल्या रेषा व डोळ्यांखालील काळसर वर्तुळें स्पष्ट दिसलीं. हा सारा त्रास सारी काळजी आपल्यासाठीं, असें मनांत येऊन तिचे डोळे भरून आले. रात्रीच्या प्रवासानें ती स्वतःही शिणली होती; पण तें विसरून तारेनें आपल्या मृदु हातांनीं मुराररावाचें डोकें अलग वर उचललें व आपल्या मांडीवर ठेवून तीं प्रेमानें त्याच्या निद्रिस्थ मुखाचें अवलोकन करूं लागली. दीड दोन घटका झाल्या तरी मुरारराव झोंपलेलेच. अर्थात् ताराही तशीच बसून राहिली.

काहीं वेळानें मुरारराव झोपेंतच चळवळ करूं लागले. त्यांचे ओंठ हालूं लागले. आपण अद्यापि सिरोहीला पोहोंचलों नसून तारेसाठीं तिकडे लौकर पोहोंचावें म्हणून घोडयाला जिवापाड दामटीत आहों, असें त्यांना स्वप्न पडत होतें, हें त्यांच्या झोंपेंतील तुटक उद्गारांवरून तारेला कळलें. झोंपेंतसुद्धां त्यांना आपलीच आठवण येते हें पाहून तारेचें हृदय अगदीं भरून आलें. आपलें थोर भाग्य म्हणून स्वारीचें आपल्यावर एवढें प्रेम, असें वाटून कृतज्ञतेनें तिचे डोळे मृदु झाले. तिनें त्यांना हळुहळू हांका मारून उठविण्याचा प्रयत्न केला; पण मुराररावाची अस्वस्थता वाढतच होती. 'माझ्या तारेला कोण संभाळील' असें पुनःपुन्हा त्याच्या बरळण्यांत येत होतें मुरारराव अजून जागे होत नाहींत हें पाहून तारा घाबरली. मनाच्या आत्यंतिक क्षोभानें पिळवटणारे त्यांचे ओंठ व विकृत चेहरा पाहून तारा भीतीनें कांपूं लागली. आपले दोन्ही हात त्याच्या छातीवर ठेवून तिनें त्यांना हालवून जागें केलें.

जागृत होतांच मुराररावांनीं सभोंवार पाहून विचारलें, " तारे, कां रडतेस तूं ? खालीं काहीं कमीजास्ती तर नाहीं ना ? "

" नाहीं."

तारेला आतां हायसें झालें. " मी—मी किनई—म्हणजे आपण—किनई झोंपेंत एवढे अस्वस्थ झाला कीं, अतिश्रमाने मेंदूपर्यंत उष्णता चढण्याची आपल्याला जी अलकबद्दल काळजी वाटली, तसेंच काहीं आपल्याला झालंय् असं वाटून मी—मी घाबरलें आणि मला अगदींच राहवेना म्हणून मीं आपल्याला उठविलं आणि आपली विश्रांति मात्र व्यर्थ गमावली ! "

" वाः ! मिळाली ती विश्रांति काय थोडकी झाली वाटते ! छान दोन चार घटका झोंपलों असेन मी ! अरेच्चा, उन्हं अगदींच ओसरलीं कीं ! "

तारेचा हात आपल्या हातीं घेऊन मुरारराव पुढें म्हणाला, " अस्से ! एकूण आपली स्वारी माझ्यासाठीं घाबरली होय ? "

" छान ! घाबरलें म्हणजे ? काय पण बोलणं ! आपल्याला आतां काहीं झालं तर जसं काहीं मला काऽऽहीं वाटणारच नाहीं ! "

" तर मग माझी किंमत वाढली म्हणायची ? "

" होय तर, अतिशयच वाढली ! आपण नसतां तर काल रात्रीं आम्ही काय

बरं स्थिति झाली असती ? इतका कुशल नि व्यवहारनिपुण हकीम कुठं मिळणार नाहीं !"

"एऽहेऽ! केवढी दांडगी प्रशंसा ही ! पण बाईसाहेब, अशा कुशल हकीमाची बिदागीही तशीच मोठी असते. आहे का तयारी तेवढी देऊन टाकण्याची ? "

"म्हणजे ? मी नाहीं समजलें !"

"खरंच ? बरं, मी समजावून सांगतों हं ! आणखी एक महिना कांहीं आपण थांबणार नाहीं बुवा ! "

"मग, मी कुठं सांगतें थांबायला ? पाहिजे असलं तर पुण्याला गेल्याबरोबर..."

लज्जेमुळें तारेनें वाक्य अर्धवटच सोडलें; पण मुराररावाला त्यापासून हवी ती अर्थनिष्पत्ति झाली.

"पसंत, पसंत झालं आपल्याला ! तारे, माझ्याबरोबर लग्न केल्याबद्दल तुला कधींच पश्चात्ताप करावा लागणार नाहीं एवढी मात्र खात्री ठेव ! "

ह्यावर तारेनें अशा कांहीं लटक्या, लाडिक रागानें त्याच्याकडे पाहिलें, कीं मुराररावांना कांहीं गप्प रहावेना. लाजऱ्या तारेला प्रेमानें जवळ ओढून एखाद्या पवित्र वस्तूला स्पर्श करावा तितक्या आदरपूर्वक तिच्या ओंठांना आपल्या ओंठांनीं स्पर्श करून त्यांनीं 'पहिलें चुंबन' घेतलें.

इतक्यांत जिन्यावर कोणाची तरी पावलें वाजल्यामुळें सावासारखा अगदीं निरपराधी आणि निर्विकार चेहरा करून मुरारराव तारेच्या जवळ स्वस्थ बसला. अलकच्या कंबरेभोंवतीं आधारासाठीं आपला हात घालून विश्वासराव तिच्यासह वर आला. अलकची चर्या जरा फिकट दिसत होती; पण त्यामुळें तिच्या सौंदर्यांत मात्र मुळींसुद्धां उणीव भासत नव्हती. फिकट आकाशांत शोभणाऱ्या तारकांप्रमाणें तिचे सुंदर नेत्र चकाकत होते. तिची दृष्टि विश्वासरावाच्या चेहऱ्यावर स्थिर झालेली होती. त्यांच्या प्रत्येक बारीकसारीक हालचालींप्रमाणें तिने नेत्र जरी इकडे तिकडे फिरत होते तरी तिच्या नजरेंत समाधानयुक्त आनंद पूर्ण भरलेला दिसून येत होता.

विश्वासराव मुराररावाच्या जवळ आला व आदरपूर्वक त्याचे हात धरून म्हणाला, "मुाररावजी, तुम्ही होतां म्हणून सारं निभावलं, नाहीं तर काल रात्रीं माझी प्रियपत्नी वेडीच झाली असती. तुमचे केवढे उपकार आहेत हे माझ्यावर !"

"छट, उपकारांचं नांवसुद्धां काढू नका. विश्वासराव, तुम्हांला काय ठाऊक आहे ! कधींच कुठल्या हकीमाला मिळाली नसेल एवढी गोड बिदागी मिळणार आहे मला !" चेष्टेनें डोळे मिचकावीत मुरारराव म्हणाला.

विश्वासराव आश्चर्यानें त्याच्याकडे पहातच राहिला.

तेव्हां लाजत लाजत तारा म्हणाली, "दादा, पुण्याला पोहोंचल्यावर एका आठवड्याच्या आंत पृथ्वीवरील सुखसर्वस्वाची मी धनीण होणार आहें बरं का !"

"ओ-हो-हो-हो ! खरं का, ताराबाई शिर्के-नाहीं ताराबाई माने !" मनसोक्त हंसून विश्वासराव म्हणाला.

